# भवभूतिप्रणीत उत्तररामचरित
## मराठी भाषांतर

श्री० कृ० बेलवलकर.

# RĀMA'S LATER HISTORY

or

# UTTARA-RĀMA-CHARITA

*An Ancient Hindu Drama by*

## BHAVABHŪTI

Translated from the original Sanskrit and Prakrit into Marathi, with Introduction and Notes, by


*Shripad Krishna Belvalkar,* M. A., PH. D.

***PROFESSOR OF SANSKRIT, DECCAN COLLEGE, POONA***






Printed at the
Jagaddhitechhu Press, Poona

*First Edition, 1500 Copies*

1915

For Copies of this book apply to the Oriental Books Supplying Agency, 13 Shukrawar, Poona. Price in India, Rs. 2; in: Europe, Shillings 4, in America, One Dollar.

By the same author:

An account
of the different existing
*Systems of Sanskrit Grammar*

( Price Rs. 2. )

To be had of—

Oriental Books Supplying Agency
13 Shukrawar, Poona.



1915

# महाकविश्रीभवभूतिप्रणीत उत्तररामचरित

## या प्रसिद्ध संस्कृत नाटकाचें

## मराठी भाषांतर

[ उपोद्घात व टीपा यांसह ]

भाषांतरकार व प्रकाशक

**श्रीपाद कृष्ण बेलवलकर** एम्. ए., पीएच्. डी.

प्रोफेसर ऑफ संस्कृत, डेक्कन कॉलेज, पुणें.






मुद्रक—के. रा. गोंधळेकर,
जगद्धितेच्छु प्रेस, ४३२ शनवार पेठ, पुणें.

प्रथमावृत्ति, १५०० प्रती

१९१५

हें पुस्तक ओरिएंटल बुक्स सप्लाइंग एजन्सी, १३ शुक्रवार, पुणें
यांजकडून विकत मिळेल. किंमत रुपये दोन.

हें पुस्तक
केशव रावजी गोंधळेकर यांनीं
जगद्धितेच्छु छापखाना ४३२, शनवार पेठ, पुणें येथें छापिलें, व
श्रीपाद कृष्ण बेलवलकर यांनीं पुणें येथें
प्रसिद्ध केलें



१९१५

हें भाषांतर

जिच्या सहवासांत

सीतेच्या प्रेम, पातिव्रत्य, स्वार्थत्याग

इत्यादि अनेक सद्गुणांचा

मला लाभ झाला

तिजप्रत

प्रेमपुरःसर अर्पण केलें आहे

# अनुक्रमणिका

| | पृष्ठ |
|---|---|
| प्रस्तावना ... ... ... ... ... | ९–१३ |
| उपोद्घात ... ... ... ... ... | १५–६८ |
| भवभूतीचा कालनिर्णय व जीवनवृत्तांत ... ... | १५–२९ |
| १. भवभूतीनें स्वतःविषयीं दिलेली माहिती ... ... | १५ |
| २. भवभूतीचें मूळ गांव पद्मपुर कोठें आहे ? ... ... | १६ |
| ३. पद्मपुर व मालतीमाधवांतील पद्मावती हीं एकच आहेत काय? | १७ |
| ४. भवभूतिविषयीं आणखी कांहीं किरकोळ माहिती ... | १८ |
| ५. भवभूतीचा कालनिर्णय; भवभूति व कालिदास ... | २१ |
| ६. ” ” भवभूति व बाणकवि ... ... | २४ |
| ७. ” ” भवभूति व कुमारिलभट्ट ... | २५ |
| ८. ” ” भवभूति व राजशेखर ... ... | २७ |
| ९. ” ” भवभूति व वाक्पतिराज ... | २७ |
| १०. ” ” समारोप ... ... ... | २९ |
| भवभूतीनें केलेले ग्रंथ ... ... ... ... | २९–३१ |
| ११. भवभूतीचे अनुपलब्ध ग्रंथ ... ... .. | २९ |
| १२. भवभूतीचे उपलब्ध ग्रंथ ... ... ... | ३१ |
| महावीरचरित; गुणदोषविवेचन ... ... ... | ३१–३९ |
| १३. महावीरचरित रचितांना भवभूतीपुढें उभा राहिलेला प्रश्न | ३१ |
| १४. भवभूतीनें रामायणकथेमध्यें केलेले फेरफार... ... | ३३ |
| १५. या फेरफारांचें नाट्यशास्त्राच्या दृष्टीनें महत्व... ... | ३५ |
| १६. महावीरचरितांतील दोष ... ... ... | ३७ |
| मालतीमाधव; संविधानक व गुणदोषविवेचन ... ... | ३९–६३ |
| १७ क—१७ छ. मालतीमाधव; संविधानकाची जुळवाजुळव | ३९ |
| १८ क—१८ ज. मूळगोष्टी संविधानकांत गोंवितांना त्यांत भवभूतीनें केलेले फेरफार व त्यांचें नाट्यदृष्ट्या महत्व | ४८ |
| १९ क—१९ ख. मालतीमाधव; संविधानकाच्या रचनेंतील दोष | ५६ |
| २० क—२० ख. मालतीमाधवांतील इतर दोष... ... | ५९–६३ |
| उत्तररामचरित; सर्वसाधारण टीकात्मक विवेचन ... | ६३–६६ |
| २१ क—२१ ख. उत्तररामचरिताची सर्वांगसुंदरता ... | ६३ |

पृष्ठ

२२. भवभूतीच्या तीन्ही नाटकांत आढळणाऱ्या कांहीं विशिष्ट बाबी ६६
नाटकांतील पात्रांची यादी ... ... ... ६९—७०
**मराठी भाषांतर** चित्रदर्शन नामक अंक पहिला ... ७१—१०५
" " पंचवटीप्रवेश नामक अंक दुसरा ... ... १०६–१२६
" " छाया नामक अंक तिसरा ... ... १२७–१७३
" " कौसल्या व जनक नामक अंक चवथा ... १७४–२०४
" " कुमारपराक्रम नामक अंक पांचवा... ... २०५–२२४
" " कुमारप्रत्याभिज्ञान नामक अंक सहावा ... २२५–२५५
" " संमेलन नामक अंक सातवा ... ... २५६–२७६

# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २१ | शेवटची | कालिदा | कालिदासा |
| ५९ | खालून ५ | संविधानकाच्या | संविधानकाचा |
| ९५ | खालून २ | टीप १ | टीप १ व पृष्ठ ८८ टीप १ |
| १२२ | २१ | प्रिये | प्रिय |
| १८३ | ४ | याज्ञवक्य | याज्ञवल्क्य |
| २०२ | २० | १· जनक | ३· जनक |
| २१७ | खालून ६ | पतिस्पर्धी | प्रतिस्पर्धी |
| २२४ | " ८ | ठेवाववाचे | ठेवावयाचें |
| २४४ | शिरोरेखा | ६·२४[१] | ६·३०[१] |
| २४६ | " | ६·३६[प्र] | ६·३५[प्र] |
| २७२ | खालून ५ | द्वर्थी | द्यर्थी |
| २७६ | शेवटची | ब्रह्मापर्ण | ब्रह्मार्पण |

# प्रस्तावना

हिंदुस्थान सोडून पहिल्यानेंच परदेशीं जाण्यापूर्वीं मनुष्याची स्थिति कशी होते—सर्वपरीनें अपरिचित परिस्थितींत आपणांस काय अडचणी येतील याची बरोबर अटकळ करितां न आल्यानें उगीच नसती रुखरुख मनास लावून घेऊन जो भेटेल त्याला जे सुचतील ते प्रश्न विचारून तो ' प्रवासाची तयारी ' कशा रीतीनें करितो--याची प्रत्यक्ष अनुभवाशिवाय कल्पना होणें दुरापास्त आहे. एका सद्गृहस्थानें आम्हांस असा बुद्धिवाद सांगितला कीं परदेशीं मातृभाषा बोलण्याचा प्रसंग न आल्यानें तिचा विसर पडण्याचा फार संभव आहे; करितां तुम्हीं आपल्याबरोबर इंग्रजी-मराठी कोश अवश्य घेऊन जा. मीं त्याच्या या उपदेशाची थट्टाच केली; कारण एक दोन वर्षांच्या अनभ्यासानें दोन एक तपांच्या अभ्यासावर पाणी पडेल हें मला शक्यच वाटलें नाहीं. व सुदैवानें माझा तर्क खरा ठरला. तथापि मुंबईपासून लंडनपर्यंतच्या एका पंधरवड्याच्या प्रवासांत मातृभाषा बोलावयास न सांपडल्यामुळें अडखळणारे असे कांहीं विद्यार्थी मला भेटले, यावरून सदरील सद्गृहस्थाचा उपदेश अगदींच अनाठायीं होता असें म्हणतां येत नाहीं !

असली विसराळूपणाची लाट मजवर आल्यास काय उपाय योजावयाचे हें मीं अगोदरपासून ठरविलें होतें. माझ्या मतें अशा प्रसंगीं रामबाण उपाय म्हणजे एकाद्या कठीण इंग्रजी पुस्तकाचें मराठींत भाषांतर करणें. कार्लाइलचें ' फ्रान्स देशांतील राज्यक्रांति ' हें पुस्तक या कारणासाठीं मीं मुक्रर केलें होतें. पण लवकरच मला असें आढळून आलें कीं फ्रेंच व जर्मन भाषांशीं चांगला परिचय झाल्याशिवाय हें काम मनासारखें व्हावयाचें नाहीं. म्हणून हें भाषांतराचें काम पुढें ढकलणें प्राप्त झालें. नंतर अमेरिकेंतील 'हारवर्ड ओरियंटल सीरीज' करितां उत्तररामचरित हें संस्कृत नाटक तयार करीत असतां या नाटकाच्या आजपावेतों प्रसिद्ध झालेल्या आवृत्तींची, भाषांतरांची, व टीकात्मक निबंधांची याद करण्याचा प्रसंग आला त्यावेळीं आपल्या मराठी भाषेंत उत्तररामचरितासारख्या नाटकाचें परशुराम

पंत गोडबोल्यांनीं सुमारें ९० वर्षांपूर्वीं केलेलें एकच भाषांतर अस्तित्वांत आहे¹ व आज कैक वर्षें तेंही विकत मिळेनासें झालें आहे हें समजून सखेदाश्चर्य वाटलें; व शक्य तर आपणच ह्या संस्कृत नाटकाचें शब्दशः, व मुळांतील हृदयंगम प्रसंग व कवीचा भावार्थ खुलवून दाखविणाऱ्या टीपा जागोजाग घालून, भाषांतर करावें असें ठरविलें. प्रस्तुत पुस्तक हें या निश्चयाचें दृश्य फल होय.

१. या भाषांतराची पाहिली आवृत्ति १८५९ मध्यें व दुसरी १८८१ मध्यें निघाली होती. प्रस्तावनेंत परशुरामपंत म्हणतात–'मूळ संस्कृत ग्रंथाचें हें भाषांतर असें म्हटलें, परंतु केवळ शब्दास शब्द अशा रीतीनें केलेलें असें नाहीं. क्वचित् स्थळीं न्यूनाधिक्य केलें आहे. मूळग्रंथ गद्यपद्यात्मक आहे. त्याप्रमाणें ह्यांत ही गद्यांचे ठिकाणीं गद्यें आणि पद्यांचे ठिकाणीं पद्यें केलीं आहेत. श्लोकांचीं वृत्तें मूळ ग्रंथाप्रमाणेंच सर्व आहेत असें नाहीं; ज्या ठिकाणीं जसें साधलें त्या ठिकाणीं तसें केलें आहे......मूळग्रंथांत संस्कृत भाषा आणि बालभाषा अशा दोन प्रकारच्या भाषा आहेत, परंतु ह्या भाषांतरांत एक मराठी भाषा मात्र आहे. कोठें कोठें हवे तसे मराठी शब्द न सुचल्यामुळें निरुपाय होऊन संस्कृत भाषेंतले शब्द घेतले आहेत.' या भाषांतरांतून बरेच उतारे पूर्वींच्या मराठी क्रमिक पुस्तकांत घेतले असल्यानें निदान जुन्या पिढीला तरी परशुरामपंतांचे बरेच श्लोक परिचित झाले आहेत. या भाषांतराची तिसरी आवृत्ति केव्हां निघेल तेव्हां निघो, पण परशुरामपंतांचे कांहीं श्लोक तरी नवीन पिढीस अवगत असावेत एवढ्याच करितां मीं प्रस्तुत भाषांतराच्या टीपांतून त्यांतील कांहीं कांहीं वेचक श्लोक मुळांतील अनुक्रमांक ठेऊन दिले आहेत.

या भाषांतराशिवाय वामनशास्त्री इसलामपुरकर यांनीं 'करुणराघव' ह्मणून एक पुस्तक (१८८९ त) केलें आहे, व रा० रा० महादेव व्यंकटेश लेले यांनीं कांहीं वर्षांपूर्वीं विविधज्ञानविस्तारांत क्रमशः व पुढें एकत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलेला 'उत्तररामचरित सार व विचार' हाही एक निबंध आहे. ह्या दोन्ही पुस्तकांमध्यें मूळाचें शब्दशः संगतवार भाषांतर दिलें नसून मूळ कथेचा (विस्तृत) गोषवारा दिला आहे, व मधुन मधुन कवीचें हृद्गत प्रकट करणारी टीका व अन्य विवेचन आलें आहे. मला जरी या दोन्ही ग्रंथांतील सर्वच मुद्दे पटले नाहींत तरी दोन्ही प्रयत्न स्तुत्य आहेत व त्यांपासून मला पुष्कळ फायदा झाला आहे हें मीं प्रांजलपणें कबूल करितों.

मूळ ग्रंथाचें शब्दशः भाषांतर करण्याचा मीं प्रयत्न केला आहे. भास-कालिदासभवभूत्यादि महाकवींच्या ग्रंथांचें भाषांतर करण्याचा आव घालून मूळांत नाहींत अशीं शब्द वा वाक्यें मध्येंच घुसडून देणें अथवा मूळांतील कांहीं अवघड भाग भाषांतर बोजड होईल म्हणून वगळून टाकणें हा त्या प्राचीन कवींचा अक्षम्य उपमर्द होय असें मीं समजतों. शब्दशः भाषांतर करण्यामध्यें मूळाचा आटोपशीरपणा व भाषासौष्टव लुप्त होण्याचा पुष्कळ संभव असतो हें मला कबूल आहे. विशेषतः पद्यांसंबंधीं तर ही गोष्ट अगदीं खरी आहे. कवीनें योजिलेलें वृत्त, महत्वाचा शब्द महत्वाच्या ठिकाणीं घालणें वगैरे शब्दरचनेंतील बारीक खोंचा, अनुप्रासयमकासारखे शब्दालंकार, हेतुगर्भ विशेषणें, व इतर अर्थालंकार हे सर्व एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत उतरणें केव्हांही सर्वस्वीं अशक्य आहे. मग त्या भाषा संस्कृत व मराठी यांसारख्या परस्परांशीं निकट संबद्ध अशा कां असेनात. तथापि भाषांतरांत मूळांतील जितके गुण ठेवितां येतील तितके ठेवण्याचा प्रयत्न

कै० विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा 'कविपंचकां'तील भवभूतिवरचा निबंध प्रसिद्धच आहे, व तो सर्वांनीं एकवार तरी वाचावा. 'रंगभूमि' मासिक पुस्तकांत रा०सा० गोपाळ वामन बापट यांचाही एक उत्तररामचरितावर टीकात्मक लेख प्रसिद्ध झाला आहे.

अलीकडे (१९०९) रा० अनंत वामन बरवे यांनीं उत्तररामचरिताची एक संगीत रंगावृत्ति काढिली आहे; व 'सुमंत' कवीनीं त्याच उद्देशानें 'सीता-पुनर्वियोग' नामक नाटक रचिलें आहे (१९११). पण या दोन्ही प्रयत्नां-संबंधानें 'इदं च नास्ति परं च न लभ्यते' अशापैकींच प्रकार झाला आहे असें मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें.

१. तथापि ओळीनें शब्दास प्रतिशब्द ठेवणें, व वाक्यरचनेकडे आणि एकंदर भाषाशैलीकडे बुध्या दुर्लक्षच करणें याला कांहीं भाषांतर (translation) म्हणतां येणार नाहीं, शब्दान्तर (transvocabulation) म्हणतां येईल. अशा प्रकारचें 'शब्दान्तर' व मूळास नांवाचा आधार घेऊन व मध्यें बरेच स्वकपोलकल्पित शब्द, वाक्यें, व प्रसंगीं प्रवेशच्या प्रवेश घुसडून देऊन केलेलें 'रूपांतर' या दोन विरुद्ध कोटींच्या बरोबर मधून जाण्याचा मीं शक्य तितका प्रयत्न केला आहे.

करावा; व ज्या अर्थी शब्दांपेक्षां व इतर अवांतर गोष्टींपेक्षां अर्थाकडे विशेष लक्ष देणें जरूर होतें त्या अर्थी मीं मूळ पद्यांचें गद्यांतच भाषांतर करण्याचें ठरविलें. जे मनोविकार पद्यांतूनच व्यक्त झाले पाहिजेत त्यास गद्यांत आणण्यानें थोडा रसभंग होण्याचा संभव आहे हें खरें; पण त्यास नाइलाज आहे.

प्राचीन संस्कृत कवींच्या कृतींचें मराठींत अर्वाचीन वाचकांकरितां भाषांतर करावयाचें ह्मणजे भाषेंतील प्रत्येक लकब आजकालच्या गोष्टीं-सारखी साधली पाहिजे—मूळांत ‘ आर्यपुत्र आगतः ’ असें असेल तर त्याचें भाषांतर ‘ तिकडनं येणं झालं ’ असेंच केलें पाहिजे—असें मला वाटत नाहीं. एका सन्माननीय प्राचीन कवीचे शब्द आपण वाचीत आहों, आजच प्रसिद्ध झालेली ही चटकदार कादंबरी नव्हे, ही भावना जेणेंकरून जागृत होईल अशी भाषांतराची शब्दरचना असावी; व मीं ती तशी ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि कांहीं स्थळें कित्येकांस दुर्बोध, कित्येकांस नीरस, व कित्येकांस अप्रयोजक वाटण्याचा संभव आहे. अशा ठिकाणीं जे कोणीं योग्य सूचना करितील त्यांचा मीं अत्यंत ऋणी होईन.

हारवर्ड ओरियंटल सीरीजकरितां तयार केलेल्या आवृत्तींतील मूळ ते-वढें निराळें छापून त्याच्या कांहीं आवृत्ती जादा काढून विक्रीस ठेविल्या आहेत. तेंच मूळ आधारास घेऊन हें मराठी भाषांतर केलें आहे. श्लो-कांचें भाषांतर गद्यांत पण बीत ओळींवर छापिलें आहे व भाषांतराच्या शेवटीं श्लोकाचा अनुक्रमांक दिला आहे. श्लोकांचा अनुक्रम प्रत्येक अं-कास नवीन धरिला आहे; पाहिल्या अंकापासून शेवटच्या अंकापर्यंतचे सर्वच श्लोक एकाच अनुक्रमानें मोजिले नाहींत. दोन श्लोकांमधील गद्याचें भाषां-तर बीत नसलेल्या ओळींवर छापिलें आहे व ह्या ओळी दोन दोन टाकून तिसरी याप्रमाणें मोजिलेल्या आहेत. अशा रीतीनें टीपांमध्यें वगैरे कोणत्याही पुढच्या पाठीमागच्या भागाचा अचुक निर्देश करणें सुलभ झालें आहे. जसें; ३·५[प्र] म्हणजे तिसऱ्या अंकातील पांचव्या श्लोकाचा प्रथम चरण; ४·९[३] म्हणजे चवथ्या अंकांतील नवव्या श्लोकानंतरच्या गद्याची तिसरी ओळ; व ७·०[५] म्हणजे सातव्या अंकांतील आरंभींच्या ( श्लोक लाग-

ण्याच्या पूर्वींच्या ) गद्याची पांचवी ओळ.[1] भाषांतरांत अभिनयसूचना ( stage directions ) अर्धवर्तुळाकृति कंसांत घातल्या आहेत व भाषांतराचा भावार्थ अधिक स्पष्ट करण्याकरितां घातलेले पदरचे शब्द चौकोनी कंसांत ठेविले आहेत. पानाच्या शिरोरेखेंत समोरासमोरच्या दोन पानांत मिळून कोठपासून कोठपर्यंत भाग आला आहे हें दाखविण्याची योजना केली आहे. सारांश वाचकांचे त्रास जेणेंकरून कमी होतील व वेळ वांचेल अशा उपायांचें शक्य तेथें व शक्य तितकें अवलंबन केलें आहे.

भवभूतीच्या उत्तररामचरिताशीं माझा परिचय आज कमींत कमी पंधरा वर्षांचा आहे व ज्या कांहीं गुणामुळें प्रथम वाचनाचे वेळीं हें नाटक मला आवडलें तेच गुण त्या नाटकाचीं अनेकशः पारायणें झालीं तरी अजून मला तेथें व दर पारायणास अधिक स्पष्टपणें दृष्टोत्पत्तीस येतात. कैकवेळां तरी उत्तररामचरितानें माझ्या शारीरिक श्रमांचा परिहार केला आहे, मानसिक आधींचा विसर पाडिला आहे, व संक्षुब्ध मनोवृत्तींचें दमन करून मला स्वर्गीय आनंदसागरांत पोहावयास लाविलें आहे ! अशा प्रकारची दिव्य कामगिरी माझ्या संबंधांत आणखी एकाच व्यक्तीकडून झाली आहे, व त्याच व्यक्तीस—थोडी लोकलज्जा बाजूस सारून—हें भाषांतर मीं प्रेमपुरःसर अर्पण करीत आहें.

पुणें,<br>जून १९१९. } श्रीपाद कृष्ण बेलवलकर.

१. प्रत्येक श्लोकास चार चरण असल्यानें प्र, द्वि, तृ, च, या अक्षरांनीं त्यांचा निर्देश करितां येतो; व जेथें श्लोकाचा प्रत्येक चरण निरानिराळ्या ओळीवर असतो तेथें चरणाच्या निर्देशानें श्लोकाच्या छापलेल्या ओळीचाही निर्देश होतो. परंतु अनुष्टुभ् व आर्या आह्मी मुळांत दोन ओळींतच छापिल्या आहेत. या प्रत्येक ओळींत दोन दोन चरण आहेत म्हणून या वृत्तांतील ओळींचा निर्देश पू (पूर्वार्ध) अथवा उ (उत्तरार्ध) या अक्षरांनीं केला आहे.

# उपोद्घात

## भवभूतीचा कालनिर्णय व जीवनवृत्तांत

**१. भवभूतीनें स्वतःविषयीं दिलेली माहिती.**—सध्यां उपलब्ध असलेल्या आपल्या तिन्ही नाटकांच्या प्रस्तावनांमधून भवभूतीनें स्वतःविषयीं व स्वतःच्या कुटुंबाविषयीं थोडीबहुत माहिती दिली आहे. ही माहिती महावीरचरिताच्या प्रस्तावनेमध्यें ( कदाचित् तें कवीनें रचिलेलें प्रथम नाटक होतें म्हणून ) बरीच विस्तारानें आली आहे. मालतीमाधवाच्या प्रस्तावनेमध्यें ही सर्व माहिती असून त्याशिवाय, आपली पूर्वींची कृति लोकांस नापसंत झाली, किंबहुना त्यांनीं तिची अवज्ञा केली, म्हणून रागावून भवभूतीनेंही लोकांच्या पसंती नापसंतीची आपण मुळींच पर्वा करीत नाहीं असे बेफिकिरीचे—जवळ जवळ उद्दामपणाचे—उद्गार प्रकट केले आहेत.[1] कवि 'परिणतप्रज्ञ' ( उ०रा०च० ७.२०[च] ) झाल्यावर—त्याच्या नाट्यकौशल्याचा पूर्ण विकास झाल्यावर—रचिलेल्या उत्तररामचरित या नाटकाच्या प्रस्तावनेमध्यें तो स्वतःविषयीं अगदीं जरूर तेवढीच माहिती देत आहे, व तीही खोल पाण्यास शोभेल अशा संथपणानें. प्रस्तावनांतून आलेली ही माहिती थोडक्यांत अशी सांगतां येईल.

दक्षिण देशांत पद्मपूर नांवाचें एक शहर आहे. तेथें उदुंबर या आडनांवाचे काश्यप गोत्रीय ब्राह्मण राहतात. हे ब्राह्मण अग्निहोत्री असून सच्छील व पंक्तिपावन असे आहेत. ह्या उदुंबरांच्या कुळामध्यें

१. "आमच्या कृतीबद्दल जे कोणी आमची अवहेलना करून ती लोकांमध्यें पसरवितात त्यांचें ज्ञान कदाचित् आमचेहून निराळ्या तऱ्हेचें असूं शकेल; त्यांच्याकारितां हा आमचा प्रयत्न बिलकूल नाहीं. मजसारखे ज्याचे मनोधर्म आहेत असा कोणी तरी कोठें तरी असेल, अथवा पुढें केव्हांतरी उत्पन्न होईल; नाहीं असें नाहीं. कारण, पृथ्वी विस्तीर्ण आहे व कालही अनंत आहे." मालतीमाधव १.८.

महाकवि म्हणून एक पुरुष होऊन गेला. त्यानें वाजपेय[1] यज्ञ केला होता. ह्या महाकवीपासून पांचवा पुरुष, भट्ट गोपालाचा नातु व पुण्यशील नीलकंठभट्टाचा मुलगा श्रीकंठ नांवाचा आहे. हाच पुढें भवभूति[2] या संज्ञेनें प्रसिद्धीस आला व याच्या आईचें नांव जतुकर्णी ( लाखेप्रमाणें आरक्त कान आहेत जीचे ) असें आहे. भवभूति वेद, उपनिषदें, सांख्य, योग इत्यादि शास्त्रें पढला असून व्याकरण, अलंकार ( अथवा मीमांसा ) व तर्क या विषयांतही तो वाकबगार आहे. त्याच्या गुरूस ज्ञाननिधि हें अन्वर्थक नांव होतें. भवभूतीस स्वतः काव्याची अभिरुचि असून नटवर्गाशीं त्याची फार मैत्री आहे व म्हणूनच स्वतः रचलेलीं नाटकें प्रयोगाकरितां त्यानें अशा एका नटवर्गाच्या स्वाधीन करून ठेविलीं आहेत.

**२. भवभूतीचें मूळ गांव पद्मपूर कोठें आहे ?**—वरील हकीगतींत ज्याचा उल्लेख आला आहे तें दक्षिण देशांतील पद्मपूर कोणतें ? मालतीमाधवाच्या कांहीं हस्तलिखित प्रतींमध्यें पद्मपूर वऱ्हाडांत ( विदर्भेषु ) आहे असें स्पष्ट म्हटलें आहे. व ज्या अर्थी प्रस्तावनेंत पद्मपूर दक्षिणेकडे ( दक्षिणापथे ) आहे असें म्हटलें आहे त्या अर्थी ज्या कालप्रियनाथाच्या यात्राप्रसंगीं भवभूतीच्या नाटकांचे प्रयोग केले जात असत तो कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकालेश्वर असें म्हट-

१. अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशिन्, वाजपेय, अतिरात्र, आणि अप्तोर्याम असे सोमयागाचे सात प्रकार आहेत. त्यांपैकीं वाजपेय ब्राह्मणांस व क्षत्रियांसही करितां येतो व तो राजसूय यज्ञाहून श्रेष्ठ आहे. राजसूयानें केवळ राज्य मिळतें व वाजपेयानें साम्राज्य मिळतें. सर्वांमध्यें अग्रणी म्हणून जो समजला जातो त्यासच हा यज्ञ विहित आहे, तेव्हां भवभूतीनें ही गोष्ट अभिमानानें सांगावी हें साहजिक आहे.

२. भवभूति ह्मणजे भवापासून (शिवापासून) भूति (भस्म अथवा ऐश्वर्य) मिळाली आहे ज्यास तो. आख्यायिका अशी आहे कीं या कवीनें (याचें मूळचें पूर्ण नांव श्रीकंठ नीलकंठ उदुंबर असें होतें) 'भवभूति' हें पद असलेला एक श्लोक केल्यानंतर त्यास लोक भवभूति म्हणूं लागले. हा पद्यांश कित्येक ठिकाणीं ' सांबा पुनातु भवभूतिपवित्रमूर्तिः ' असा तर कित्येक ठिकाणीं ' गिरिजायाः कुचौ वन्दे भवभूतिसिताननौ ' असा दिला आहे.

ल्यास, वऱ्हाड उज्जयिनीच्या दक्षिणेस असल्यामुळें, प्रस्तावनेंतील सर्व स्थलनिर्देश सुसंगत लागतो. तथापि महावीरचरितामध्यें व खुद्द मालती-माधवाच्या इ. स. ११९६ त लिहिलेल्या एका प्रतीमध्यें ज्या अर्थी पद्मपूर वऱ्हाडांत आहे असा स्पष्ट उल्लेख नाहीं त्या अर्थी ही बाब किंचित् संदिग्धच राहते.

**३. पद्मपूर व मालतीमाधवांतील पद्मावती हीं एकच आहेत काय ?**—मालतीमाधवाचें कथानक पद्मावती नामक नगरींत घडून येतें. ह्या पद्मावतीच्या आसपासचा प्रदेश मालतीमाधवांत इतक्या सूक्ष्मपणें वर्णिला आहे कीं तेथें दिलेल्या नद्यांच्या वगैरे नांवावरून ह्या पद्मावतीचें ठिकाण माळव्यांतील नरवार ह्या शहराच्या किंचित् ईशान्येस असलेलें पवाया अथवा पोलापवाया नामक लहान खेडें होय असें रा. लेले यांनीं आपल्या ‘ उत्तररामचरित सार व विचार ’ ह्या निबंधांत ( पृष्ठ ९ ) सिद्ध केलें आहे. ह्या खेड्याच्या जवळच एका मोठ्या शहराचे अवशेष अजून दृष्टीस पडतात. तेव्हां प्रश्न असा कीं ही मालतीमाधवांतील पद्मावती व भवभूतीची जन्मभूमि जें पद्मपूर हीं एकच आहेत कीं काय ? हीं एकच मानलीं तर ज्याच्या यात्रेच्या प्रसंगीं भवभूतीचीं नाटकें केलीं गेलीं तो कालप्रियनाथ व उज्जयिनीचा महाकालेश्वर हे एक म्हणतां येणार नाहींत; कारण प्रस्तावनेप्रमाणें पद्मपूर कालप्रियनाथाच्या दक्षिण दिशेकडे असलें पाहिजे, व पद्मपूर=पद्मावती=पवाया अशी कल्पना केल्यास तें कालप्रियनाथाच्या (म्हणजे कल्पनेप्रमाणें उज्जयिनीच्या महाकालेश्वराच्या) उत्तरेस सुमारें २२० मैलांवर येतें. हा विरोध दूर करण्याकरितां यमुनेच्या तीरीं असलेलें काल्पी शहर हेंच कालप्रियनाथाच्या यात्रेचें ठिकाण अशी सदर रा. लेले यांची एक पुरवणी कल्पना आहे ( उत्तररामचरित सार व विचार, पृष्ठ ४ व ८४ पहा ). असें मानल्यास पवाया ( पद्मपूर ) काल्पीच्या ( कालप्रियनाथाच्या ) दक्षिणेकडे येतें. या वादाचा कायमचा निकाल देणें आमच्या मतें तूर्त शक्य नाहीं. पद्मावती व पद्मपूर अथवा काल्पी व कालप्रियनाथ यांमध्यें जितकें नामसादृश्य आहे तितकेंच जवळ जवळ कालप्रियनाथ व महाकालेश्वर यांमध्यें आहे. काल्पी येथें उज्ज-यिनीप्रमाणें एखादें पुरातन लिंग अथवा शंकराचें स्थान असल्याची

प्रसिद्धि नाहीं. शिवाय ज्या अर्थी कांहीं हस्तलिखित पोथ्यांत ‘ विदर्भेषु ’ हें पद आहे त्या अर्थी त्याला कांहीं तरी आधार असला पाहिजे असें गृहीत धरणें गैरवाजवी नाहीं. म्हणून आमच्या मनाचा कल भवभूतीचें वऱ्हाडांतच मूळ गांव होतें या मताकडे घेतो. मालतीमाधवांत पद्मावतीचें वर्णन इतकें अचूक व सविस्तर आहे म्हणून पद्मावती भवभूतीस बाल्या-पासून परिचित असावी, किंबहुना ती त्याचें मूळ गांव असावें ह्या विचार-सरणींत कांहींच राम नाहीं. कारण ज्या स्थळाचें कवीनें सूक्ष्म वर्णन केलें असेल तें त्या कवीचें मूळ गांवच असलें पाहिजे असें म्हटल्यास भयंकर अनवस्था होईल.

**४. भवभूतिविषयीं आणखी कांहीं किरकोळ माहिती.**—पद्मावती हें भवभूतीचें मूळ गांव असें मानण्यास जरी पुरेसा आधार नसला तरी पद्मावती भवभूतीच्या पूर्ण परिचयाची असली पाहिजे—तेथें त्याचें बरींच वर्षें वास्तव्य झालें असलें पाहिजे—यांत संशय नाहीं. कदाचित् मालतीमाधवांतील नायक माधव याप्रमाणेंच भवभूतिही पद्मा-वतीस आन्वीक्षिक्यादि शास्त्रें शिकण्यास ( मा० मा० १·१२[४] ) आला असावा व येथेंच त्याची नाटकमंडळींशीं मैत्री जमली असावी.[१] त्या कालीं नाटकमंडळींना अशा कवींची फार जरूर असे. जीं संस्कृत नाटकें प्रयोग-रूपानें त्यांना रंगभूमीवर आणावयाचीं असतील त्यांना काल, स्थल व प्रसंग यांस अनुरूप अशी एखादी नवीन प्रस्तावना[२] अथवा भरतवाक्य

१. भवभूतीचा जवळ जवळ समकालीन—अथवा त्याच्यापेक्षां किंचित् अगोदरचा—जो बाण त्याचें सुद्धां नटवर्गाशीं असेंच सूत जुळलें होतें असें हर्षचरि-तामध्यें (निर्णयसागर प्रत, पृष्ठ ४७) त्यानें कबूल केलें आहे.

२. संस्कृत नाटकाच्या छापील पुस्तकांत जी प्रस्तावना आपणांस आढळते ती त्या नाटकाच्या प्रथम प्रयोगाच्या वेळीं कवीनें स्वतः लिहिलेली होय. पण संस्कृत जाणणाऱ्या प्रेक्षकांपुढें त्यानंतर केल्या गेलेल्या प्रयोगांमध्यें मूळ प्रस्तावनेंतीलच काल, स्थल व प्रसंग यांचा उल्लेख कायम ठेवला जात असे-लसें संभवत नाहीं. प्रस्तावनेमध्यें व भरतवाक्यामध्यें थोडेबहुत फरक होत असतीलच. मृच्छकटिक नाटकाच्या प्रस्तावनेंत तरी निदान असा फरक खास केला असावा. एरवीं प्रस्तावनेंत कवीच्याच मृत्यूचें वर्णन ( श्लोक ४ ) येतें ना.

जोडावयाचें असलें, अथवा एखाद्या नवशिक्या नाटककारानें रचिलेलें नाटक कोठें कोठें सुधारावयाचें असलें, ह्मणजे तें काम नटवर्ग आपल्या परिचयाच्या कवीकडून ( त्यास अल्पस्वल्प मोबदला देऊन ) करून घेत. व अशा रीतीनेंच बहुधां भवभूतीस नाट्यकलेचा शोक लागला असावा. कदाचित् जरूरीच्या वेळीं भवभूतीनें कांहीं नाटकांत नटाचें काम सुद्धां केलें असेल.[१] तें कसेंही असो. लवकरच भवभूतीची या नाटकमंडळी-वर इतकी छाप बसली कीं त्याचीं स्वतःचीं नाटकें त्यांच्याकडून प्रयोग-रूपानें रंगभूमीवर येऊं लागलीं व अशा रीतीनें भवभूति नाटक-कार बनला.

भवभूतीची सांपत्तिक स्थिति म्हणण्यासारखी चांगली नव्हती; तेव्हां त्याला नाटकें करणें हें जवळ जवळ उपजीविकेचें एक साधनच झालें असलें पाहिजे. आपल्या विद्वत्तेचें व नाट्यकलेचें लोकसमाजाकडून चीज होत नाहीं याबद्दल त्याला फार दुःख होई; व या दुःखाच्या भरांत काढिलेले निराशेचे उद्गार त्याच्या तीन्ही नाटकांमध्यें कमीअधिक प्रमा-णानें आले आहेत. महावीरचरित हें पहिलेंच नाटक असल्यानें त्यामध्यें त्यानें विशेष कांहीं म्हटलें नाहीं; मालतीमाधवांतील त्याचे शब्द वर ( पृष्ठ १९ टीप १ ) दिलेच आहेत. नाट्यकला पूर्ण वश झाल्यानंतर लिहिलेल्या उत्तररामचरित या नाटकांत सुद्धां ( प्रस्तावना श्लोक ९ ) लोकांच्या गुणानभिज्ञतेबद्दल त्यांना कवीनें दुरून एक टोमणा मारण्यास कमी केलें नाहीं. मात्र यावेळीं त्याची स्थिति जरा सुधारली होती–त्याच्या दीर्घ परिश्रमाचें त्याला फळ मिळालें होतें–असें ह्मणण्यास जागा आहे.

यावरून पहातां भवभूतीस राजाश्रय मुळींच नव्हता, अथवा असल्यास तो त्याच्या आयुष्याचे अखेरीला व अगदीं जुजबी मिळाला होता असें अनुमान होतें. पुढें § ९ पहा. भोजप्रबंधासारख्या पुस्तकांतून कालिदास

१. पुढें उ० रा० च० अंक ७ अखेर कुशलवांसहित वाल्मीकीच्या प्रवेशाचे वेळीं अरुंधती रंगभूमीवरून निघून जाते त्या ठिकाणीं मराठी भाषांतरास आम्हीं जी टीप जोडली आहे ती पहा.

व भवभूति याच्यासंबंधानें ज्या दंतकथा आल्या आहेत त्या अर्थात् अगदीं निराधार होत.

अशा रीतीनें दारिद्र्यामध्यें काळ कंठणें जरी भवभूतीच्या नशिबीं आलें होतें तरी चारुदत्ताप्रमाणें ( मृच्छकटिक ३·२८ ) दोन बाबतींत त्याची स्थिति स्पृहणीय होती. त्याला मित्र वश होते व त्याला कौटुंबिक सुख चांगलें लाधलें होतें. मैत्री, दांपत्यप्रेम, पुत्रवात्सल्य, इत्यादिकांबद्दल भवभूतीनें जे उदात्त विचार आपल्या नाटकांतून जागोजाग घातले आहेत तेच याची साक्ष पटवितील. उदाहरणार्थ, उत्तररामचरित १·३८, ३९; ३·१८; मालतीमाधव ६·१८; महावीरचरित ५·५९; वगैरे स्थळें पहा.[1] स्त्रियांसंबंधानें भवभूतीचे विचार तर फारच वरच्या दर्जाचे आहेत. कालिदासाचे सर्व नायक बहुपत्नीक आहेत; भवभूतीची त्याच्या उलट स्थिति आहे. भवभूतीच्या कालीं स्त्रियांस त्या वेळच्या ' युनिव्हर्सिटच्यांतून ' पुरुषांबरोबर शिक्षण दिलें जात असावें असें दिसतें.[2] अर्थात् त्यावेळीं सर्वच स्त्रिया बहुश्रुत होत्या असें जरी यावरून निष्पन्न होत नाहीं तरी निदान भवभूतीचे विचार या बाबतींत कोते व अनुदार नव्हते असें आपणांस म्हणतां येईल. भवभूति स्वतः जाडा विद्वान् होता. हें तर त्यानें मुद्दाम होऊन जगाच्या निदर्शनास आणण्याचा मधून मधून प्रयत्न केला आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे भवभूतीचीं उपलब्ध नाटकें वाचल्यानंतर त्यावरून भवभूति हा कसल्या तऱ्हेचा मनुष्य होता

१. मालतीमाधव अंक ६, श्लोक १८—

"वत्सांनो, तुह्मीं नीट ध्यानांत ठेवा कीं स्त्रियेला पति व पतीला आपली धर्मपत्नी म्हणजे एक अत्यंत जिव्हाळ्याचा मित्र आहे; ( आई, बाप, भाऊ, बहीण ) सर्व नातीं तेथें एकवटलेलीं असतात; तेथें सर्व मनोरथांची परमावधि होते; तो एक अमोल्य ठेवा आहे, किंबहुना जीवितसर्वस्व आहे ! "

महावीरचरित अंक ५, श्लोक ५९—

" प्रसंगीं प्राण वेंचूनही त्याचें हित साधणें; त्याशीं कधीं द्रोह अथवा कपट न करणें; आणि आपण स्वतःचें जसें प्रिय करूं तसें त्याचें प्रिय करणें; हें मैत्रीरूप महा व्रत आहे."

२. पुढें § १८ क पहा.

याची जर अटकळ बांधण्याचा प्रयत्न केला[1] तर एका मध्यम स्थितींतील प्रेमळ, पापभीरु, सत्वशील, व विद्वान् ब्राह्मणाचें चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें रहातें.

**५. भवभूतीचा कालनिर्णय; भवभूति व कालिदास.**— निव्वळ दंतकथांवरून[2] पाहिलें तर भवभूति व कालिदास हे समकालीन असून उभयतां भोजराजाच्या ( अथवा विक्रमादित्याच्या ) दरबारीं होते असें मानावें लागतें. पण या दंतकथांवर अवलंबून रहातां येत नाहीं. अंतर्गत पुराव्यावरून पहातां भवभूतीनें कालिदासाचे काव्यनाटकादि ग्रंथ वाचले होते व आपल्या स्वतःच्या ग्रंथांत त्यानें कालिदासाचें अनेक ठिकाणीं अनुकरण केलें आहे असें उघड दिसून येतें. कालिदासाच्या शाकुंतलाची मूळ कथा महाभारतांतली आहे, त्याचप्रमाणें त्याच्या विक्रमोर्वशीयास खुद्द ऋग्वेदाचा ( १० · ९५ ) आधार आहे, ही गोष्ट लक्षांत घेतां, भवभूतीनें मालतीमाधवामध्यें ( २·७[10], ३·३ ) दुष्यंत व शकुंतला, पुरूरवा व उर्वशी, इत्यादि प्रसिद्ध कथांचा जो नामनिर्देश केला आहे तो कालिदासाच्या या दोन नाटकांसच अनुलक्षून आहे असें निश्चयानें म्हणतां येत नाहीं. तथापि कालिदासाच्या व भवभूतीच्या नाटकांचा एकंदरीनें विचार करितां त्यांमध्यें संविधानकाचें, कल्पनांचें, व शब्दांचें सुद्धां बरेंच साम्य आहे असें आढळून येतें. उदाहरणार्थ विक्रमोर्वशीय

१. अर्थात् ही अटकळच आहे हें विसरतां कामा नये.

२. या प्रचलित आख्यायिकांपैकीं भवभूतीच्या उत्तररामचरितासंबंधाची जी एक आहे ती आम्हीं येथें देतों. विक्रमादित्य राजाच्या पदरीं कालिदास राहिला असतांना एके दिवशीं त्याजकडे एक गरीब ब्राह्मण कवि आला. हा कवि म्हणजे भवभूतिच. त्यानें आपण नुकतेंच रचिलेलें उत्तररामचरित हें नाटक त्यास वाचून दाखविलें व राजाजवळ आपल्याबद्दल एक शब्द टाकावा अशी त्यास विनंति केली. कालिदास या वेळीं सोंगट्यांनीं खेळत होता. तथापि त्यानें खेळतां खेळतां तें नाटक ऐकिलें व एका बिंदूशिवाय सर्व नाटक फार सुबक साधलें आहे असा आपला अभिप्राय दिला (पुढें १·२७ वरील टीप पहा); व भवभूतीस जेव्हां ती सुधारणा मान्य झाली तेव्हां त्यानें त्यास राजाश्रय देवविला. कालांतरानें भवभूति कालिदासाप्रमाणेंच मानमान्यतेस पावला,

अंक ४ मधील प्रीतीनें बेहोष झालेल्या पुरूरव्याचें भाषण, व तसल्याच स्थितींत मालतीमाधव अंक ९ मधील माधवाचें भाषण, आणि विशेषतः त्यानें मेघास प्रियेकडे संदेश देऊन पाठविणें ( मा० मा० ९.२५, २६ मेघदूत[१] १०, ८०, ११९, ११८, ९ वगैरे ); शाकुंतलाच्या ४ थ्या अंकांतील काश्यपाचा, व उत्तररामचरिताच्या ४ थ्या अंकांतील जनकाचा आपआपल्या कन्येसंबंधीं विलाप;[२] विरहोत्तर दुष्यंतास आपल्या मुलाची हळूं हळूं ओळख पटत जाते तो शाकुंतलाच्या सातव्या अंकांतील प्रसंग, व रामास कुशलवांची ओळख पटते तो उत्तररामचरिताच्या ६ व्या अंकांतील प्रसंग; शकुंतला आणि दुष्यंत अथवा उर्वशी आणि पुरूरवा यांची परस्परांच्या प्राप्तिकरितां झालेली उत्कंठातुर स्थिति व त्या स्थितींत त्यांनीं योजिलेले ( चित्रें काढणें वगैरे ) उपाय, व मालती आणि माधव अथवा मदयंतिका आणि मकरंद यांची जवळ जवळ त्याच सारखी स्थिति व उपाय;[३] इत्यादि अनेक स्थूल सादृश्यें वर वर पहाणाऱ्यासही दिसून येतील. कल्पनांचीं व शब्दांचीं साम्यें आहेत तीं निराळींच.[४] ह्या सर्व गोष्टी विचारास घेतां भवभूतीनें कालिदासाचें अनेक ठिकाणीं जाणून बुजून—त्यावर वरचढ करण्याच्या हेतूनें—अनुकरण केलें

१. प्रोफेसर पाठकांची प्रत. कालिदासानें मेघदूतांत योजिलेलें मंदाक्रांता वृत्तच भवभूतीनें येथें मुद्दाम योजिलें आहे.

२. कन्या सासरीं जाण्यास निघाली एवढ्याच करितां काश्यपाचा विलाप आहे; पण जनकाच्या विलापाचें कारण कन्येचा मृत्यु व मृत्यूहूनही भयंकर जनापवाद, अर्थात् जनकाचा शोक अधिक तीव्र आहे.

३. कालिदास व भवभूति या दोघांनींही हे उपाय सांप्रदायिक अथवा कविसमयसिद्ध ह्मणून अंगिकारिले आहेत.

४. कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं "संस्कृत कविपंचकांतील" भवभूतिवरच्या आपल्या निबंधांत कांहीं असलीं साम्यें दाखविलीं आहेत. आमच्या हारवर्ड ओरियंटल सीरीजकरितां तयार केलेल्या उत्तररामचरिताच्या आवृत्तीच्या एका परिशिष्टांत हीं सर्व साम्यें एकवटून पहावयास सांपडतील.

होतें व म्हणून तो कालिदासानंतर केव्हां तरी झाला असावा असें म्हणणें भाग पडतें.[1]

पण ज्या अर्थीं खुद्द कालिदासाच्या कालासंबंधानें मतभेद आहे[2] त्या अर्थीं हा पुरावा भवभूतीच्या कालनिर्णयास साक्षात् लागूं पडत नाहीं.

१. दोन कवींमध्यें अथवा लेखकांमध्यें केवळ भाषासादृश्य आहे ह्मणूनच ते जवळ जवळ समकालीन--फार झालें तर एक दोन पिढ्या पुढें मागें—असले पाहिजेत असा जो एक कोटिक्रम करण्यांत येतो तो भ्रामक आहे. दोन समकालीन ग्रंथकारांची भाषाशैली जशी भिन्न असूं शकते तशी ज्यांच्यामध्यें शतकांचें अंतर आहे अशा दोन ग्रंथकारांची भाषाशैली सुद्धां सारखी असूं शकते. तेव्हां भवभूति व कालिदास यांपैकीं एकाचा कालनिर्णय झाला म्हणजे दुसऱ्याचाही जवळ जवळ झालाच असें म्हणणें चुकीचें आहे. उदाहरणार्थ समजा आपण भवभूतीस इ०स० ७००च्या सुमारास घातलें तर उभयतांमध्यें भाषासादृश्य आहे सबब कालिदासास इ० स० पू० ५७ च्या सुमारास नेतां येणार नाहीं, अथवा कालिदासास आपण इ०स० ४५०च्या सुमारास घातलें तर त्याच सबबीवर भासास इ०स० पू० ३०० च्या सुमारास नेतां येणार नाहीं, हीं दोन्हींही विधानें न्यायशास्त्रास अनुसरून नाहींत.

२. सुदैवानें या मतभेदाची मर्यादा एकेकालीं जेवढी विस्तृत होती ( इ० स० पू० ५७ ते इ० स० ११०० ) तेवढी आतां राहिली नाहीं. ऐहोळें येथील इ०स० ६३४।५ च्या शिलालेखांत कालिदासाचा स्पष्ट उल्लेख आहे (इंडियन् अँटीकरी ८, पृ० २३९) व हर्षचरितांत बाणकविही ( इ०स० ६१०सुमारें) त्याचा उल्लेख करितो ह्मणून ६००नंतर कालिदासास ओढितां येत नाहीं. दंतकथेप्रमाणें विक्रम संवत्सराचा संस्थापक जो विक्रमादित्य (इ० स०पू० ५७) त्याच्या पदरीं कालिदास होता. पण कालिदासाच्या रघुवंशामध्यें ( ४.६७,६८ ) वङ्क्षु (=व०क्षु=वक्षु=वक्षू=Oxus ) तीरवासी हूणांचा रघूनें पराभव केल्याचा उल्लेख आहे व त्यावरून प्रोफेसर काशिनाथपंत पाठक यांनीं सिद्ध केल्याप्रमाणें ( इंडियन् अँटीकरी, नोव्हेंबर १९१२, पृष्ठें २६५ ते २६७) रघुवंशाचा हा भाग कालिदासानें इ०स० ४५५ च्या किंचित् पूर्वी केव्हां तरी लिहिला असला पाहिजे. त्या वेळीं राज्य करित असलेल्या गुप्तवंशीय स्कंदगुप्तानें विक्रमादित्य ही पदवी धारण केली असल्यानें या मताप्रमाणें दंतकथेची सुद्धां थोडीबहुत उपपत्ति लागते.

**६. भवभूतीचा कालनिर्णय; भवभूति व बाणकवि.**—कनोजचा हर्षवर्धन यानें इ० स० ६०६–६४८ पावेतों राज्य केलें. याचा आश्रित बाणकवि हा होता हें त्या कवीनेंच रचिलेल्या हर्षचरितावरून

याविरुद्ध दंतकथेप्रमाणें कालिदास इ० स० पूर्वीं पहिल्या शतकांतच होता असें आमच्यांपैकीं बऱ्याच विद्वानांचें मत आहे. कोल्हापूरचे प्रोफेसर रघुनाथराव आपटे यांनीं या मताच्या पुरस्करणार्थ अनेक पुरावे दिले आहेत. (See V. N. Mandlik Gold-medal Prize-essay for 1891, published by the University of Bombay). हूणाच्या उल्लेखासंबंधांत त्यांचे मुख्य मुद्दे दोन आहेत. एक, महाभारतांत सुद्धां हूणांचा उल्लेख आहे (जसें भीष्मपर्व ९.६६ वगैरे); दोन, इ०स० पू० तिसऱ्या शतकापासून हूणांचें मध्य आशियांत राज्य असल्याचें समजतें. पण महाभारतांतील कोणताही उल्लेख ऐतिहासिक प्रमाण ह्मणून पुढें आणितां येणार नाहीं; व हूणांचें राज्य इतरत्र कोठेंही असलें तरी Oxus नदीवर त्यांचा ताबा इ०स० च्या पांचव्या शतकाच्या पूर्वीं असल्याचें प्रसिद्ध नाहीं. शिवाय ज्या विक्रमसंवत्सराचा संस्थापक विक्रमादित्य कालिदासाचा आश्रयदाता ह्मणून दंतकथा सांगते त्या विक्रमसंवत्सरानें ज्यांत कालगणना आहे असे जुन्यांत जुने शिलालेख म्हणजे इ० स० ४७२।३ चा मंदसोरचा ( Gupta Inscriptions, 1888, p. 83) व अलीकडे तेथेंच सांपडलेला इ० स० ४०४चा ( Progress Report of Archaeological Survey, Western Circle, for 1912–1913, p. 58; or Ind. Ant. for June 1913, pp. 161-163 ). या दोन्हीं स्थळीं ‘ विक्रमसंवत्सराच्या ’ ऐवजीं ‘ मालवगणस्थित्या,’ ‘मालवगणाम्नात’ असे शब्द आहेत. म्हणजे विक्रमादित्य ह्मणून कोणी होता व त्यानें इ० स० पू० ५६।५७ या वर्षीं आपल्या नांवानें एक शक स्थापिला या म्हणण्यासच आधार रहात नाहीं. विक्रमसंवत्सराचा प्रत्यक्ष नामनिर्देश ज्यांत आहे असा जुन्यांत जुना शिलालेख इ. स. ८४२ चा होय ( इंडियन् अँटीक्वरी १९, पृ० ३५ पहा. )

कालिदासाच्या कालासंबंधानें आणखीही एक दोन पक्ष विचारांत घेण्याजोगे आहेत; व या व पूर्वीं दिलेल्या पक्षांच्या समर्थनार्थ आम्ही सांगितले याहून अन्य अनेक पुरावेही त्या त्या पक्षाकडून पुढें आलेले आहेत. पण ते सर्व गौण आहेत. एकंदरींत सर्व मुद्यांचा विचार करितां स्थूलमानानें इ० स० ४५० हा कालिदासाचा समय निश्चित करण्यास विशेष हरकत नाहीं.

समजतें. हर्षवर्धनाच्याच दरबारीं प्रख्यात चीन देशचा प्रवासी ह्युएन-त्सँग हा आला होता.[१] हर्षचरिताच्या उपोद्धातामध्यें बाणानें सुबंधु, भट्टारहरिचंद्र, सातवाहन, प्रवरसेन, भास, कालिदास, गुणाढ्य, आढ्य-राज, इत्यादि त्याला माहीत असलेल्या प्रसिद्ध प्राचीन व अर्वाचीन काव्य, नाटक व आख्यायिकाकारांचा उल्लेख केला आहे. पण यांमध्यें भवभूतीचा नामनिर्देश नाहीं. याचीं कारणें अनेक असूं शकतील. भवभूति हा बाणानंतर–निदान बाणाच्या हर्षचरितानंतर–झाला असेल, अथवा भवभूति बाणाच्या समकालिन वा त्याच्या पूर्वींचा असून सुद्धां बाणास माहीत नसेल, अथवा माहीत असूनही त्याचा मुद्दाम नामनिर्देश करण्या-इतकें बाणास त्याचें महत्त्व वाटलें नसेल. उदाहरणार्थ ह्या हर्षचरिताच्या उपोद्घातामध्यें वाल्मीकिसारख्या आद्यकवीचें नांव आलेलें नाहीं. पण बाणानें आपल्या कादंबरीमध्यें रामायणाचा अनेकशः उल्लेख केलेला आहे.[२] अन्य पुराव्यावरून बाणापेक्षां भवभूतीचें अर्वाचीनत्व सिद्ध झाल्यास बाणानें भवभूतीचें नांव वगळणें हें एक त्या कालनिर्णयास दुजोरा देणारें दुय्यम प्रतीचें प्रमाण होणार आहे, एवढेंच.

**७. भवभूतीचा कालनिर्णय; भवभूति व कुमारिलभट्ट.**—भवभूतीच्या मालतीमाधवाची एक सुमारें ४०० वर्षांची जुनी प्रत रा. लेले, 'उत्तररामचरित सार व विचार' इत्यादि पुस्तकांचे कर्ते, यांच्या अवलो-कनांत आली होती. या प्रतीच्या तिसऱ्या अंकाच्या अखेर 'इति श्री-भट्टकुमारिलशिष्यकृते मालतीमाधवे तृतीयोऽङ्कः' व सहाव्या अंकाच्या अखेर ' इति श्रीकुमारिलस्वामिप्रसादप्राप्तवाग्वैभवश्रीमंदुवेकाचार्यविरचिते मालतीमाधवे षष्ठोऽङ्कः ' अशा दोन पुष्पिका ( colophons ) आल्या आहेत. इतर पुष्पिकांतून व ग्रंथांतीं भवभूतीचेंच नांव आहे. 'गउडवहो' या प्राकृत काव्याचे संशोधक कै० शंकर पाडुरंग पंडित यांनींही ही प्रत पाहिली होती, असें 'गउडवहो' काव्याच्या उपोद्घातांत ( pages ccv. and ff. ) म्हटलें आहे.

१. मराठी वाचकांस हर्षवर्धनाची समग्र माहिती कै० पां० गो० पारखीशास्त्री यांनीं लिहिलेल्या ' श्रीहर्ष ' या निबंधांत पहाण्यास मिळेल.

२. कादंबरी पृ. ५१ पं. १५, पृ. ९१ पं. १०, वगैरे (पिटर्सनची प्रत).

या पुष्पिकांवरून खालील अनुमानें काढितां येतील—एकतर, भवभूति हा खरोखरच प्रसिद्ध मीमांसक कुमारिलभट्ट याचा साक्षात् शिष्य असावा व उंवेकाचार्य हें श्रीकंठ या नांवासारखेंच ( पृष्ठ १६ टीप २ ) भवभूतीचें दुसरें नांव असावें. अथवा दुसरें, मालतीमाधवाचा तिसरा व सहावा हे दोन अंक भवभूतीचे नसून कुमारिलभट्टाचा शिष्य उंवेकाचार्य याच्या हातचे असावेत. भवभूतीनें कदाचित् हे अंक लिहिले असतील, पण सुब्रह्मण्य कवीस ज्याप्रमाणें महावीरचरिताचे भवभूतीनें रचिलेले शेवटचे सुमारें अडीच अंक न आवडून त्यांच्या ऐवजीं त्यानें दुसरे अडीच अंक आपण स्वतः रचून घातले,[१] त्याप्रमाणेंच ह्या दोन अंकाचा प्रकारही असूं शकेल.

पण हे सर्व तर्कवितर्क वास्तविक अस्थानीं आहेत. एकाच हस्तलिखित प्रतींत मालतीमाधवाच्या कर्त्यास कुमारिलभट्टाचा शिष्य म्हटलें आहे. पण हा निव्वळ लेखकाचा प्रमाद असूं शकेल. उदाहरणार्थ; आमच्या अवलोकनांत आलेल्या एका उत्तररामचरिताच्या हस्तलिखित प्रतींत भवभूतीचें नांव श्रीकंठाच्या ऐवजीं शीलकंठ असें चुकुन पडलें आहे. तसेंच मालतीमाधवाच्या नेपाळांतील अत्यंत जुन्या म्हणजे इ. स. ११९६ मध्यें लिहिलेल्या एका हस्तलिखित प्रतींत दहाव्या अंकाच्या शेवटीं 'कृतिरियं महाव[क]वेर्भूगर्भस्य' अशी पुष्पिका आहे. पण शीलकंठ अथवा भूगर्भ हीं तेवढ्यानें कांहीं भवभूतीचीं आणखी दुसरीं टोपण नांवें होऊं शकत नाहींत.

भवभूति व कुमारिल हे दोघेही दाक्षिणात्य होते. कुमारिलाचा समय प्रो. पाठक यांनीं निश्चित केल्याप्रमाणें ( Journal, BBRAS, vol. xviii, pp. 213–238 ) सुमारें इ. स. ७००–७५० हा आहे. तसेंच भवभूतीस मीमांसा अवगत असावी असें त्याच्या नाटकांत आलेल्या शास्त्रीय परिभाषेच्या उल्लेखांवरून सिद्ध होतें. तेव्हां वर नमूद केलेल्या अपुऱ्या पुराव्यावरून ज्या कोणास भवभूति हा कुमारिलभट्टाचा प्रत्यक्ष शिष्य होता असें मानावयाचें असेल त्यास कालाची

१. महावीरचरित, निर्णयसागर प्रत, पृ. २१३ वरील टीप पहा.

अथवा इतर तात्त्विक अडचण कोणतीही नाहीं एवढेंच फार झालें तर म्हणतां येईल.

**८. भवभूतीचा कालनिर्णय; भवभूति व राजशेखर.**—कर्पूर-मंजरी, विद्धशालभंजिका, बालभारत, बालरामायण, इत्यादि नाटकांचा कर्ता राजशेखर हा स्वतःस महेंद्रपालाचा गुरु अथवा उपाध्याय म्हणवितो. हा महेंद्रपाल कनोज येथें राज्य करीत होता व त्याचे इ. स. ९०३।४, ९०७।८ चे शिलालेख उपलब्ध आहेत ( Kielhorn, Epigraphica Indica i. 171 ). यावरून राजशेखर इ. स. ९०० चे सुमारास होऊन गेला हें सिद्ध होतें. राजशेखर आपल्या बालरामायणांत ( १-१६ ) म्हणतो, " पूर्वीं वाल्मीकि नामक कवि होऊन गेला; तोच पुढें भर्तृमेण्ठ नामक कवीचें रूप घेऊन जन्मला, व कालांतरानें भवभूति या नांवानें पुनः होऊन आला; आणि तोच [ वाल्मीकि ] राजशेखर या संज्ञेनें सांप्रत अवतीर्ण झाला आहे ". येथें उल्लेखिलेला 'भवभूति' प्रसिद्ध भवभूतिच होय. राजशेखरानें भवभूतीच्या नाटकांतील प्रसंगांचें अनेक ठिकाणीं अनुकरण केलें आहे. जसें; चित्रदर्शन ( उत्तररामचरित अंक १ व बालरामायण अंक ४ ), गर्भनाटक ( उत्तररामचरित अंक ७ व बालरामायण अंक ३ ), शिक्षणार्थ पर्यटन करणारा विद्यार्थी ( उत्तररामचरित अंक २ व बालरामायण अंक ४, विष्कंभक), वगैरे. बालरामायणांत एके ठिकाणीं ( ४·४१[७] ) तर 'महावीरचरित' या भवभूतीच्या नाटकाचा प्रत्यक्ष पण श्लेषगर्भ उल्लेख आहे. यावरूनही राजशेखराच्या मानानें भवभूतीचें प्राचीनत्व दिसून येतें. व एका अवताराची समाप्ति झाल्यानंतरच दुसरा अवतार होतो हें लक्षांत आणिलें म्हणजे भवभूतीस इ. स. ८९० च्या पुढें आणितांच येत नाहीं.

**९. भवभूतीचा कालनिर्णय; भवभूति व वाक्पतिराज.**—गउडवहो ( संस्कृत, गौडवधः ) या नांवाचें एक प्राकृत काव्य बप्पइराअ (सं०, वाक्पतिराज) या कवीनें केलें आहे; व या काव्यामध्यें वाक्पतिराज आपला आश्रयदाता जो कनोजचा राजा यशोवर्मा यानें गौडदेशच्या राजाचा वध कसा केला याचें वर्णन देत आहे—निदान असें वर्णन

देण्याचें त्यानें योजिलें होतें.[1] या यशोवर्म्याचा पुढें काश्मीरच्या ललितादित्य–मुक्तापीड यानें पराभव केला असें कल्हणाच्या राजतरंगिणीवरून समजतें. राजतरंगिणीप्रमाणें ललितादित्याचा राज्यकाल इ. स. ६९९–७३९ हा आहे; व अर्थात् ललितादित्यानें केलेला यशोवर्म्याचा पराभव ७३९ पूर्वीं केव्हां तरी झाला असला पाहिजे. परंतु कल्हणाच्या या तारखा २९ एक वर्षांनीं चुकलेल्या आहेत ( स्टाइन्चें राजतरंगिणीचें इंग्रजी भाषांतर, उपोद्घात § ६६ पहा ), व यशोवर्म्याचा हा पराभव इ. स. ७३६ नंतर केव्हांतरी झाला होता हें अन्य पुराव्यांनीं सिद्ध झालें आहे ( सदर उपोद्घात § ८९ ). यावरून वाक्पतिराजही इ. स. ७३६ च्या आसपास केव्हांतरी झाला असला पाहिजे.

राजतरंगिणीच्या ज्या श्लोकामध्यें[2] यशोवर्म्याच्या पराभवाचा उल्लेख आहे त्याच श्लोकांत वाक्पतिराज व भवभूति हे यशोवर्म्याच्या पदरीं कवी होते असें म्हटलें आहे. वाक्पतिराज हा अर्थात् गउडवहोचा कर्ता; पण भवभूति म्हणजे आपलाच भवभूति कीं कोण? भवभूतीच्या उपलब्ध ग्रंथावरून पाहतां त्याला विशेषसा राजाश्रय असेल असें दिसत नाहीं; व राजतरंगिणींत ज्या अनुक्रमानें वाक्पतिराज आणि भवभूति यांचा नामनिर्देश केला आहे तो जर कवीनें मुद्दाम व व्याकरणाच्या नियमास अनुसरून केला असेल तर त्यावरून भवभूति हा वाक्पतिराजाहून अर्वाचीन अथवा निदान कमी महत्त्वाचा असें ठरतें.

१. असें म्हणण्याचें कारण गउडवहो हें काव्य अपूर्ण आहे. त्यामध्यें १२०० वर श्लोक आहेत तरी ते सर्व पुढें करावयाच्या काव्याची एक लांबलचक प्रस्तावनाच आहे. ज्या गौड राजाचा वध ह्या काव्याचा विषय आहे त्याचें नांवही या १२०० श्लोकांत एकदां सुद्धां आलें नाहीं! काव्य संपण्यापूर्वींच काव्याचा नायक यशोवर्मा याचा काश्मीरच्या ललितादित्यानें पराभव केल्यामुळेंच बहुधा वाक्पतिराजानें हें काव्य अपूर्ण ठेविलें असावें.

२. हा श्लोक असा—

कविवाक्पतिराजश्रीभवभूत्यादिसेवितः ।
जितो ययौ यशोवर्मा तद् (ललितादित्य)गुणस्तुतिवन्दिताम् ॥
रा. त. ४·१४४.

पण उलटपक्षीं वाक्पतिराज आपल्या गउडवहोमध्यें भवभूतीचा सन्मानपुरःसर उल्लेख करितो,[1] व त्यास जवळ जवळ आपल्या गुरूचा मान देतो; व जरी त्यावरून वाक्पतिराज हा भवभूतीचा साक्षात् शिष्य होता किंवा भवभूतीचे ग्रंथ वाचून वाक्पतिराजास काव्यस्फूर्ति झाली याचा निकाल होत नाहीं तरी हा भवभूति वाक्पतिराजापूर्वीं होऊन गेला असावा एवढें तरी म्हणतां येईल.

तर मग उत्तररामचरितादि नाटकांचा कर्ता भवभूति हा एक, वाक्पतिराजानें गौरवानें उल्लेखिलेला भवभूति हा दुसरा, व ज्यास कल्हण यशोवर्म्याचा आश्रित समजतो तो एक तिसराच असें मानावयाचें कीं काय ? किंवा पहिले दोन भवभूती एक समजून दोन भवभूती कल्पावयाचे ? किंवा अन्य विशेष पुराव्याच्या अभावीं राजतरंगिणींतील अनुक्रमाची कशीतरी उपपत्ति लावून तीन्ही ठिकाणीं एकच भवभूति विवक्षित आहे असें म्हणावयाचें ? आम्हांस तिसरा पक्षच ग्राह्य दिसतो; व त्यावरून इ. स. ७३६ चे पूर्वी केव्हांतरी भवभूति होऊन गेला असें निष्पन्न होतें.

**१०. भवभूतीचा कालनिर्णय; समारोप.**—वरील सर्व विवेचनावरून पाहतां भवभूति हा कालिदासानंतर ( सुमारें इ. स. ४९० ) एवढेंच नव्हे तर बाणकवीनंतर ( सुमारें इ. स. ६१० ) झाला असावा; व राजशेखरच्या (इ. स. ९००) पूर्वीं झाला असावा असें ठरतें. आणि याहून अधिक निश्चित निर्णय करावयाचा झाला तर तो वाक्पतिराजाच्या ( इ. स. ७३६ ) पूर्वीं कांहीं वर्षें म्हणजे इ. स. ७०० च्या सुमारास केव्हांतरी होऊन गेला असें स्थूल मानानें ह्मणतां येईल.

## भवभूतीनें केलेले ग्रंथ

**११. भवभूतीचे अनुपलब्ध ग्रंथ.**—प्रचलित तीन नाटकांहून अन्य कांहीं ग्रंथ—मग ते काव्यें असोत वा नाटकें असोत—भवभूतीनें केले असा-

१. "ज्या(वाक्पतिराजा)च्या विकट ( लांबलचक ) कथानकांतून वगैरे भवभूतिरूप समुद्रांतून ( वाचनरूप मंथनानें) निघालेले काव्यामृतरूपी जलाचे ( रसाचे ) कण अजूनही चमकतात." ग. ब. ७९९.

वेत असें मानण्यास आधार एक तर सुभाषितरत्नभांडागार, सुभाषितावलि, सूक्तिमुक्तावलि, इत्यादि सुभाषितसंग्रहांतून भवभूतीच्या उपलब्ध तीनही नाटकांत न सांपडणारे श्लोक त्याचे ह्मणून दिले आहेत हा होय. दुसरा, भवभूतीच्या महावीरचरित व मालतीमाधव या अगदीं प्रारंभीं रचिलेल्या नाटकांमध्यें त्याचें जें नाट्यरचनाकौशल्य दिसून येतें त्या मानानें पाहिल्यास उत्तररामचरितामध्यें हें कौशल्य पूर्ण विकसित झालेलें आढळून येतें हा होय. ही परिणतावस्था अभ्यासाशिवाय–मालतीमाधव व उत्तररामचरित यांच्या दरम्यान अन्य नाटकें लिहिल्याशिवाय—त्यास प्राप्त कशी व्हावी ? दुसऱ्या मुद्याचें पुढें विस्तृत विवेचन केलें जाईल. पहिल्या मुद्यासंबंधानें गुरुवर्य डाक्टर ( आतां सर ) रामकृष्णपंत भांडारकर यांचा तर्क असा आहे कीं,[1] ज्या अर्थी जल्हण आपल्या सूक्तिमुक्तावलीमध्यें भवभूति व मालतीमाधव अशा दोन निरनिराळ्या ग्रंथकारांचे उतारे पृथक् देतो त्या अर्थी जल्हणाच्या नंतर झालेल्या सुभाषितसंग्रहकारांनीं ( मालतीमाधव या नांवाचा ग्रंथकार व भवभूतिकृत मालतीमाधव हें नाटक यांतील फरक त्यांस न समजून ) भवभूतीच्या नांवानें दिलेले श्लोक वास्तविक या 'मालतीमाधवा'चेच असावेत; भवभूतीच्या नांवावर त्याच्या तीन्ही नाटकांत न सांपडणारे श्लोक आढळतात ह्मणून भवभूतीनें आणखी कांहीं रचिलें असावें असें मानण्याचें प्रयोजन नाहीं.

या आक्षेपास प्रत्युत्तर सूक्तिमुक्तावलींतच सांपडणारें आहे. जल्हणानें सूक्तिमुक्तावलींत भवभूतीचे ह्मणून जे श्लोक दिले आहेत त्यांत 'यदेवारभ्याऽन्तः' हा एक आहे असें सर भांडारकरच स्वतः ह्मणतात; व हा श्लोक भवभूतीच्या उपलब्ध कोणत्याही नाटकांत आलेला नाहीं. मग या श्लोकाकरितां तरी भवभूतीचा चवथा एखादा ग्रंथ कल्पावयास नको काय ? आणि मुख्य मुद्दा हाच आहे. जल्हणानें केलेला भवभूति व मालतीमाधव यांतील भेद जल्हणाशिवाय अन्य कोणाही त्याच्या पूर्वींच्या अथवा नंतरच्या सुभाषितसंग्रहकारास ठाऊक नाहीं.

1. See Dr. Bhandarkar's Report on Search of Sanskrit Mss. for 1887–91, page xxxv.

निरनिराळ्या सुभाषितसंग्रहांमधून सुमारें बारा एक श्लोक आढळतात कीं जे भवभूतीच्या उपलब्ध नाटकांतून घेतलेले नाहींत. मात्र या श्लोकांवरूनच ते अमक्या एका ग्रंथांतून घेतले असतील असें सांगतां येण्याजोगें नाहीं. शिवाय या श्लोकांसंबंधांतही मतभेद आहेत. एकादा श्लोक एका सुभाषितसंग्रहांत भवभूतीचा ह्मणून दिला आहे तर दुसऱ्यांत दुसऱ्या एका कवीच्या नांवानें दिला आहे तर तिसऱ्यांत पुनः तो 'कस्यापि' कोणाचातरी ह्मणून दिलेला आढळतो. सारांश सध्यां जी माहिती आहे तिच्या अनुसंधानानें भवभूतीचे कांहीं ग्रंथ ( नाटकें ) अनुपलब्ध आहेत एवढें खास ह्मणतां येईल, पण या ग्रंथांची या व्यतिरिक्त जास्त कांहींही माहिती देतां येत नाहीं.

**१२. भवभूतीचे उपलब्ध ग्रंथ.**—भवभूतीनें केलेलीं अशीं तीनच नाटकें हल्लीं प्रचारांत आहेत. १ महावीरचरित. यामध्यें विश्वामित्रानें रामलक्ष्मणांस मखरक्षणार्थ दशरथापासून मागून नेलें तेव्हांपासून लंकायुद्धानंतर विजयी होऊन ते सीतेसह अयोध्येस परत आले व रामास राज्याभिषेक झाला येथपर्यंतची हकीकत आली आहे. २ मालतीमाधव. हें एक श्रृंगाररसप्रधान नाटक ( अथवा नाट्यशास्त्राच्या परिभाषेप्रमाणें म्हणावयाचें म्हणजे प्रकरण ) आहे, व याचें संविधानक कल्पित आहे. ३ हल्लीं भाषांतराकरितां घेतलेलें उत्तररामचरित. महावीरचरिताचा जेथें शेवट झाला तेथें ह्मणजे रामाच्या राज्याभिषेकानें या नाटकास प्रारंभ झाला आहे. व येथपासून पुढें सीतात्याग, शंबूकवध, रामाश्वमेध, व त्या प्रसंगानें पुत्रांसह सीतेची पुनः प्राप्ति इतका या नाटकाचा विषय आहे. या तीन नाटकांचें आतां आपणांस क्रमाक्रमानें परीक्षण करावयाचें आहे.

## महावीरचरित; गुणदोषविवेचन

**१३. महावीरचरित रचितांना भवभूतीपुढें उभा राहिलेला प्रश्न.**—वाल्मीकिरामायणासारख्या आबालवृद्धांस अत्यंत परिचित असलेल्या कथानकावर नाटक रचणें हें काम जितकें सोपें तितकें कठिणही पण आहे. रामायण हें मूळचेंच काव्यात्मक नाटक आहे, या दृष्टीनें

पाहिलें असतां त्यांत जागोजाग प्रवेश व पात्रें यांची सांगड घालून दिली ह्मणजे अल्प प्रयासानें त्याचें मूळाबरहुकूम एक नाटक बनू शकेल, व अगदीं आरंभीं जेव्हां रामायण रंगभूमीवर आणिलें तेव्हां याच सोप्या पद्धतीचें अवलंबन केलें असावें. पण अशा रीतीनें 'सीनेमा'मध्यें हलतीं-बोलतीं चित्रें जशीं एकापाठीमागून एक प्रेक्षकांसमोर आणिलीं जातात त्याप्रमाणें परशुराम, मंथरा, शूर्पणखा, खर व चौदा हजार राक्षससेना, मारीच, जटायु, सुग्रीव, वाली, हनुमान्, शबरी, विभीषण, कुंभकर्ण, रावण, इत्यादि पात्रें लागोपाठ रंगभूमीवर आणिल्यानें नाटकास अत्यंत आवश्यक जें संविधानकाचें ऐक्य तें कांहीं येऊं शकत नाहीं. तसें होण्यास एक तर या पात्रांची व प्रसंगांची गर्दी मोडली पाहिजे—ह्मणजे अथपासून इतिपर्यंत सर्वच रामायण हा नाटकाचा विषय न करितां त्यांतील निवडक एखादुसरा प्रसंगच घेऊन त्याचें एक सर्वावयवसंपन्न नाटक बनविलें पाहिजे; अथवा पात्रें व प्रसंग कायम ठेवून त्यांना अशा एका धाग्यानें सांधिलें पाहिजे कीं त्यांपैकीं प्रत्येकामध्यें पाठीमागच्याचें फल व पुढच्याचें बीज दृष्टोत्पत्तीस येऊन 'युक्लीड'च्या सिद्धांतांप्रमाणें त्यांची कार्यकारणभावानें युक्त अशी एक अव्याहत परंपरा व्हावी. ह्यांपैकीं पहिली पद्धति भास[१] व तत्कालीन नाटककारांनीं स्वीकारिलेली दिसते. दुसरी पद्धति भवभूतीनें महावीरचरितामध्यें अंगीकारिली आहे.

१. भास कवीचीं हल्लीं १३ नाटकें उपलब्ध झालीं आहेत; रामायणावरून रचिलेलीं दोन ( अभिषेक व प्रतिमा ), महाभारतावरून रचिलेलीं सहा (मध्यमव्यायोग, पंचरात्र, दूतवाक्य, दूतघटोत्कच, कर्णभार व ऊरुभंग), हरिवंश अथवा भागवतावरून रचिलेलें एक (बालचरित), उदयनकथा अथवा वासवदत्ताख्यानावरून रचिलेलीं दोन ( प्रतिज्ञायौगंधरायण व स्वप्नवासवदत्ता ), आणि उरलेलीं दोन ( अविमारक व चारुदत्त ) स्वतंत्र कल्पित कथानकांवरून. उद्योगपर्वांतर्गत कृष्णशिष्टाईपासून गदापर्वाचा अखेर येथपर्यंतच्या संविधानकाचें नारायणभट्टानें वेणीसंहार हें एकच नाटक जेथें केलें आहे तेथें भासानें त्याच संविधानकावर तुटक तुटक निदान ( उपरि निर्दिष्ट सहांपैकीं शेवटचीं ) चार नाटकें केलीं आहेत, एवढ्यावरूनच आम्हीं वर केलेल्या विधानाची सत्यता पटेल.

**१४. भवभूतीनें रामायणकथेमध्यें केलेले फेरफार.**—विवाहापासून अभिषेकापर्यंतच्या बारा तेरा (अथवा चोवीस पंचवीस) वर्षांतील सर्व प्रसंग रामाच्याच आयुष्यांतील आहेत एवढ्याच गोष्टीमुळें—एकनायकत्वामुळें—त्या सर्व प्रसंगांस जें ऐक्य येतें तें जुजबी आहे. तेवढ्यावरच नाटकाचें संविधानक रचण्यांत नाट्यकाराचें विशेष कौशल्य दिसून येत नाहीं. महावीरचरितामध्यें भवभूतीनें हे सर्व प्रसंग एकाच्याच प्रेरणेनें व एकाच हेतूनें झाले आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, व त्यामुळें संविधानकास विविधता व एकता या दोन्ही आवश्यक अंगांचा लाभ झाला आहे. असें करण्यांत अर्थात् भवभूतीस मूळ कथानकांत फेरफार करावे लागणें अपरिहार्य होतें. हे फेरफार असे.

जनकानें जेव्हां सीतेच्या स्वयंवराचा व धनुष्याच्या पणाचा बेत जाहीर केला तेव्हां तिच्या अभिलाषानें जमलेल्या राजपुत्रांमध्यें रावण हाही एक होता. मात्र तो मानी असल्यामुळें आपण स्वतः न येतां एका जासुदाकरवीं सीता मला द्या अशी हुकुमवजा मागणी करितो. जनक त्या जासुदास विश्वामित्राच्या आश्रमास जाऊन विश्वामित्राची व तेथें यज्ञाकरितां नुकत्याच गेलेल्या आपल्या कुशध्वजनामक धाकट्या भावाची संमति मिळविण्यास सांगतो.[1] या वेळीं विश्वामित्राच्या आश्रमांत मखरक्षार्थ आलेले रामलक्ष्मण होतेच. कुशध्वजानें आपल्याबरोबर सीता व ऊर्मिला यांनाही यज्ञ पहाण्यास आणिलें होते. रावणाच्या जासुदानें सांगितलेल्या निरोपाचा विश्वामित्र व कुशध्वज यांनीं अवमान केला एवढेंच नव्हे तर त्या जासुदाच्या देखतच ( रामानें शिवधनुष्याचा भंग केल्यानंतर[2] ) रामास सीतेचें व तसेंच लक्ष्मण-भरत-शत्रुघ्नांस अनुक्रमें ऊर्मिला-मांडवी-श्रुतकीर्ति

१. जनकानें जासुदास कुशध्वजाकडे पाठविणें व कुशध्वजानें त्यास उलट जनकाकडे जाण्यास सांगणें हा ' गडसासवड ' न्याय विशेषसा समाधानकारक झाला नाहीं.

२. धनुर्भंग मिथिलेंत न होतां विश्वामित्राच्या आश्रमांत करविला आहे. असें करविण्यांत विवाहापूर्वी राम आणि सीता व लक्ष्मण आणि उर्मिला यांची गांठ पडून ' तारामैत्री ' जुळून यावी एवढाच हेतु असला पाहिजे. हाही प्रसंग चांगला साधला नाहीं.

यांचें वाग्दान केलें. रावणासारख्या बलाढ्य राक्षसास अव्हेरून यःकश्चित् मानवास सीता देऊं करणें हा रावणाचा अक्षम्य अपराध झाला; व त्याच वेळीं रामानें ताटका, सुबाहु इत्यादि आपल्या राक्षस अनुचरांचा वध केला हें कळतांच रावणाचा क्रोध परमावधीस गेला ( अंक १ ).

आपला जो असा अपमान झाला त्याचा सूड घेण्याचा रावणाचा विचार ठरतो. परंतु हें काम बळजोरीनें न करितां युक्तिप्रयुक्तीनेंच साधून घ्यावें असा सल्ला माल्यवान् नामक एका विश्वासु अमात्याकडून रावणास मिळतो. इतकेंच नव्हे तर माल्यवान् स्वतः तें काम आपल्या शिरावर घेतो. प्रथम शिवधनुष्य भंगिलें या सबबीवर शिवभक्त परशुरामास रामाविरुद्ध चिथविण्याचें माल्यवान् ठरवितो ( अंक २, विष्कंभक ). परशुराम रामास सहज जिंकील असें कोणासही वाटणें स्वाभाविक होतें; परंतु येथें माल्यवानाची अटकळ चुकते व परशुरामाचाच रामाकडून पराभव होतो (अंक ३ ).

पण एवढ्यानें माल्यवान् निराश होत नाहीं. संकल्पाप्रमाणें दशरथानें रामास राज्याभिषेक केल्यास त्याच्या सत्तेचा उत्तरोत्तर उत्कर्ष होईल याकरितां त्या राज्याभिषेकास व्यत्यय आणण्याचें माल्यवान् ठरवितो. रावणाची विधवा बहीण शूर्पणखा हिला मंथरा दाईचें रूप घेण्यास तो सांगतो. विवाहानंतर राम अयोध्येस परत येतांक्षणींच तिनें त्याला कैकेईचा ह्मणून असा निरोप कळवावयाचा कीं रामानें लक्ष्मण व सीता यांसह चवदा वर्षें दंडकारण्यांत निघून जावें व त्याच्याऐवजीं भरतास राज्याभिषेक व्हावा.[1] अशा रीतीनें राम बरोबर विशेष परिवार न घेतां

१. शूर्पणखेनें मंथरेचा वेष घेऊन रामास कैकेईचा ह्मणून हा निरोप कळविण्यामध्यें भवभूतीनें पुष्कळ कार्यें साधिलीं आहेत. एक तर रामास वनवासास धाडण्यांत कैकेईचें मुळींच अंग नव्हतें ही गोष्ट स्पष्ट झाल्यानें कैकेईवर येणारा ठपका वांचला. दुसरें, एव्हांपासून रामास शूर्पणखेच्या दृष्टीस पाडल्यानें तिच्या मनांत पुढें रामाविषयीं जो कामविकार उद्भविणार त्याचें बीजारोपण झालें ( महावीरचरित ४·४०$^{८-९}$ ). तसेंच आपण घेतलेलें मंथरेचें रूप जर रामास आतां उमगूं आलें नाहीं तर पुढें सुंदर युवतीचें रूप धारण करून रामास वश करण्यास आपण गेल्यास त्यास खात्रीनें भुरळ पडेल असाही विचार शूर्पणखेच्या मनांत आला असला पाहिजे.

दंडकारण्यांत आला म्हणजे खर, दूषण व त्रिशिरस् यांच्या हाताखालीं असलेल्या चवदा हजार राक्षससेनेच्या साहाय्यानें त्यास ठार मारून त्याच्या बायकोचा अपहार करणें हें काम विशेष जड जाणार नाहीं असा हें जुळवून आणण्यांत माल्यवानाचा उद्देश होता. तर्क केल्याप्रमाणें राम कैकेईची म्हणून केलेली आज्ञा प्रमाण मानून सीता व लक्ष्मण यांसह वनवास पत्करितो ( अंक ४ ).

यापुढें सीतेचें हरण होणार हें ठरल्यासारखेंच होतें. पण ज्या चवदा हजार राक्षससेनेच्या साहाय्यानें हें काम करून घ्यावयाचें होतें तिचा कांहीं उपयोग न होतां हें काम कपटप्रयोगानेंच करावें लागलें ( अंक ५, विष्कंभक ). सीता आपल्या कबज्यांत आली पण रामलक्ष्मण जोंपावेतों मोकळे आहेत तोंपावेतों ते सीतेस परत मिळविण्याचा यत्न करतील तेव्हां त्यांस कोणत्या तरी उपायानें चिरडून टाकणें जरूर होतें. माल्यवान् या कामीं आतां वालीची योजना करितो. वाली हें काम करण्यास नाखुषच होता, पण माल्यवानाच्या भिडेखातर तो तें कबूल करितो. वाली व राम यांचें रीतसर[1] युद्ध होतें; पण त्यामध्यें वालीचाच पाडाव होतो ( अंक ५ ). आतां मात्र माल्यवानाची पूर्ण निराशा होते. रामाचें पारिपत्य करण्याकरितां त्यानें एका पाठीमागून एक उपाय योजिले, पण त्यांपैकीं एकही फलद्रूप झाला नाहीं. आतां होतें नव्हतें तेवढें सर्व सैन्य एकत्र करून लढाईस आरंभ करून एकदांचा सोक्षमोक्ष करून घ्यावा एवढेंच कार्यतें बाकी राहिलें. पण ह्याही उपायाची तीच गत होते. राम रावणास मारितो ( अंक ६ ) व विभीषणास लंकेचें राज्य देतो. पुढें अग्निशुद्धीनंतर राम सीतेचा अंगीकार करितो व सर्व मंडळी पुष्पक विमानांतून अयोध्येस परत जातात व तेथें रामास राज्याभिषेक होतो(अंक ७).

**१५. या फेरफारांचें नाट्यशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्व.**—वरील विवेचनावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं भवभूतीनें अथपासून इतिपर्यंत रामायणाच्या कथानकामध्यें जाणूनबुजून व कांहीं विशिष्ट हेतूसाठीं वाटेल तशी ढवळाढवळ केली आहे. आपणास काय साधावयाचें आहे याची

१. रामायणांत राम वालीचा वध कपटानें करितो तसें येथें घडत नाहीं.

कवीस पूर्णपणें जाणीव होती; व म्हणून रामायणांतील अचुक कोणते प्रसंग आपण नाटकांत आणावेत, कोणते आणूं नयेत, कोणत्यांमध्यें कसकशी फेरपालट करावी, व इलाजच नसेल तर कोणते स्वकपोलकल्पित प्रसंग त्यांत घुसडून द्यावेत हें सर्व मनाशीं ठरवून मगच भवभूतीनें नाटक लिहिण्यास प्रारंभ केला असावा. मूळांतील विस्कळित संविधानकास एकरूपता आणण्यासाठीं भवभूतीनें हे फेरफार केले आहेत एवढेंच नव्हे तर अनेक विरुद्ध स्वभावांच्या भूमिकांच्या सांनिध्यानें रामाची भूमिका—त्याच्या अंगचे सत्य, सहनशीलता, क्षांति, कर्तव्यदक्षता, शौर्य, निरभिमानता, इत्यादि वीर पुरुषास साजेसे गुण—जास्त खुलून दिसण्याकरितांही कवीनें ही योजना केली असावीसें वाटतें.[1] परशुरामांत रामाइतकेंच शौर्य आहे पण त्याची क्षांति व निरभिमानता नाहीं. वालीमध्यें हे सर्व गुण आहेत पण कांहीं होवो सत्यापासून ढळावयाचेंच नाहीं हा बाणा—ही जागरूक कर्तव्यदक्षता—त्याजपाशीं नाहीं, व म्हणून त्यास माल्यवानाची

१. रामाच्या भूमिकेवर कवीनें बरेच श्रम खर्च केले आहेत. रामाच्या अंगीं शौर्य आहे पण शत्रूंचा तो मत्सर करीत नाहीं (महावीरचरित, १·३१,१·३२[1]). शत्रूंच्या अंगचे गुण तो उदारपणानें कबूल करितो ( महावीरचरित, २·३५,३६, वगैरे ) व त्यांचा पराभव केल्यानंतर त्यांच्यांशीं सौजन्यानें वागतो ( ४·२१,५·१६ ). त्याचा आत्मविश्वास दांडगा आहे (२·३३[2]) व शत्रूंनीं आपणावर उपकार करावा अथवा दया दाखवावी याची त्याला फार चीड येते ( २·४६[3],५·५० ). एकदां ज्यांना मित्र म्हटलें त्यांचा तो मान ठेवितो व त्यांच्या कारितां सर्वस्व वेंचण्यासही तो मागेंपुढें पहात नाहीं ( ५·५८[17], ५·६० ). त्याला शिष्य ( १·३८ ) पुत्र ( ४·४२ ) व राजा ( ४·३९ ) या निरनिराळ्या नात्यांमध्यें आपलें कर्तव्य काय याची पूर्ण जाणीव आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सात्विक शौर्याचें नमुनेदार उदाहरण (ideal of chivalry ) राम या भूमिकेमध्यें भवभूतीनें देण्याचा प्रयत्न केला आहे. रामाचा दैविक अंश भवभूतीनें ( एक दोन प्रसंग वगळून ) होतां होईल तों पुढें येऊं दिला नाहीं व त्यामुळें एरवीं मनुष्याप्रमाणें वागणाऱ्या अवतारी पुरुषांचें मानवस्वभावास विसंगत असें मध्येंच एखादें चमत्कारिक कृत्य पाहून जो आपला विरस होतो तोही भवभूतीनें फारसा करूं दिला नाहीं.

भीड मोडतां न येऊन तो अकार्यास प्रवृत्त होतो. रावणाच्या अंगींही अनेक सद्गुण आहेत, पण परस्त्रीचा अभिलाष धरल्यामुळें त्याच्या सर्व सद्गुणांची माती होऊन त्यास त्यापायीं स्वतःच्या जीवास व सर्वस्वास मुकावें लागत आहे. माल्यवानाची गोष्ट तर या सर्वांहून निराळी. अमुक गोष्ट चांगली व अमुक वाईट हें त्यास पूर्णपणें समजत असतांनाही डोळे उघडे ठेवून व केवळ खाल्लेल्या अन्नास बेइमान होऊं नये एवढ्याचकरितां त्यास असत्पक्ष स्वीकारावा लागतो; व त्यामुळें या सर्व नाटकामध्यें सरळ, प्रामाणिक व उदार राजकारण आणि कुटिल, कपटी व अनुदार मुत्सद्दी-गिरी यांचा झगडा लागून शेवटीं पहिल्याचा पूर्ण जय होतो.

**१६. महावीरचरितांतील दोष.**—महावीरचरित हें भवभूतीचें पहिलेंच नाटक होतें ही गोष्ट लक्षांत घेतां व संविधानक रचण्यांत त्याला मुख्य अडचण कोणती होती आणि ती त्यानें कोणत्या उपायानें दूर केली याचा विचार करितां भवभूतीस या नाटकांत मिळालेली सिद्धि बरीच वरच्या दर्जाची आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. नाटक काव्यदृष्ट्याही बऱ्यांपैकीं आहे–कांहीं कांहीं स्थलवर्णनें तर उत्तमच आहेत–व तिसऱ्या व चवथ्या अंकांतील संवाद खोंचदार असून त्या त्या भूमिकांस साजेलसा आहे. हें सर्व खरें असलें तरी या नाटकामध्यें अनुभवाच्या अभावीं उद्भवणारे बरेच दोष शिल्लक राहिले आहेत हें कबूल केलें पाहिजे. उदाहरणार्थ एक तर भवभूतीस कोणतीही गोष्ट थोडक्यांत शब्दावडंबर न करितां कशी सांगावयाची ही कला अजून शिकावयाची आहे. माल्यवानाचें राजकारणच ध्याना. तो जे जे उपाय योजितो त्यांचा अनिष्ट परिणाम झाल्यास काय करावें याचीच तो उगीच अगोदरपासून विवंचना करीत राहतो ( म. वी. च. २·१२$^{१–१२}$, ४·२ ते ८, वगैरे ), व त्यामुळें प्रेक्षकांच्या कुतूहलाचा भंग होतो. तसेंच तिसऱ्या अंकांतील परशुरामाचें शतानंद, जनक, दशरथ, व विश्वामित्र यांशीं होणारें वाग्युद्ध. या ठिकाणीं परस्परांच्या तोंडीं जीं उत्तरप्रत्युत्तरें घातलीं आहेत त्यावरून भवभूतीस योग, धर्म, मीमांसा इत्यादि शास्त्रें अवगत होतीं हें दिसून येतें, पण हें पांडित्यप्रदर्शन थोडेंसें अस्थानीं झालें आहे. तीच गोष्ट वर्ण-

नाची. अगोदर नाटकांत फारशीं वर्णनें येऊं नयेत;[१] व आलीं तरी तीं सुगम व रसपरिपोष करणारीं असावींत, त्यांमध्यें क्लिष्टता अथवा दुर्बोधता असूं नये. दशांकी मालतीमाधवापेक्षां सप्तांकी महावीरचरित (गद्य व पद्य मिळून) ग्रंथसंख्येनें मोठें आहे यावरूनच भवभूतीला अजून लेखणी आंवरून धरितां येत नव्हती हें उघड होतें. नाटकाची भाषाही, अपवादात्मक स्थळें वगळल्यास, फारशी प्रसादयुक्त नाहीं.

या नाटकांतील दुसरा दोष म्हणजे एकाद्या भूमिकेस परिस्थितीच्या भोंवऱ्यांत गोंववून जसजशी परिस्थिति बदलते तसतसा त्या भूमिकेच्या स्वभावाचा क्रमाक्रमानें संकोच अथवा विकास कसकसा होत जातो हें दाखविणें हें जें स्वभावरेखनाचें रहस्य तें भवभूतीस अद्यापि पूर्णपणें अवगत झालें नाहीं हा होय. उदाहरणार्थ सीतेची भूमिका घ्या. पहिल्या अंकामध्यें सीता व ऊर्मिला यांची राम व लक्ष्मण यांशीं दृष्टादृष्ट होतांच उभयतां उभयतांस कळसूत्री बाहुल्याप्रमाणें अचुक वांटून घेतात (१·२८[३–६]). पुढें (१·५६[१]) त्यांचा विवाह निश्चित झाल्यावर 'एकूण आम्हांला [परक्याच्या] पदरांत घातलें!' असें म्हणून एक क्षणार्धच त्या जणूं काय शिकविल्याप्रमाणें शोक करितात. एक दोन दिवसांत त्यांचा विवाह पुरा होतो न होतो तोंच तीच सीता एकाद्या पोक्त बायकोप्रमाणें परशुरामापुढें एकाकी न जाण्याचा आपल्या नवऱ्यास उपदेश करिते व त्याचें धनुष्य धरून ठेविते (२·२१[६–७]). एवंच सर्व कारभार अगदीं यंत्राबरहुकूम होत आहे. त्यांत स्वाभाविकता आली नाहीं. माल्यवानाचीही जवळ जवळ तीच स्थिति आहे. त्याच्या

१. एका पात्राचें लांबलचक काव्यात्मक भाषण अथवा वर्णन पुरें होईतों इतर पात्रांना स्वस्थ वेड्याप्रमाणें माशा मारीत बसण्याचे प्रसंग या नाटकांत अनेक येत असावेत. हल्लींप्रमाणें प्राचीनकाळीं 'सीनसीनरी'चें इतकें प्रस्थ माजलें नव्हतें यावरून पहातां कांहीं ठिकाणीं मधून मधून स्थलांतर वगैरे दर्शविण्याकरितां नाटकांत वर्णनें घालणें जरूर असेल. किंबहुना शेक्सपीयरच्या नाटकांमध्यें सुद्धां हाच प्रकार आढळतो. पण अशीं वर्णनें सुद्धां आटोपशीर असून काल, स्थल, वा परिस्थिति जी सुचवावयाची असेल तेवढ्यास पुरेत इतकींच असावींत. पाल्हाळानें रसभंग होतो.

मुत्सद्दीगिरीमध्यें पढीकपणाच जास्त आहे. सहाव्या अंकांतील त्याचा शोक सुद्धां उसना आहेसा भासतो. महावीरचरितांतील माल्यवानामध्यें व मुद्राराक्षसांतील राक्षसामध्यें आपणांस तेव्हांच जमिनअस्मानाचें अंतर दिसून येईल. दुसरा खरोखरीचा मनुष्य आहे, पहिला नुसता चालता-बोलता लांकडी पुतळा आहे. एखाद्या भूमिकेमध्यें अमुक अमुक गुणांचा समवाय आहे असें शब्दांनीं सांगणें सोपें आहे; पण त्या गुणांस अनुसरून रंगभूमीवर त्याजकडून कृति करून दाखविणें हें महाकर्म कठिण आहे, व तें नुसत्या पुस्तकी विद्येनें साध्य होत नसतें; त्या विद्येस अनुभवाची जोडच द्यावी लागते.

महावीरचरितामध्यें इतरही किरकोळ दोष दाखवितां येतील. उदाहरणार्थ, ९·३८[२] मध्यें दुंदुभि दैत्याच्या अस्थींनीं झालेला पर्वत रामानें आपल्या पायाच्या आंगठ्यानें दूर सारिला असें वर्णन आहे; तर ७·१६ च्या तिसऱ्या पादामध्यें विभीषण या कृत्याचें श्रेय लक्ष्मणास देत आहे इत्यादि परस्परविरुद्ध विधानें. पण स्थूल मानानें असें म्हणतां येईल कीं नाटक कसें रचावें या कलेचीं मूलतत्त्वें भवभूतीस बरोबर समजलीं होतीं; व सरावानें तो उत्तरोत्तर चांगलीं चांगलीं नाटकें रचील अशी आशा केल्यास ती अस्थानीं होणार नाहीं इतके गुण या त्याच्या पहिल्याच नाटकामध्यें आपणांस आढळतात. महावीरचरितानंतर पुढें थोड्याच अवकाशानें रचिलेल्या मालतीमाधव या भवभूतीच्या दुसऱ्या नाटकाचें आतां आपण परीक्षण करूं.

## मालतीमाधव; संविधानक व गुणदोषविवेचन

**१७ क. मालतीमाधव; संविधानकाची जुळवाजुळव.**—कोणत्याही नाटकाचें परीक्षण तीन अंगांनीं करितां येतें—संविधानक, मांडणी, व भाषा. प्रथम मालतीमाधवाच्या संविधानकासंबंधानें पहातां भवभूतीनें हें कथानक गुणाढ्याच्या बृहत्कथेपासून मुख्यतः घेतलें असावें असें दिसतें. मूळचा बृहत्कथा हा पैशाची भाषेंत लिहिलेला ग्रंथ लुप्तच झाला आहे; पण बृहत्कथेच्या आधारानें क्षेमेन्द्रानें एक बृहत्कथामंजरीनामक संस्कृत ग्रंथ लिहिला आहे ( काव्यमाला ६९ ); व क्षेमेन्द्राच्याच भारतमंजरी

( काव्यमाला ६९ ) व रामायणमंजरी ( काव्यमाला ८३ ) या ग्रंथांचें भारत व रामायण यांशीं जें साम्य आहे त्यावरून पहातां बृहत्कथेचा क्षेमेन्द्रानें केलेला हा संक्षेप मूळाशीं फारसा विसंगत नाहीं असें म्हटल्यास चुकीचें होणार नाहीं. क्षेमेन्द्राप्रमाणेंच सोमदेवानें कथासरित्सागर म्हणून एक दुसरा संस्कृत ग्रंथ लिहिला आहे त्यासही बऱ्याच अंशानें बृहत्कथेचा आधार घेतला आहे; पण यांत मूळांत नाहीं असा बराच भाग आला असावा.[१]

मालतीमाधवाचें संविधानक ज्या २।३ गोष्टींवर रचिलें आहे त्या ज्या अर्थीं थोड्या बहुत फरकानें कथासरित्सागरामध्यें व बृहत्कथामंजरीमध्येंही आल्या आहेत त्या अर्थीं भवभूतीनें त्या गोष्टी बृहत्कथेंतूनच ( जर हा ग्रंथ त्याचे वेळीं अस्तित्वांत असेल तर ) घेतल्या असाव्यात हें उघड होतें. मूळ गोष्टी भवभूतीनें पुष्कळ बदलिल्या आहेत, व त्यांत स्वतः अनेक दुसऱ्या प्रसंगांची भरही घातली आहे. महावीरचरिताच्या मूळ कथानकांत भवभूतीनें केलेले असेच फेरफार आपण नुकतेच पाहिले आहेत. त्या मानानें हे जे फेरफार केले आहेत ते बरेच मार्मिकपणाचे आहेत, व ते त्याच्या उत्तरोत्तर विकास पावणाऱ्या नाट्यकलेची साक्ष देऊं शकतात. तेव्हां मालतीमाधवाचें संविधानक, त्याचें विशेष काळजीनें पृथक्करण करून, आपणांस पाहिलें पाहिजे.

**१७ ख.**—बृहत्कथामंजरीच्या ११ व्या 'लंबकां'त पुढील गोष्ट आली आहे. कलिंग देशामध्यें शोभावतीनामक एक नगरी आहे. तेथें यशस्कर नांवाच्या ब्राह्मणास मेखलिका नांवाच्या भार्येपासून सद्भाव नामक एक पुत्र झाला. पुढें लवकरच दुष्काळामध्यें या ब्राह्मणकुटुंबास स्थलांतर करावें लागलें. कृच्छ्रवीव नामक एका नगरांत आतां त्यांनीं

१. सोमदेवानें ' यथामूलं तथैवैतन्नमनागप्यतिक्रमः । ग्रंथविस्तरसंक्षेपमात्रं भाषा च भिद्यते ॥ अशी प्रतिज्ञा केली आहे; तरी थोडेंबहुत कमीजास्त झालें असेलच. अलीकडे नेपाळामध्यें बृहत्कथेच्या वीस अध्यायांचें संस्कृत भाषांतर सांपडलें आहे. त्यापैकीं पहिले नऊ अध्याय १९०८ मध्यें ' एफ्. लाकोट ' ह्या फ्रेंच पंडितानें प्रसिद्ध केले आहेत, व त्यांस गुणाढ्य व बृहत्कथा यांसंबंधीं एक विस्तृत निबंधही जोडिला आहे.

वसती केली, व तेथें तो ब्राह्मणपुत्र गुरुगृहीं जाऊन विद्याभ्यास करूं लागला. विद्यार्थिदशेंत त्याची सोमदत्तनामक एका क्षत्रियाच्या विजयसेन नामक पुत्राशीं संगति जुळली. कालांतरानें एका बागेमध्यें विजयसेनाची बहीण मदिरावती इची व ब्राह्मणपुत्र सद्भावाची दृष्टादृष्ट झाली व उभयतांही कामवश झाले. पुढें एकदां सद्भाव विजयसेनाच्या घरीं गेला असतां त्यांची फिरून गांठ पडली व मदिरावतीनें स्वत: केलेली फुलांची माळ त्याला गळ्यांत घालावयास सांपडली. त्या प्रसंगीं मदिरावतीच्या दाईनें सद्भावाची भेट घेऊन त्याला मदिरावतीची स्थिति कळविली; त्यामुळें तिच्या प्राप्तीची त्याला बरीच आशा सुटली. परंतु इकडे मदिरावतीच्या पित्यानें एका सुस्वरूप क्षत्रिय कुमाराशीं तिचा विवाह ठरविला, व त्याप्रमाणें तयारीही सुरूं झाली. मध्यंतरीं मदिरावतीच्या सखीनें सद्भावास मदिरावतीचें त्याजवरील प्रेम अढळ आहे असें आश्वासन दिलें. पण लग्नाचा दिवस नक्की ठरून तो जसा प्रत्यक्ष येऊन ठेपला तसा तो ब्राह्मणपुत्र निराश होऊन त्यानें आत्महत्त्या करण्याचें ठरविलें; इतकेंच नव्हे तर एका झाडावर चढून त्यानें गळफांसही बांधून घेतला. इतक्यांत दैववशात् तेथें आलेल्या एका तरुणानें त्याची वेळींच फांसापासून मुक्तता केली व त्यास सावध केलें. आत्महत्येचें कारण कळल्यावर तरुणानें ब्राह्मणपुत्राची कानउघाडणी केली व म्हटलें–" नेपालदेशाचा ( कथासरित्सागरांत निषधदेशाचा असें म्हटलें आहे) मीं रहाणारा. माझें नांव कुमारक. देशपर्यटन करितां करितां मीं हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या शंखमुख नामक नगरास येऊन पोहोंचलों. तेथें एका यात्रेच्या प्रसंगीं शंखपाल नांवाच्या तेथल्या एका तलावांत स्नानाकरितां स्त्री-पुरुष जमले असतांना तेथें माझ्या दृष्टीस एक सुस्वरूप तरुणी पडली. तिनेंही मला पाहिलें. इतक्यांत एक मदोन्मत्त गज त्या बाजूस धांवून आला. त्या सुंदरीची भीतीनें अगदीं गाळण उडाली. मीं जवळच होतों. तिला दोन्ही हातांनीं धरिलें व मला तिच्या शरीराच्या अपूर्व स्पर्शसुखाचा लाभ झाला. पुढें तो गज आमच्यावरच रोंखून आला. त्या वेळीं उडालेल्या गडबडींत तिची माझी चुकामूक पडली. तिचें मला नांवगांवही माहीत नव्हतें, व आजतागायत तिची माझी गांठही फिरून पडली नाहीं. मीं यापूर्वींच

आत्महत्त्या करून घ्यावयाची; पण जिवंत असे तों मनुष्यास आशा ही असतेच. तूंही असाच विवेक कर व उद्योगाला लाग. "

मग ते दोघे मित्र—सद्भाव व कुमारक—त्या नगरींत कामदेवाचें एक देवालय होतें तेथें गेले व आंतल्या गाभाऱ्यांत लपून राहिले. लग्नापूर्वीं पूजेसाठीं येथें मुलींनीं जाण्याची चाल होती. त्याप्रमाणें मदिरावतीही तेथें आली, व एकटीच पूजा करण्याकरितां गाभाऱ्यांत गेली. तेथें कामदेवास नमस्कार करून 'या जन्मीं नाहीं तर पुढील जन्मीं तरी मला इच्छित ब्राह्मणकुमार पति लाधो' असें म्हणून ती गळफांस बांधून घेऊं लागली. इतक्यांत लपून बसलेला सद्भाव पुढें झाला. उभयतांची ओळख पटली व ते गुप्तपणें दुसऱ्या दरवाज्यानें बाहेर पडले. तें नगर मागें घालून रानांतून वाट काढीत काढीत ते अचल नामक दुसऱ्या एका गांवास पोहोंचले, व तेथें एका कुटुंबवत्सल ब्राह्मणाच्या घरीं त्यांनीं आपला विवाह उरकून घेतला. पुढें प्रवास करीत करीत ते एकदां भागीरथीतीरीं प्राप्त झाले असतां तेथें त्यांना अकस्मात् त्या पूर्वींच्या मित्राची गांठ पडली. हकीगत विचारिल्यावरून त्यानें उत्तर केलें—" तुह्मी देवळांतून बाहेर पडल्यावर नवऱ्यामुलीचा वेष घेऊन मी तिच्याच शिबिकेंत बसून तिच्या घरीं गेलों. माझा तोंडावळा बायकोसारखा आहे व मीं अवगुंठन घेतलें होतें तेव्हां त्या लग्नाच्या गर्दींत कोणास कांहीं संशय आला नाहीं. मीं तेथें एकीकडे बसलों असतांना मदिरावतीची पाटला नांवाची एक मैत्रीण मजजवळ येऊन ह्मणाली, ' मदिरावति, अशा मंगलसमयीं तूं अशी उद्विग्न कां ? तुझें मन त्या ब्राह्मणकुमारावर आहे हें मला ठाऊक आहे. पण तो तुझ्या दैवीं नाहीं असेंच मानून आलेल्या प्रसंगास मान वांकविली पाहिजे. माझीही तुझ्यासारखीच स्थिति आहे. मी एकदां शंखपाल नामक तलावामध्यें यात्रेच्या प्रसंगीं स्नानाकरितां गेल्यें असतां तेथें एका हत्तीस मजकडे चाल करून येतांना पाहून घाबरलें. त्या वेळीं एका सुंदर तरुणानें ( मला त्याचें नांवही ठाऊक नाहीं ) मला पोटाशीं धरून आश्वासिलें. पण पुढें गर्दींत त्याची माझी चुकामुक पडली व अजूनही मीं तो केव्हां तरी भेटेल या आशेवर प्राण घेऊन राहिल्यें आहें.' पाटलेचें तें भाषण ऐकून मीं तिला ओळख दिली व आह्मीं रात्रीं कोणाला न कळत त्या लग्नघरांतून

बाहेर पडलों व एका रानांत शिरलों. तेथून मजल दरमजल करीत पुढें झालों तों आज येथें तुमची गांठ पडली."

**१७ ग.**—कथासरित्सागराच्या १३ व्या 'लंबका'मध्यें हीच गोष्ट थोड्या विस्तारानें आली आहे. बृहत्कथामंजरींतील गोष्टीहून कथासरित्सागरांतील गोष्ट पुढील स्थळीं थोडीशी निराळी आहे.—दुर्भिक्षानंतर यशस्कर पत्नीपुत्रासह विशाला ( कृछ्वीव नव्हे ) नामक नगरींत जातो व तेथें एका वाण्याच्या घरीं त्यांना आधार मिळतो. मदिरावतीची व सद्भावाची ( हें नांव कथासरित्सागरांत नाहीं ) जी प्रथम दृष्टादृष्ट होते ती उद्यानांत नाहीं तर ती आपल्या भावासह गुरूच्या गृहीं आली असतां; व उभयतांचा अनुराग त्या भावाच्या ( विजयसेनाच्या ) लक्षांत येऊन तो सद्भावास आपल्या घरीं आईकडून मुद्दाम बोलाविणें करितो. तेथें मदिरावतीची दाई सद्भावाची एकीकडे गांठ घेऊन त्याला मालतीच्या फुलाची माळ अर्पण करितांना जे शब्द बोलते ( क. स. सा. १३·४३ ते ४७ ) ते लवंगिकेनें माधवानें रचिलेल्या बकुलमालेस उद्देशून बोलिलेल्या ( मालतीमाधव १·३९ ५–९ ) शब्दांप्रमाणेंच द्व्यर्थी व श्लेषगर्भ आहेत.[1] मदिरावतीच्या पित्यानें तिचें एका सुस्वरूप क्षत्रिय कुमारास वाग्दान केलें एवढेंच बृहत्कथामंजरींत म्हटलें आहे. कथासरित्सागरावरून हा क्षत्रियकुमार उज्जयिनीहून मागणी घालण्यास आला होता असें दिसून येतें. निराशेनें आत्महत्त्या करण्याचें ठरवून सद्भाव ज्या झाडावर चढून फांस बांधून घेतो तें वडाचें झाड ज्या मार्गानें लग्नापूर्वीं मदिरावती कामदेवायतनास पूजेकरितां जाणार होती त्याच मार्गावर देवळाजवळच होतें, व तुझ्या प्रीतीकरितां मीं जीव दिला हें तिला कळावें म्हणूनच तो या ठिकाणीं आला होता ही अधिक माहिती कथासरित्सागरावरून मिळते. देवळाच्या गाभाऱ्यांत लपून बसण्याची युक्ति कुमारकानेंच ( हेंही नांव कथासरित्सागरांत प्रत्यक्ष आलें नाहीं ) सुचविली; देवळांत एकटे जाण्यास सांपडावें ह्मणून मदिरावती 'मला कामदेवा-

१. हीं वाक्यें मूळ बृहत्कथेंत होतीं किंवा नाहीं सांगतां येत नाहीं. आमच्या मतें कथासरित्सागरांत हीं वाक्यें मालतीमाधवांतून घेतलीं असावींत.

जवळ एक वर मागावयाचा आहे तेव्हां तुह्मी कोणीही मजबरोबर आंत येऊं नका ' असें आपल्या सखींना सांगते; व गाभाऱ्यांत मदिरावतीची व सद्भावाची ओळख पटल्यावर ' या संध्याकाळच्या अंधुक प्रकाशांत आतां मीं नवरीचा वेष घेऊन बाहेर जातों. हीं आमचीं दोघांचीं उत्तरीयें आहेतच. त्यांतील एक मदिरावती नेसूंद्या व दुसऱ्याचा बुरखा घेऊं द्या, व अशा रीतीनें तुह्मी दुसऱ्या दरवाज्यानें गुपचुप बाहेर पडून जा. व माझी मुळींच काळजी करूं नका ' असें सांगून कुमारक त्याप्रमाणें दोघांकडून ती अजब युक्ति अमलांत आणवितो;—ह्यासारख्या तेवढ्या अंशानें कथानकास जास्त सुसंबद्धता आणणाऱ्या गोष्टीही बृहत्कथामंजरींत नसून कथासरित्सागरांतच आहेत. त्याचप्रमाणें पुढें लग्नगृहीं गेल्यावर ' मला माझ्या मैत्रिणीशीं चार हितगुजाच्या गोष्टी बोलूंद्यात ' असें म्हणून सर्व मंडळीस बाहेर घालवून देऊन दारास कडी लावून मग कुमारकाची भावी स्त्री ( इचें पाटला हें नांव कथासरित्सागरांत नाहीं ) त्याच्याजवळ येऊन बसते; व स्वतःची हकीगत सांगून झाल्यावर ' मला एकवार तुझें तोंड तरी पाहून घेऊंद्या ' असें म्हणून त्याच्या तोंडावरचा बुरखा ती आपण होऊन काढिते व मग उभयतांची ओळख पटून ते पळून जाण्याचा बेत करितात; हा प्रसंगही कथासरित्सागराप्रमाणें बृहत्कथामंजरींत खुलवून सांगितला नाहीं. ह्याशिवाय कांहीं किरकोळही फरक आहेत. पण सर्व मुख्य बाबींसंबंधांत या दोन्ही ग्रंथांचें ऐक्य आहे आणि म्हणून ही सर्व गोष्ट मूळ बृहत्कथेमध्यें थोड्या बहुत फरकानें अशीच दिली असावी असें अनुमान निघतें.

१७ घ.—या मूळच्या कथेमध्यें व मालतीमाधवाच्या कथानकामध्यें पुष्कळच साम्य आहे. मुख्य फरक म्हणजे मदिरावतीस तिच्या पित्यानें दुसऱ्यास देऊं केल्याचें ऐकून सद्भाव जीव देण्याचा निश्चय करितो व माधव स्मशानांतील भूतयक्षादिकांस महामांस अर्पण करून त्यांचे मार्फत आपला इष्ट हेतु साधून घेण्याचा प्रयत्न करितो. व अशा हेतूनें तो स्मशानांत फिरत असतां त्यास मालतीची किंकाळी ऐकूं येते. तो तिच्या रक्षणार्थ करालेच्या मंदिरांत शिरून अघोरघंटापासून तिची मुक्तता करितो. देवतांस बळी दिल्या जाणाऱ्या कुमारिकेचा अशा रीतीनें

अवचित बचाव झाल्याची एक गोष्ट बृहत्कथामंजरींत ( ३·२०० ते २२८ ) व कथासरित्सागरांतही ( ३·४·१२७ ते २०३ ) आली आहे व त्यावरून ती मूळ बृहत्कथेंतही असावी. ही गोष्ट अशी.

एका मठामध्यें ( कथासरित्सागराप्रमाणें हा मठ उज्जयिनीजवळ होता ) पुष्कळ संपन्न पण लोभी ब्राह्मण रहात असत. त्यांच्यामध्यें एकदां तूं श्रेष्ठ कीं मीं श्रेष्ठ असा वादविवाद सुरूं झाला असतांना एकानें निकाल सुचविला कीं जवळच्या स्मशानांत आजच सुळीं दिलेले तीन चोर आहेत. त्यांचीं जो मध्यरात्रीं जाऊन नाकें कापून आणील त्यानें मठाधिपति व्हावें. इतर ब्राह्मण कांकूं करीत असतांना विदूषक या नांवाचा एक शूर, साहसिक हें काम करण्यास तयार झाला. संकल्पाप्रमाणें त्या भीषण[1] स्मशानांत जाऊन त्यानें तें घोर कृत्य उरकिलें. त्याच वेळीं तेथें एक साधक प्रेतावर बसून कांहीं जप करीत होता. हें काय चाललें आहे तें पहाण्यासाठीं विदूषक जवळच आड उभा राहिला. साधकानें प्रेताच्या नाभींतून तीळ काढिले व संचार झालेल्या त्या प्रेताच्या खांद्यावर बसून तो चंडिकेच्या देवळाकडे चालला. मागून विदूषकही गेला. पूजा झाल्यावर चंडिकेनें आदित्यसेन राजाच्या मुलीचा बळी मागितला. तत्क्षणीं साधक प्रेतावर आरूढ होऊन राजवाड्यांत गेला व त्या मुलीस बळजबरीनें घेऊन आला. विदूषक देवळांत मागें राहिला होता. साधक आतां राजकन्येस बळी देणार तोंच विदूषकानें त्याचें डोकें तलवारीनें उडविलें, व त्याच मंत्रित तिळांच्या साहाय्यानें राजकन्येसह प्रेतावर बसून तिला त्यानें आपल्या मंदिरीं पोंचविली. पुढें विदूषक मठाकडे परत जाण्यास निघाला, पण राजकन्येनें त्यास सोबतीसाठीं ठेवून घेतलें. दुसरे दिवशीं राजकन्येच्या मंदिरांत परपुरुष निजलेला पाहून बराच गवगवा झाला; पण खरी हकीगत कळल्यावर राजानें आपल्या मुलीचें विदूषकाशीं लग्न लावून दिलें.[2]

१. स्मशानाच्या भीषणतेचें बृहत्कथामंजरींत बरेंच विस्तृत वर्णन केलें आहे, त्यावरून मालतीमाधवांतील पांचव्या अंकांतील वर्णनाची आठवण होते.

२. बृहत्कथामंजरींतील कथेपेक्षां कथासरित्सागरांतील कथा थोडी जास्त विस्तृत आहे. याशिवाय त्यांमध्यें दुसरा विशेष फरक नाहीं.

१७ ङ.–वाचकांच्या लक्षांत येईलच कीं या विदूषकाच्या गोष्टीपासून भवभूतीनें कांहीं भाग उध्दृत केले आहेत. पण मालतीमाधवाच्या संविधानकाची जुळवाजुळव एवढ्यानेंच पुरी झाली नाहीं. प्रस्तुत नाटकाचा नायक माधव कुंडिनपुरांत राहणारा व विदर्भराजाच्या मंत्र्याचा मुलगा आणि नायिका माळव्यांतील पद्मावती या नगरची व तेथल्या अमात्याची मुलगी. हा स्थलाचा जो फरक भवभूतीनें केला आहे त्याचें कांहींतरी कारण असलें पाहिजे. शोध करितां आम्हांस असें आढळून आलें कीं अशा प्रकारचे–ह्मणजे विदर्भदेशचा राजपुत्र व उत्तर हिंदुस्थानांतील राजकन्या यांचे–दोन प्रसिद्ध विवाह झाल्याचें इतिहासांत नमूद आहे. विदर्भांतील वाकाटक वंशाच्या दुसऱ्या महाराज रुद्रसेनानें मालवा व सुराष्ट्र हे देश जिंकणारा (सुमारें इ. स. ३७५–४००) उत्तरहिंदुस्थानचा महाराजाधिराज जो दुसरा चंद्रगुप्त याच्या श्रीप्रभावतीनामक कन्येशीं लग्न केलें. तत्पूर्वी रुद्रसेनाचा पणजा गौतमीपुत्र यानेंही उत्तरेंतील भारशिवाचा महाराज भवनाग याच्या मुलीशीं विवाह केला होता.[1] भवभूति विदर्भदेशचाच होता ( मागें § २ पहा ) हें लक्षांत आणितां मालतीमाधवांतील नायक–नायिकेंच्या स्थलांचा निर्देश अगदींच निष्प्रयोजन आहे असें ह्मणतां येत नाहीं. भवभूतीचें नाटक पहाणाऱ्यांपैकीं पुष्कळांच्या हे संबंध आठवणींत असतील; व तशी त्यांना आठवण करून देण्याकरितांच कदाचित् भवभूतीनें ही योजना केली असेल.

१७ च.–मालतीमाधवाच्या संविधानकापैकीं आणखी एका बाबीसंबंधानें जवळ जवळ असाच प्रकार आहे. मात्र या खेपेस भवभूतीस आख्यायिका किंवा इतिहास शोधावे लागले नाहींत. त्याच्या स्वतःच्या अनुभवाचीच एक गोष्ट प्रस्तुत नाटकांत त्यानें गोंवून ठेविली आहे. भवभूतीची जन्मभूमि विदर्भदेशांतील पद्मपुर हें आम्हीं वर पाहिलेंच. भवभूतीस उत्तरहिंदुस्थानांतील ( त्या वेळच्या ) प्रसिद्ध पद्मावती शहराचाही–त्याच्या प्रस्तुत नाटकांतील वर्णनावरून पाहतां–चांगला परिचय होता.

1. See Journal of the Royal Asiatic Society for April 1914, pp. 323–325.

असें उघड होतें. हें शहर प्राचीन काळीं विद्याभ्यासाकरितां प्रसिद्ध होतें. तेव्हां मालतीमाधवांतील नायकाप्रमाणेंच भवभूतीही पद्मावतीस आन्वीक्षिक्यादि शास्त्रें शिकण्यास आला असेल असें अनुमान करणें साहजिक आहे. त्याचप्रमाणें तत्कालीन विश्वविद्यालयांचे[1] भवभूतीच्या प्रस्तुत नाटकामधून जे उल्लेख ( १·१२$^{१-३}$ वगैरे ) आले आहेत, अथवा उत्तररामचरिताच्या दुसऱ्या अंकाच्या विष्कंभांतील आत्रेयीचें किंवा त्याच नाटकांतील चवथ्या अंकाच्या विष्कंभांतील सौधातकि व भांडायन या हूड, चौकस व सालस बालविद्यार्थ्यांचें जें रम्य चित्र भवभूतीनें आपणांसमोर ठेविलें आहे, तें सर्व अनुभवाच्या लेखणींतूनच उतरलें असलें पाहिजे. किंबहुना भूरिवसु व देवरात यांनीं 'तुला मुलगी झाली व मला मुलगा झाला तर उभयतांचा विवाह करून देऊं' अशी जी विद्यार्थिदशेंत प्रतिज्ञा[2] केली होती तसली प्रतिज्ञाही भवभूतीच्या ओळखीच्या कोणीं विद्यार्थ्यांनीं केलेली त्याला ठाऊक असेल अशीही कल्पना केल्यास ती अगदींच अस्थानीं होणार नाहीं. मात्र ही आमची निव्वळ कल्पना आहे हें वाचकांनीं विसरूं नये.

१७ छ.—मालतीमाधवांतील आणखीही एक प्रसंग भवभूतीनें दुसरीकडून उसना घेतला आहे. मालतीमाधवाच्या नवव्या अकांतील प्रसंग कालिदासाच्या विक्रमोर्वशीय, मेघदूत, इत्यादिकांतून घेतला आहे हें वर ( § ९) सांगितलेंच आहे व कित्येक यापुढें जाऊन असेंही प्रति-

१. प्राचीन काळीं हिंदुस्थानांत तक्षशिला, नालंदा, उज्जयिनी इत्यादि ठिकाणीं अनेक विश्वविद्यालयें होतीं. त्यांतून कोठें कोठें दहा दहा हजार विद्यार्थी रहात असत. व तेथील एकंदर शिस्तीचीं व शिक्षणक्रमाचीं चिनांतून आलेल्या प्रवाशांनीं रसभरित वर्णनें करून ठेविलीं आहेत. हें सांगितल्यास एकदम खरें सुद्धां वाटूं नये इतकी आपल्या प्राचीन इतिहासाबद्दल आपली हल्लीं अनास्था झाली आहे.

२. विद्यार्थीदशेमध्यें आपण काय काय प्रतिज्ञा—काय काय उदात्त संकल्प—करीत नाहीं! अनुभवाच्या वावटळींत सांपडल्यावर यांपैकीं किति मनोरथ तगून रहातात—किति आपण अमलांत आणूं शकतों—याची कोणीं गणाति केली आहे काय ?

पादन करितात कीं कालिदासानें वर्णिलेलाच प्रसंग घेऊन त्यांत त्याच्या-वर वरचढ करावी एवढ्याचकरितां केवळ भवभूतीनें मालतीमाधवाचें संवि-धानक विनाकारण दहा अंकापर्यंत वाढविलें आहे. या आक्षेपाचा विचार आपण पुढें करूं.

**१८ क. मूळ गोष्टी संविधानकांत गोंवितांना त्यांत भव-भूतीनें केलेले फेरफार व त्यांचें नाट्यदृष्ट्या महत्त्व.**—याप्रमाणें भवभूतीचें मालतीमाधव[1] हें अठरा धान्याचें मिळून केलेलें कोडबोळें आहे. त्यांत अगदीं नवीन असें फार थोडें आहे. तरी पण मूळ गोष्टींतील कोणता भाग ठेवावयाचा कोणता गाळावयाचा व कोणत्या स्वनिर्मित भागाची त्यास जोड द्यावयाची हें ठरविण्यांत भवभूतीनें फार चिकित्सक दृष्टि दाखविली आहे.

मालती व माधव यांच्या प्रेमाची कहाणी ही या नाटकांतील प्रधान वस्तु होय. मकरंद व मदयंतिया या उपनायकउपनायिकांची गोष्ट उपकथेदाखल आहे. प्रधान कथानकांत भवभूतीनें केलेला पहिला मुख्य फेरफार ह्मणजे भूरिवसु व देवरात यांनीं परस्परांच्या मुलामुलींच्या विवा-हासंबंधीं विद्यार्थिदशेंत असतांना केलेली प्रतिज्ञा. अशा रीतीनें मालती व माधव यांचा विवाह पूर्वसंकल्पित असल्यानें देवरात आपला मुलगा माधव यास मुद्दाम होऊन पद्मावतीस पाठवितो, व तेथें मालतीच्या तो व त्याच्या मालती दृष्टीस पडेल अशी बुध्या खबरदारी घेतली जाते. नायकनायि-कांची दृष्टादृष्ट झाल्यावर त्यांचें प्रेम परस्परांवर बसेल हें सर्वांनीं जवळ जवळ गृहीतच घेतल्यासारखें दिसतें, व त्याप्रमाणें तें घडून येतें. या नंतर भवभूतीनें एक मूळांत नसलेला प्रकार कल्पिला आहे. नायक नायि-कांच्या प्रेमसंबंधास बृहत्कथेप्रमाणें मुख्य अडचण नायिकेच्या बापानें

१. मालतीमाधवाचें सर्वच संविधानक येथें समग्र देऊन द्विरावृत्ति करण्याचें कारण नाहीं. ज्या मूळ गोष्टींवर तें रचिलें आहे त्या वर दिल्याच आहेत, त्यांव-रून त्याची कल्पना होईलच. इतक्या उपर ज्यांस त्याची आवश्यकता भासेल त्यांनीं कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा 'कविपचकां'तील भवभूतीवरील निबंध ( पृष्ठें ६६–७० ) पहावा.

तिला दुसऱ्यास देऊं केली होती ही होय. पण येथें असा प्रश्न उद्भवतो कीं नायकानें तरी नायिकेच्या बापाजवळ आरंभींच राजरोसपणें मागणी कां केली नाहीं? मूळ कथेंत या प्रश्नास समाधानकारक उत्तर मिळत नाहीं. तें भवभूतीनें दिलें आहे. भूरिवसूस पद्मावतीच्या राजाचा अमात्य कल्पून व मालतीकरितां राजामार्फत नंदनाच्या वतीनें मागणी करवून भवभूतीनें मालतीमाधवांच्या विवाहास एक तिसरीच अडचण पुढें आणिली आहे. अर्थात् भूरिवसु आंतून जरी त्या विवाहास अनुकूल होता तरी बाहेरून तो आपणांस माधवाचें नांवगांवही ठाऊक नसल्याचें दाखवितो. आपल्या धन्याविरुद्ध उघडपणें जाण्याचें त्यास धैर्य होत नाहीं. इच्छित हेतु साधण्यास जें काय कारस्थान करावयाचें तें कामंदकी[1] या नवीनच भूमिकेकडून करविलें आहे. बृहत्कथेंत कामंदकीचा कोठें मागमूसही नाहीं.

१८ ख.—मूळ बृहत्कथेप्रमाणें नायकनायिकांचें प्रेम जुळल्यावर त्या संबंधास नायिकेच्या बापाची प्रतिकूलता पडेल असें दिसतांच मागें कसें होईल याचा विचार न करितां संधि साधून उभयतां ( देवळांतून ) पळून जातात. असले प्रकार इंग्रजी कादंबऱ्यांतून व त्यांचें उघड अथवा प्रच्छन्नपणें अनुकरण करून बनविलेल्या व अलीकडे अलीकडे प्रचारांत आलेल्या कादंबऱ्यांतून अनेकशः आढळतात. पण भवभूतीस हा प्रसंग सर्वांशीं योग्य वाटला नाहीं. मालती दुसऱ्याचा हात धरून पळून गेल्यास, भूरिवसूची तिच्या तसें करण्यास संमति होती या सबबीवर, त्याच्यावर त्याच्या धन्याची ( नंदनाच्या बाबतींत आपली इच्छा पूर्ण झाली नाहीं म्हणून ) इतराजी होईल हें तर असोच; पण मालतीचा स्वभावच भवभूतीनें इतका सालस, आज्ञाधारक, व प्रेमळ कल्पिला आहे कीं कुलीन स्त्रियेस अनुचित असें कोणतेंही कृत्य—विशेषतः बापाच्या पसंतीनापसं-

१. भूरिवसु व देवरात यांजबरोबरच विश्वविद्यालयांत कामंदकीचें शिक्षण झालें होतें. व तिच्या समक्षच उभयतांची अपत्यविवाहसंबंधीं प्रतिज्ञा झाली होती. शिक्षणक्रम संपल्यावर कामंदकी पद्मावतीस एका बौद्ध विहारांत जोगतीण होऊन राहिली होती व तिला राजदरबारीं वगैरे चांगला मान असे. भवभूतीच्या वेळीं बौद्ध धर्म अगदीं निकृष्टावस्थेस अर्थात् पोहोंचला नव्हता. मालतीमाधव १०·२१ द्वि पहा.

तीची पर्वा न करितां—तिच्या हातून कालत्रयींही घडलें नसतें. पण असें हें दुष्कर कार्यच तिजकडून करवून घेण्यांत कामंदकीचें बुद्धिकौशल्य खर्च होत आहे. प्रथम मालतीच्या नजरेस माधव वरचेवर पडेल अशी ती व्यवस्था करिते. पुढें माधवाचें रूप, कुल, शील, इत्यादिकांची ती मालतीच्या देखत प्रशंसा करिते, व उलटपक्षीं नंदनाचे ( खरे खोटे ईश्वर जाणे; मूळ कथेप्रमाणें तर नायिकेच्या पित्यानें तिजसाठीं पाहिलेला वर सुस्वरूप होता असें आहे ) अवगुण तिखटमीठ लावून वर्णिते. शकुंतला, उर्वशी, वासवदत्ता, इत्यादि पूर्वींच्या स्त्रियांनीं स्वमतानेंच अनुरूप पतीची निवड कशी केली व त्याचा परिणाम सर्वांस हितकर कसा झाला हें जुन्या ऐतिहासिक कथा सांगून मालतीच्या मनांत बिंबविण्याचाही ती प्रयत्न करिते. व मालतीच्या मनाची स्थिति बरीच आपल्या बेतास अनुकूल झाली आहे असें पाहतांच कांहीं तरी निमित्त काढून शंकरपुरसंबंधीं कुसुमाकरोद्यानांत मालती व माधवाची समक्ष गांठ पडण्याचाही प्रसंग ती आणिते (मालतीमाधव अंक ३, प्रवेशक ). यासमयीं मोकळ्या सुटलेल्या वाघाचें एक मध्येंच विघ्न येतें, परंतु सर्व स्थिरस्थावर झाल्यावर या विघ्नाचाही कामंदकी आपल्या बेतास अनुकूल असा उपयोग करून घेते. व मालतीचा नंदनाशीं विवाह निश्चित ठरल्याची बातमी येण्यापूर्वींच माधवाकडून ती प्रीतिदान करविते ( मालतीमाधव ४·१ ). प्रतिकूल व परस्परविरोधी परिस्थितींत सांपडलेल्या मालतीचें हें अनुपम स्वभावरेखन व तसेंच कामंदकीचें अंतस्थ कारस्थान हीं भवभूतीनें पदरचीं घातलीं आहेत, व त्यामुळें सविधानकास बरीच मनोरमता आली आहे.

**१८ ग.**—इतक्या सर्व उपायांनींही मालतीचें मन पित्राज्ञेविरुद्ध स्वयंवराचें साहस करण्यास तयार झालें नाहीं तें नाहींच. ज्या एका गोष्टीमुळें तिचें मन शेवटीं वळलें ती गोष्ट कामंदकीच्या कारस्थानामुळें घडून आली नाहीं. ती गोष्ट सहज दैवगत्या घडून आली. कामंदकीनें त्या गोष्टीचा पूर्ण फायदा घेण्याचें मात्र सोडिलें नसावें ( मालतीमाधव ६·१९[४] ). ही गोष्ट म्हणजे विवाहापूर्वीं अघोरघंट नामक कापालिकानें देवतेस बलि देण्याकरितां केलेला मालतीचा अपहार व दैववशात् त्या वेळीं स्मशानांत संचार करीत असणाऱ्या माधवानें अघोरघंटास मारून

तिची केलेली सोडवणूक. येथें भवभूतीनें मूळ कथानकास एका दुसऱ्या गोष्टीची पुस्ती दिली आहे ( मागें §१७ घ ). असें करण्यानें एकतर मालतीचें मन माधवाकडे जास्त आकर्षित होऊन जें आजपर्यंत करितांना तिला कसेंसें वाटत होतें तें करण्याची तिची तयारी झाली; दुसरें, स्मशानांतील रौद्र व बीभत्स प्रकार वर्णन करण्याची कवीस संधि मिळून 'भून्ना रसानां गहनाः प्रयोगाः' ( १·६ ) या वचनांतून तो मुक्त झाला; आणि तिसरें, नायकाकडून नायिकेचा असा प्राणसंकटांतून बचाव झाल्यानें या बाबतींत प्रधान कथानकाचें उपकथानकाशीं साम्य प्रस्थापित झालें.

**१८ घ.**—कारण, नाटकामध्यें जेथें जेथें दोन कथानकांची सांगड घातलेली असते तेथें तेथें त्या कथांमध्यें येणाऱ्या भिन्न भिन्न प्रसंगांमध्यें व नायकनायिकेच्या व उपनायकउपनायकेच्या स्वभावामध्यें थोडें बहुत साम्य व थोडा बहुत भेद बहुशः ठेविलेला आढळतो, व असें करण्यांत एकाचा प्रकाश दुसऱ्यावर पाडून दोन्हींही चित्रें स्पष्ट करण्याचा कवीचा अभिप्राय असतो. या दृष्टीनें आपण आतां उपकथानकाचें परीक्षण करूं या.

मूळ कथानकाप्रमाणें उपनायक नायकास फांसांतून सोडवितो तेव्हांपासूनच कायती त्यांची ओळख सुरू होते, व तीही फार वेळ टिकत नाहीं. देवळांत नायकास नायिकेचा लाभ होतांक्षणीं तो उपनायकास बिकट परिस्थितींत सोडून रस्ता सुधारितो. पुढें पुष्कळ वेळानें त्याची फिरून गांठ पडते पण ती गोष्ट अलाहिदा आहे. भवभूतीनें मकरंदास माधवाचा बालपणापासूनचा मित्र ( मालतीमाधव १·१८[२५] ) कल्पिलें आहे, व परस्परांनीं परस्परांकरितां जीव सुद्धां वेंचण्यास अनमान करूं नये इतक्या दर्जाची त्यांची मैत्री आहे. माधवाबरोबरच तो पद्मावतीस येतो व आरंभापासून त्याला मालती मिळवून देण्याच्या कामीं मनापासून साहाय्य करितो. मालतीचा माधवाशीं ज्या स्थळीं चोरून विवाह व्हावयाचा होता त्याच स्थळीं पुढें मकरंदाचा मदयंतिकेशीं होणार होता; व राजाच्या इतराजीचें भय उभयतांस सारखेंच असल्यामुळें विवाहोत्तर उभयतांचा कार्यक्रमही जवळ जवळ एकसारखाच ठरला असला पाहिजे.

मकरंदमदयंतिकेचा विवाह कामंदकीनें जरी पूर्वींपासून घडून आणविण्याचें ठरविलें होतें तरी मकरंदाची मदयंतिकेशीं प्रत्यक्ष दृष्टादृष्ट तो तिला वाघाच्या जबड्यांतून सोडवितो तेव्हांच होते. मूळांमधील हत्तीच्या ऐवजीं वाघ आणिला एवढाच कांहीं येथें भवभूतीनें फरक केला नाहीं. हा फरक क्षुद्र होय. लक्षांत ठेवावयाची गोष्ट ही कीं, आपण जिला मृत्युपाशांतून सोडविली ती कोणाची कोण हें मकरंदास पूर्ण ठाऊक होतें. व त्यामुळें पुढें जेव्हां मालतीचा वेष घेऊन मकरंद देवळांतून बाहेर पडतो तेव्हां नंदनाचे घरीं आपणास आपल्या भावी पत्नीची भेट होणार एवढेंच नव्हे तर त्यानंतर पुढें आपण काय काय करणार हें अगोदरपासूनच कामंदकीच्या साहाय्यानें मकरंदानें ठरवून ठेविलें होतें. सारांश, जिचें आपणास नांवगांव ठाऊक नाहीं व जिला आपण एकदांच पाहिली अशा स्त्रीच्या शोधार्थ पृथ्वीवर भटकणें, व पुढें कांहीं मौजेखातर व कांहीं एका व्यसनबंधूस त्याच्या प्रियेचा लाभ करून देण्याच्या सदिच्छेनें नवऱ्यामुलीचा वेष घेऊन लगीनघरीं जातांच तेथें त्या हरपलेल्या स्त्रीरत्नाची अवचित गांठ पडणें ह्या मूळ कथेंतील अत्यंत असंभवनीय वाटणाऱ्या गोष्टी भवभूतीनें आपल्या नाटकांत पुष्कळ सुसंबद्ध करून दाखविल्या आहेत. नंदनाच्या घरांतून रात्रीं पळून येत असतां वाटेंत पाहरेकऱ्याची व मकरंदाची ( व नंतर माधवाचीही ) चकमक उडावी व त्यामध्यें उभयतांनीं दाखविलेलें शौर्य पाहून राजानें संतुष्ट होऊन सर्व अपराध माफ करावेत व उभयतांच्या विवाहांस अनुमोदन द्यावें ही गोष्ट अर्थात् अनपेक्षित होती. सर्व गोष्टी अशा रीतीनें निभावून जातील ह्याची कामंदकीलाही अटकळ बांधतां आली नाहीं. राजाचा कोप दूर करण्याचें तिनें कसें योजिलें होतें हें भवभूतीनें स्पष्ट जरी कोठें सांगितलें नाहीं तरी एकदां लग्न उरकल्यावर राजाला तरी काय करितां येणार होतें? असो.

१७ ङ.—अशा प्रकारचें हें उपकथानक प्रधान कथानकाशीं ताडून पहातां त्यांत साम्यें आढळतात तीं अशीं. नायक व उपनायक दोघेही सकृद्दृष्ट युवतीवर एकदम प्रेम करूं लागतात, व त्यांच्या प्रेमपात्रांकडूनही प्रीतीची परतभेट होते. माधव मालतीस ज्याप्रमाणें कापालिकाच्या ताव-

डींतून सोडवितो त्याप्रमाणें मकरंद मदयंतिकेस वाघाच्या जबड्यांतून मुक्त करितो, व या प्राणरक्षणामुळेंच पुढें उभयतांचीं मनें एकमेकांकडे जास्त आकर्षित होतात. एरवीं मालती माधवाचा (व मदयंतिका मकरंदाचा) हात धरून जाण्यास तयार झाली असती कीं नाहीं याची वानवाच आहे ( मालतीमाधव ६·१९[४], ७·१[७१] पहा ). हीं वरवर दिसणारीं साम्यें झालीं पण त्यांमधील भेद विशेष सूक्ष्म आहेत. माधव व मालती यांची पहिली भेट कामदेवायतनाच्या उद्यानामध्यें स्वाभाविकपणें घडून येते; मकरंदमदयंतिकेची भेट मोकळ्या सुटलेल्या वाघाच्या धांदलींत म्हणजे अपूर्व व कांहीं अंशीं कृत्रिम परिस्थितींत. तसेंच मालती ही अत्यंत आज्ञाधारक व शालीन अशी दाखविली आहे, पण दरबारी नंदनाची बहीण मदयंतिका ही धीट व एककल्ली अशी रंगविली आहे. माधवाच्या मानानें मकरंदाची प्रीतिही कमी सात्त्विक अशी होती. वास्तविक पहातां जिचा प्राण आपण वांचविला तिजकरितां नंदनाजवळ उघडपणें मागणी घालण्यास मकरंदास कांहीं अडचण नव्हती. पण चौर्यविवाहच तो पसंत करितो. कामंदकी व तिला अनुकूल असलेली मंडळी दोन्ही लग्नांकरितां परिश्रम करितात, पण मालतीमाधवांच्या लग्नाकरितां—विशेषतः मालतीचें मन वळविण्याकरितां—जें काम करावें लागतें तें अधिक अवघड होतें. मकरंदमदयंतिकेच्या लग्नास विशेष अडचणच मुळीं नव्हती. राजाच्या कोपाची भीति उभयत्र सारखीच होती व तिचें निराकरणही एकदमच झालें.

१८ च.—येथवर कथा व उपकथा यांचें आपण परीक्षण केलें. पण या दोन भिन्न भिन्न कथांचा एकजीव केला तरच नाटकास संविधानैक्य येणार. नाहीं तर एका नाटकाचीं दोन नाटकें होतील. ज्या एका मुख्य प्रसंगामुळें हा सांधा जोडिला आहे तो प्रसंग म्हणजे मकरंदानें नवऱ्यामुलीचा वेष घेऊन[१] देवळांतून बाहेर पडणें व त्याचें नंदनाशीं लग्न

१. हा वेष उमगल्याशिवाय कसा राहिला असें विचारण्यांत येतें. कल्पनेच्या साम्राज्यांत सर्व कांहीं शक्य आहे. केवळ नाट्यदृष्ट्या पहावयाचें झाल्यास नाटकांतील मकरंद नाटकांतील मालतीप्रमाणें दिसण्यास हरकत नाहीं;

होणें. मूळ कथेमध्यें हा पुरुषापुरुषांचा विवाह प्रत्यक्ष झाला असा उल्लेख नाहीं. पण भवभूतीनें जरा जास्त मौज आणण्याकरितां हा विवाह प्रत्यक्ष झाला एवढेंच नव्हे तर मकरंद व नंदनाची एकातांत गांठ पडली व तेथें बिचाऱ्या नंदनास मकरंदाचा लत्ताप्रहार सोसावा लागला व त्यामुळें तो दुरुत्तरें करून महालांतून रागानें निघून गेला आणि याच मिषानें नवऱ्या मुलीची समजूत करण्याकरितां मदयंतिका तेथें आली व तिला मकरंदाची ओळख पटून उभयतां पळून गेले अशी आपल्या पदरची जास्त भर घातली आहे. या मुख्य प्रसंगाशिवाय दुसऱ्या दोन किरकोळ प्रसंगांचीही संविधानैक्यास मदत झाली आहे. वाघाच्या धांदलीमुळें मालतीमाधवांचें तसेंच मकरंदमदयंतिकेचें प्रेम जास्त दृढ होऊन त्यास वाचा फुटली आहे, व शेवटीं सरकारी पाहरेकऱ्यांशीं झालेल्या चकमकीमुळेंच उभयतां-वरील राजकोपाचें निवारण झालें आहे.

१८ छ.—सर्व गोष्टी सुयंत्रित जमून आल्यावर, म्हणजे मालती माधवाच्या व मदयंतिका मकरंदाच्या हस्तगत झाल्यावर एवढेंच नव्हे तर राजानें सौजन्यानें दोन्ही विवाह कबूल केल्यानंतर, नाटक वास्तविक संपावें. पण भवभूतीनें हें नाटक आणखी दोन अंक लांबविलें आहे. मालतीचा कापलिकाकडून अपहार करविण्यामध्यें भवभूतीला काय साधावयाचें होतें तें आपण वर ( § १८ ग ) पाहिलेंच आहे. या कापालिकाची कपालकुंडला म्हणून एक शिष्यीण होती. आपल्या गुरूचा माधवानें वध करावा हें तिला अर्थात् खपलें नाहीं. स्त्रीवध करूं नये म्हणून माधवानें तिला जीवें सोडिलें होतें; त्याचा फायदा घेऊन ती माधवावर सूड उगविण्याची संधि पहात होती. ती संधि माधव व मकरंद पहारेकऱ्याशीं झगडण्यांत गुंतले असतां तिला मिळाली व एकाएकीं येऊन

कारण नाटकांतील मालतीची भूमिका भवभूतीच्या नाटकमंडळींत तरी पुरुषानेंच घेतली होती ( मालतीमाधव १.१०[२–३] ) व या नाटकमंडळींत सारख्या तोंडावळ्याचीं दोन मुलें होतीं व उत्तररामचरितांमध्यें ह्यांनींच लवाची व चंद्रकेतु ( आणि कुश ) यांची भूमिका घेतली होती. पुढें उत्तररामचरित ६.१४ नंतर चंद्रकेतु जातो तेथील टीप पहा.

तिनें मालतीस उचलून आकाशमार्गानें पोबारा केला. मालती अशी अवचित नाहींशी झाली म्हणून अर्थात् सर्व शोक करूं लागले. माधव तर (विक्रमोर्वशीयांतील पुरूरव्याप्रमाणें ) उन्मत्तच झाला. मकरंदानें त्याचाच मार्ग स्वीकारला. कामंदकी सर्वांची आई शोभण्यासारखी होती; तिला आपलें कारस्थान नांवारूपास येतें न येतें तोंच हें आकस्मिक विघ्न आल्यामुळें अत्यंत दुःख झालें. भूरिवसु मालतीचा प्रत्यक्ष बाप तेव्हां त्याच्या स्थितीबद्दल बोलावयालाच नको. हीं सर्व मनुष्यें शोक करितात एवढेंच नव्हे तर कोणी डोंगराच्या कड्यावरून खालीं घालून घेऊन तर कोणी अग्निकाष्ठें भक्षण करून प्राण देण्याच्या विचारास लागतात. जणूं काय शोकाचा प्रतिकार आत्महत्त्येशिवाय होणें अशक्यच होतें ! दैववशात् कामंदकीची सौदामिनी नांवाची एक शिष्यीण ( ही सुद्धां कापालिक व्रताचीच होती, परंतु सात्त्विक प्रवृत्तीची होती ) ऐन वेळीं अचुक प्राप्त होऊन कपालकुंडलेपासून मालतीचा व आत्महत्त्येच्या व्यवसायापासून मकरंद, माधव, कामंदकी, लवंगिका, मदयंतिका, भूरिवसु इत्यादि सर्व मंडळींचा बचाव करिते व अशा रीतीनें नाटकाचा शेवट गोड होतो. कपालकुंडलेच्या खुनशी स्वभावामुळें शेवटच्या दोन अंकांत जो हा घोंटाळा माजून राहिला आहे तो सर्व भवभूतीनेंच बुध्या निर्मिलेला आहे. मूळांत यास बिलकुल आधार नाहीं.

१८ ज.—पुष्कळांचा असा तर्क आहे कीं भवभूतीनें प्रथम जें मालतीमाधव रचिलें होतें त्यांत कपालकुंडलेचा संबंध नव्हता. पण कालिदासाच्या विक्रमोर्वशीयाच्या चवथ्या अंकांतील प्रसंगासारखा प्रसंग आपल्या एकातरी नाटकांत असावा एवढ्याच करितां भवभूतीनें—उत्तररामचरित नाटक रचून झाल्यावर[1]—मालतीमाधवास पुढील दोन अंक

१. असें ह्मणण्याचें कारण उत्तररामचरितांतील बरेच श्लोक व श्लोकार्ध मालतीमाधवांत अक्षरशः आले आहेत. मालतीमाधवाच्या एकट्या नवव्या अंकांतच अशीं ७ स्थळें आहेत,–मालतीमाधव अंक ९ श्लोक ६, १२, १४, २०, २४, ३४ व ५४ प्र. यांपैकीं एकच स्थळ असें आहे ( मालतीमाधव ९·१४=उत्तररामचरित १·३१ ) कीं ज्या संबंधानें उत्तररामचरितांतील श्लोक प्रथम व मालतीमाधवांतील नंतर असें निश्च-

( व इतर आवश्यक भाग ) जोडिले. पण आमच्या मतें हा तर्क बरोबर नाहीं. नाटकांत कपालकुंडला मुदलींच नसती तर नाटक एकंदरींत आटोपशीर झालें असतें हें खरें. पण तसें करण्यास शेवटचे दोन अंकच कमी करून भागणार नाहीं. आठव्या अंकांतील बराचसा भाग नव्यानें लिहावा लागेल. व तसेंच सहाव्या अंकांचा विष्कंभक, पांचव्या अंकांतील कपालकुंडलेचें सर्व संभाषण, व पहिल्या अंकाच्या विष्कंभांतील कपालकुंडला व सौदामिनी संबंधीं सर्व उल्लेख वगळावा लागेल. इतक्या दूरवर जाणारे फेरफार भवभूतीनें मागाहून या नाटकांत केले असतील असें आम्हांस तरी वाटत नाहीं. अघोरघंटास जर कपालकुंडला ही शिष्यीण होती तर अघोरघंटाबरोबर तिचें कांहींतरी व्हावयाला पाहिजे. माधवानें अघोरघंटास मारिलें असें कळतांच कोणीही गोष्टी ऐकण्यांत तरबेज झालेला मुलगा 'कपालकुंडलेचें काय झालें?' म्हणून विचारीलच. आणि प्रेक्षकांचीही तीच स्थिति आहे. माधवानें कपालकुंडलेला मारिलें तरी पाहिजे किंवा तिची दुसऱ्या रीतीनें वासलात तरी लागली पाहिजे. तिला अधांतरीं ठेवून कोणाचेंही समाधान होणार नाहीं. मालतीमाधवाच्या संविधानकास दोष द्यावयाचा असल्यास द्यावा; पण अशा तऱ्हेनें मूळच्या आटोपशीर संविधानकाचा एका क्षुद्र हेतूनें भवभूतीनें बिघाड केला असा अन्यायाचा आरोप मात्र त्याजवर करूं नये. मालतीमाधव नाटक पहिल्यापासून भवभूतीनें लिहिलें तसेंच तें आजमितीस आपणांसमोर आहे असें समजून काय टीका करावयाची असेल ती करावी.

**१९ क. मालतीमाधव; संविधानकाच्या रचनेंतील दोष.**— येथपावेतों आपण मालतीमाधवाचें संविधानक कोणकोणत्या आधारांवर रचिलें, व मूळांत भवभूतीनें कोणकोणते फेरफार व कोणकोणत्या हेतूंनीं केले तें सर्व पाहिलें. महावीरचरितामध्यें अनैक्यांतून ऐक्य कसें उत्पन्न

थानें म्हणतां येईल. तरी पण मालतीमाधवांतील प्रेम, शोक, इत्यादिकांचीं सर्वच वर्णनें इतकीं वरकरणीं व ठराविक साच्यांतील आहेत कीं हेंही स्थळ अपवादात्मकच आहे अशी ग्वाही देतां येणार नाहीं. या बाबतींत पुढें § १९ ख पहा.

करावयाचें--दहा पंधरा वर्षांतील विविध प्रसंग कोणत्या धाग्यानें एकजीव करून दाखवावयाचे--हा प्रश्न मुख्य होता. मालतीमाधवांतील प्रश्न ह्याच्या अगदीं उलट आहे. आरंभीं एक साधें कथानक घेऊन त्यास विविधता व वैचित्र्य आणण्याकरितां दुसऱ्या स्वतंत्र कथानकाची--संविधानैक्यास बाध न आणितां--कशी जोड देतां येईल हा प्रश्न येथें सोडविण्याचा भवभूतीचा प्रयत्न आहे. हा दुसरा प्रयत्न जरी पुष्कळ अंशानें साधला आहे तरी त्यांत कांहीं दोष राहिलेच आहेत. अद्भुत व बीभत्स रसाचा परिपोष करीत असतांना भवभूतीनें सर्व संविधानकच अस्वाभाविक करून सोडिलें आहे, व त्यामुळें केव्हां कोणावर काय संकट येणार याची अटकळ मुळींच न झाल्यानें आपल्या कौतुकाचा विरस होतो. प्रेक्षकांस अद्भुत रसाचे घुटकेच्या घुटके पाजल्यानें त्यांचें चित्त संविधानकांत वेधून राहील असा भवभूतीचा समज झालासा दिसतो. पण प्रेक्षकांस वरचेवर आश्चर्यचकित करण्यापेक्षां अमुक एक गोष्ट अशी होणार आहे असा तर्क चालविण्यास त्यांना मधून मधून संधि देऊन आपला तर्क सफल झाल्यामुळें होणाऱ्या आनंदाच्या गुदगुल्यांनींच प्रेक्षक जास्त खुष होतात.

कामंदकीच्या हातीं कारस्थानाचीं सर्व सूत्रें देण्याचा भवभूतीनें प्रयत्न केला आहे पण जें घडून येतें त्यापैकीं बराचसा भाग अन्य आकस्मिक साधनांनींच घडून येतो. मदयंतिकेस वाघानें धरणें व मकरंदानेंच तिला सोडविणें, अघोरघंटानें मालतीचा अपहार करणें व आयत्या वेळीं माधवानेंच तिला मुक्त करणें, किंवा कपालकुंडलेनें फिरून मालतीस पळवून नेणें व तिला सौदामिनीनें सोडवून आणणें, यासारख्या मानवी कारस्थानाच्या पलीकडील--केवळ दैवी योगायोगाच्या--गोष्टी सोडून दिल्या तरी राजाच्या कोपाचें कामंदकी कोणत्या तऱ्हेनें निवारण करणार होती हें भवभूतीनें कोठेंही स्पष्ट दर्शविलें नाहीं. समुद्रांत तारूं लोटून दिलें आहे, आपण शक्य ती सावधगिरी ठेविलीच आहे, प्रयत्नही अढळ आहे; आज जरी पैलतीर दिसत नाहीं तरी कांहीं तरी होईल व कसें तरी आपण इच्छित स्थळ गाठूं अशा प्रकारच्या आशावादाची कामंदकीच्या कारस्थानांत पुष्कळ झांक मारिते. व त्यामुळें तिच्या सूत्रधारित्वाला थोडासा कमीपणा येतो.

तथापि हें कबूल केलें पाहिजे कीं घडून येणाऱ्या सर्व गोष्टींवर जरी कामंदकीचा ताबा नसला तरी गोष्ट घडून आल्यावर तिचा आपला मतलब साधण्यास कसा उपयोग करून घ्यावयाचा हें कामंदकीला पूर्णपणें अवगत होतें. वाघाच्या धांदलीचा व अघोरघंटाच्या विघ्नाचा तिनें काय उपयोग करून घेतला हें आपण ( § १८ ख, ग ) पाहिलेंच. शिवाय महावीरचरितांतील माल्यवानाच्या इतका दूरदर्शीपणा—पाताळयंत्रीपणा म्हणा हवा तर—कामंदकीच्या अंगीं न ठेविल्यानें तिच्या स्वभावरेखनास एका प्रकारें मदतच झाली आहे. एखादी वृद्ध, धोरणी, कावेबाज, पढीक[1] व कनवाळू बाई खरोखरीची जशी असावी तशी कामंदकी दाखविली आहे व कांहीं कांहीं स्थळीं तर ( विशेषतः ६ व्या अंकाच्या अखेरीस ) तिचें चित्र अप्रतिम साधलें आहे.

दुसरी गोष्ट अशी कीं मालतीमाधवाच्या—व एकंदरींत भवभूतीच्या तीन्ही नाटकांच्या—वाचनावरून जी एक गोष्ट आपल्या मनावर विशेषपणें ठसण्याचा संभव आहे, म्हणजे दैवाची विचित्र लीला व ऐहिक वस्तूंची नश्वरता, त्या गोष्टीची ( त्याच्या स्वानुभवावरून ) कदाचित् भवभूतीला स्वतःला इतकी जाणीव पटली असेल कीं त्यामुळें संविधानकाच्या होणाऱ्या हानीस न जुमानतां मालतीमाधवाच्या द्वारा मुद्दाम ही गोष्ट जगाच्या निदर्शनास आणून देण्याचा त्याचा उद्देश असूं शकेल. मालतीमाधवामध्यें भागधेयाच्या चंचलतेचा जो जागोजाग उल्लेख आणिला आहे[2] तो याचकरितां असावा. निदान नाट्याच्या दृष्टीनें पहातां या गोष्टीकडे आपलें मन वेधल्यानंतर—संसार असार व क्षणभंगुर आहे असें आपणांस बजाविल्यानंतर ( मालतीमाधव ८·१० चवथा चरण पहा )—एखादें ( कपालकुंडलेसारखें ) आकस्मिक संकट आपल्यावर येऊन गुदर-

१. जरा फाजील पढीक म्हटल्यास हरकत नाहीं. कामशास्त्रासुद्धां सर्व शास्त्रें तिला पूर्ण अवगत होतीं, व आपल्या विद्वत्तेचें प्रदर्शन करण्याची तिला फार हौस होती. अथवा भवभूतीलाच अशी हौस होती असें म्हटल्यास विशेष शोभेल.

२. उदाहरणार्थ; मालतीमाधव ४·४द्वि, ४·७, ५·२७[३], ५·२८, ८·१०, ८·१४, ९·८[च], ९·३९, ९·४९, १०·१३, वगैरे स्थळें पहा.

त्यास तें कितीही चमत्कारिक असलें तरी आपणांस अगदींच अनपेक्षित असें वाटत नाहीं. अशा रीतीनें संविधानकावरील या आक्षेपाचें अंशतः निराकरण करणें शक्य आहे.

१९ ख.—सदर संविधानकाचा दुसरा ठळक दोष म्हणजे त्यांतील अश्लील जरी नसला तरी अप्रौढ शृंगार ( ज्याला इंग्रजींत sentimentality असें म्हणतां येईल). माधवानें (तसेंच मकरंदानें) तर्कशास्त्राबरोबरच कामशास्त्राचें अध्ययन केलें असावें आणि म्हणूनच पुस्तकांतून कामातुरांचें जसें वर्णन त्यानें वाचलें असेल तशीच स्वतःची स्थिति आहे असें कल्पून तसतशी तो कृतिही करितो. उदाहरणार्थ, सकाळच्या प्रहरीं कामदेवायतनांत मालतीस पाहिल्यानंतर एक दोन तासांनीं आपल्या कामी स्थितीचें वर्णन करितांना तो म्हणतो ( मालतीमाधव १·३४ )—‘ तेव्हांपासून जो माझ्या अंगाचा भडका उडाला आहे तो बर्फाच्या ( बर्फासारख्या शीतल ) तलावानें थंड पडत नाहीं कीं चंद्राच्या ( किरणांनीं ) कमी होत नाहीं ! ’ आतां दिवसाढवळ्या माधवास चंद्र कोठून भेटला ? सारांश, कोणत्याही मनोविकाराचें सांप्रदायिक कविसमयासिद्ध वर्णन ( आपल्या कल्पनेनें त्यांत थोडेबहुत अलंकारिक फेरफार करून ) देण्यापलीकडे भवभूतीची अजून मजल गेली नाहीं.[1] मानवी हृदयांत खोल बुडी मारून त्यांतील सूक्ष्म मनोविकारांचें यथार्थ चित्र उमटविण्याची कला ( जी जगांतील बऱ्या वाईट गोष्टी स्वतः अनुभविल्याशिवाय केवळ पुस्तकी विद्येनें सहसा वश होत नसते ) ती अद्याप भवभूतीस प्राप्त करून घ्यावयाची होती हें यावरून उघड दिसतें. महावीरचरितानंतर लवकरच भवभूतीनें मालतीमाधव रचिलें असावें.

**२० क. मालतीमाधवांतील इतर दोष.**—परीक्षणाच्या पहिल्या अंगाचा म्हणजे संविधानकाच्या एथवर सांगोपांग विचार झाला. पण मालतीमाधव हें नाटक नसून कादंबरी असती तरी वरील परीक्षण त्यास लागू पडतें. नाटकाचें वैशिष्ट्य म्हणजे दिलेल्या संविधानकाची प्रस्तावना, प्रवेशक, विष्कंभक, अंक, इत्यादिकांमध्यें विभागणी अथवा

१. यास एकच अपवाद आणि तो मालतीचें स्वभावरेखन. वर § १८ ख पहा.

मांडणी. विस्तारभयास्तव या बाबतींतील एक दोन प्रश्नच येथें आपण विचाराकरितां घेऊं. नाटकाच्या मांडणीच्या दृष्टीनें संविधानकाचे दोन भाग पडतात. एक प्रयोगरूपानें प्रत्यक्ष करून दाखवावयाचा भाग, व दुसरा अंकांच्या दरम्यान घडून आला म्हणून सांगावयाचा भाग. कोणता भाग पहिल्या सदरांत घालावयाचा व कोणता दुसऱ्या सदरांत आणावयाचा हें ठरविणें हें बुद्धिमत्तेचें काम आहे. आमच्या नाट्यशास्त्राच्या नियमाप्रमाणें युद्ध, मृत्यु, इत्यादि प्रसंग रंगभूमीवर प्रत्यक्ष दाखवूं नयेत असें आहे. पण भासादिक नाट्यकारांनीं या नियमास उघड उघड धाब्यावर बसविलें आहे. ही गोष्ट अलाहिदा ठेविली तरी कित्येक प्रसंगच असे असतात कीं ते, प्रत्यक्ष प्रयोगरूपानें जितके खुलून दिसतील तितके, दुसऱ्यांनीं संवादरूपानें त्यांचें कितीही बहारीचें वर्णन केलें तरी, प्रेक्षकांच्या मनावर परिणाम करूं शकणार नाहींत. उदाहरणार्थ प्रस्तुत नाटकाच्या पहिल्या अंकांतील मालतीमाधवांच्या भेटीचा प्रसंग. माधवानें त्याचें वर्णन करून सांगण्यापेक्षां तो प्रेक्षकांपुढें प्रत्यक्ष घडवून दाखविला असता तर बरें झालें असतें. हा एक अपवाद खेरीज करून मालतीमाधवाची इतर सर्व मांडणी व्यवस्थित आहे. कांहीं कांहीं प्रवेश तर ( जसें, अंक ६, ४, व ८ ) उत्कृष्टच साधले आहेत. परंतु कोठें कोठें भाषणामध्यें वर्णनात्मक भाग वाजवीपेक्षां जास्त आला आहे. या शेवटच्या मुद्याचें विवेचन पुढें होणारच आहे.

दुसरा प्रश्न विष्कंभकासंबंधानें, म्हणजे मध्यंतरीं घडून आलेला जो कथानकाचा अंश वर्णनरूपानें प्रेक्षकांपुढें मांडावयाचा त्या संबंधानें. विष्कंभ अथवा प्रवेशक हे जाणूनबुजून कृत्रिम; नाटकाच्या सोईकरितांच कवीनें अस्तित्वांत आणिलेले. त्यांचा उद्देश माहिती देण्याचा. पण नाट्यकाराचें खरें कौशल्य त्यांना होतां होईल तितकें स्वाभाविक बनविण्यामध्यें असतें. माहिती द्यावयाची पण ती देतों असें भासावावयाचें नाहीं. अर्थात् विष्कंभाच्या आरंभीं एखादें पात्र येऊन मी अमक्याचा अमूक, अमूक ठिकाणाहून अमूक कार्याकरितां येथें आलों अशी आपली कुळकथा सागूं लागलें तर तो विष्कंभक अगदींच गौण दर्जाचा मानिला पाहिजे. ग्रीक नाटकांच्या प्रवेशकांमध्यें ( Prologues ) अशी स्थिति

असते. मालतीमाधवांतील नवव्या, पांचव्या, व सातव्या अंकाचे विष्कंभही असेच सदोष आहेत. उत्तररामचरिताच्या चवथ्या अंकाच्या विष्कंभाच्या तोडीचा एकही विष्कंभक प्रस्तुत नाटकांत नाहीं. विष्कंभक लांबलचक असल्यास प्रेक्षकांच्या कुतूहलाचा भंग होतो हें तत्त्वही भवभूतीच्या मनांत अजून पूर्णपणें बिंबलेलें दिसत नाहीं.

**२० ख.**—नाटकाच्या परीक्षणाचें तिसरें अंग जी भाषा त्यासंबंधानेंही विशेष विस्तारानें लिहावयास नको. मालतीमाधवाच्या भाषेंतील दोष——उदाहरणार्थ क्लिष्टता, समासभूयस्त्व, अनुप्रासादिकांची फाजील आवड, वगैरे——उघड उघड दिसणारे आहेत. पांचव्या अंकांतील स्मशानवर्णन अथवा नवव्या अंकांतील वनश्रीचें वर्णन इत्यादि कांहीं भाग काव्य या दृष्टीनें उत्तमांपैकीं आहेत, व जागोजागीं आलेल्या उपमा वगैरे भवभूतीच्या लौकिकास सर्वस्वीं साजतील अशाच आहेत; हें जरी खरें तरी मागें ( पृष्ठ ३८ पहा ) महावीरचरितांतील वर्णनास आम्हीं जो दोष दिला तोच येथेंही बऱ्याच अंशानें लागू पडतो. एवढें मोठें नाटक मध्यें छाटाछाट न करितां प्रयोगरूपानें रंगभूमीवर येतच नसावें अशी कित्येक शंकाही घेतात; पण या शंकेचें निरसन भवभूतीच्या वेळीं रंगभूमि कशी होती, प्रेक्षक कोणत्या दर्जाचे होते, नाटकाची वेळ कोणती होती, उपकरणें (Stage properties ) कसलीं होतीं इत्यादि बाबी निश्चित झाल्याशिवाय होणार नाहीं. मालतीमाधवाइतकेंच मोठें असलेलें मृच्छकटिक नाटक संस्कृतांतून अथपासून इतिपर्यंत एक श्लोकही न वगळितां रंगभूमीवर कांहीं वर्षांमागें आल्याचें आम्हांला माहीत आहे.

दुसरा मुद्दा असा कीं प्रत्येक होतकरू नाटककार जें नाटक रचितो तें प्रेक्षकांची कुवत पाहूनच रचित असतो. प्रेक्षकवर्गापैकीं कोणालाही बिलकुल न समजणारा असा बराच मोठा भाग लोकप्रियतेची इच्छा करणारा भवभूतीसारखा नाटककार नाटकांत आणील तरी कसा ? अर्थात् आजकाल आपणांस जें क्लिष्ट व समासप्रचुर गद्य वाटतें तें समजण्यास भवभूतीच्या प्रेक्षकांस फार श्रम पडत नसावेत असें अनुमान करणेंच जास्त सयुक्तिक होईल. आपण आपल्या मातृभाषेंत रोजच्या व्यवहारांत जें बोलतों त्यांत प्रत्येक शब्दानंतर आपण थांबतों काय ? ज्याला

आमची मातृभाषा विशेष परिचित नसेल त्याला आमचीं वाक्यें म्हणजे एक लांबलचक समासच वाटणें शक्य आहे; व आमच्याप्रमाणें त्याला जर ऐकल्याबरोबर झटपट शब्द तोडितां आले नाहींत[1] तर आज आम्हीं जो दोष भवभूतीच्या भाषेस देतों तोच दोष तो आपणांस देणार नाहीं काय ? लांब लांब समास ऐकल्याबरोबर समजण्याइतकें संस्कृत भाषेवर ज्यांचें प्रभुत्व आहे त्यांना भवभूतीचे समास त्रासदायक होतील असें मला वाटत नाहीं. त्यांमध्यें दूरान्वित समास फारच थोडे आहेत.

तिसऱ्या अथवा सातव्या अंकांतील समासप्रचुर प्राकृत वर्णनासंबंधानें आणखीही एक गोष्ट लक्षांत आणावयाची ती अशी कीं ज्याअर्थीं हीं वर्णनें संस्कृतांत नाहींत त्या अर्थीं तीं इतर प्रेक्षकांच्या मानानें किंचित् अशिक्षित अशा लोकांकरितां असावींत. या वर्णनांचा विषय श्रृंगारिक आहे; एक दोन ठिकाणीं तर त्यांत अश्लीलता आहे. यावरूनही हेंच अनुमान दृढ होतें. व असलीं हीं वर्णनें अगदीं उत्तान असूं नयेत याकरितां सुद्धां भवभूतीनें या ठिकाणीं लांबलचक समास योजिले असल्याच्या संभव आहे.

मालतीमाधवांतील भाषेसंबंधानें भवभूतीस अनुकूल अशा करितां येतील तितक्या कल्पना केल्यानंतर या नाटकांतील बऱ्याच ठिकाणची भाषा सरळ, प्रसादयुक्त, व कार्यक्षम आहे असें म्हटल्यास कित्येकांना आश्चर्य वाटेल; पण हें विधान खरें आहे. महावीरचरिताच्या मानानें पाहिलें तर मालतीमाधवांतील भाषा पुष्कळच चांगली आहे. व त्यांत एक दोन जे सर्वोत्कृष्ट प्रवेश आहेत त्यांमध्यें तर भाषेबद्दल अशी नांव ठेवावयास थोडीच जागा सांपडेल. महावीरचरिताशीं तुलना करून पहातां या

१. फ्रेंच व जर्मन भाषांसंबंधानें मला स्वतःला असाच अनुभव आला. या भाषा मला वाचतां येत होत्या पण बोलण्याचा अथवा ऐकण्याचा तितका सराव नव्हता. अर्थात् प्रथम दोन चार दिवस फ्रेंच अथवा जर्मन लोकांनीं उच्चारिलेलीं त्या त्या भाषेंतील साधीं वाक्येंही—शब्द कोठें तुटतात हें न समजल्यामुळें—मला एकदम लक्षांत आलीं नाहींत. तींच वाक्यें त्यांनीं ( शब्द तोडून ) लिहून दाखविल्यास मला तेव्हांच कळलीं असतीं. बंगाली भाषेसंबंधानेंही असाच अनुभव महाराष्ट्रीयांना येतो.

नाटकांत भवभूतीच्या नाट्यकलेची सर्वांगांनीं प्रगति झाली आहे असेंच दिसून येईल. असो. मालतीमाधवाचें परीक्षण बरेंच लांबलें. आतां आपण भवभूतीच्या नाट्यकलेचें शेंडेफळ जें उत्तररामचरित त्याजकडे वळूं या.

## उत्तररामचरित; सर्वसाधारण टीकात्मक विवेचन

**२१ क. उत्तररामचरिताची सर्वांगसुंदरता.**—मालतीमाधव रचून झाल्यानंतर बऱ्याच वेळानें—ह्मणजे नाट्यकलेचें रहस्य भवभूतीस पूर्णपणें अवगत झाल्यानंतरच—त्यानें उत्तररामचरित हें नाटक रचिलें असावें. कवीनें स्वतःच म्हटल्याप्रमाणें ( उत्तररामचरित ७-२०च ) तो त्यावेळीं ' परिणतप्रज्ञ ' झाला होता. ह्या मध्यंतरींच्या काळांत भवभूतीनें जीं कांहीं काव्यें अथवा नाटकें रचिलीं असतील त्यांचा हल्लीं मागमुस सुद्धां उरला नाहीं ( मागें § ११ पहा ). उपलब्ध कृतींमध्यें उत्तररामचरित हें सर्वोत्कृष्ट आहे याबद्दल फारसा मतभेद असणें शक्य नाहीं. नाट्यपरीक्षणाच्या कोणत्याही कसोटीस लाविलें तरी हें नाटक बऱ्याच वरच्या दर्जाला येतें. कांहीं कांहीं बाबतींत तर तें अगदीं निर्व्यंग आहे असें सुद्धां म्हणतां येईल. या नाटकासंबंधानें आम्हांस जें कांहीं म्हणावयाचें आहे तें आम्हीं भाषांतरामध्यें जागोजाग दिलेल्या टिपांमधून व विशेषतः प्रत्येक अंकाच्या व विष्कंभकाच्या शेवटीं जोडिलेल्या विस्तृत विवेचनांमध्यें नमूद केलें आहेच. तथापि कांहीं मुद्दे येथें एकवटून सांगितल्यास फारशी पुनरुक्ति होणार नाहीं.

उत्तररामचरिताचें संविधानक अगदीं साधें आहे. किंबहुना या नाटकास संविधानकच नाहीं व जें आहे तें विस्कळित आहे, असाही आक्षेप एका दृष्टीनें त्याजवर आणितां येईल. उत्तररामचरिताचा खरा रोंख मानससृष्टीवर आहे हें ज्यांनीं आरंभापासून ओळखिलें नाहीं त्यांच्या, या नाटकांत काय चाललें आहे, संविधानकाची प्रगति होत आहे कीं तोच तोच भाग पुनः पुनः आल्यानें त्याची गति कुंठित झाली आहे, हें नीटपणें लक्षांत येणार नाहीं व त्यांना या नाटकांतील बराच भाग कंटाळवाणा व अप्रयोजक असा वाटणें शक्य आहे. उत्तररामचरितांत आलेले प्रसंग ज्या एका अंतस्थ दुव्यानें जखडिले आहेत तो एकदां

मनांत ठसला म्हणजे अथपासून इतिपर्यंत सर्व संविधानकाची रचना कशी सुयंत्रित आहे हें तेव्हांच समजून येतें. या प्रश्नाचें विस्तृत विवेचन तिसऱ्या अंकाच्या अखेरीं येणारच आहे.

मूळ कथानकांत भवभूतीनें फारच थोडा फेरफार केला आहे. वाल्मीकिरामायणांतील उत्तरकांडाच्या आधारें हें नाटक रचिलें आहे व शोकपर्यवसायी नाटक करणें नाट्यशास्त्राच्या नियमाविरुद्ध असल्यानें भवभूतीनें या नाटकाचा शेवट गोड करून दाखविला आहे असें साधारणतः मानिलें जातें. परंतु हें सर्वांशीं खरें नाहीं. लोकापवादास्तव टाकिलेल्या सीतेचा रामानें पुनः अंगीकार केला व उभयतांनीं अनेक वर्षें सुखानें राज्य केलें अशा प्रकारचीही एक रामायणाची परंपरा भवभूतीस ठाऊक होती, व वाल्मीकीच्या उत्तरकांडाच्या ऐवजीं भवभूतीनें ही परंपरा आधारास घेऊन हें नाटक रचिलें असावें असें आम्हांस वाटतें. पद्मपुराणांतील पातालखंडाच्या पहिल्या ६८ अध्यायांत या प्रकारची कथा आली आहे ( विशेषतः ६६ व्या अध्यायांतील श्लोक १३४-१८४ पहा ). व येथेंच रामाच्या अश्वमेधसमयीं लवानें दाखविलेल्या पराक्रमाचें वर्णन आहे. वाल्मीकीच्या उत्तरकांडांत हा भाग आला नाहीं.

पद्मपुराणांतील कथेंत व भवभूतीच्या उत्तररामचरितांत कांहीं किरकोळ भेद आहेत. पद्मपुराणाप्रमाणें अश्वरक्षणार्थ भरतपुत्र पुष्कलाची योजना केली होती लक्ष्मणात्मज चंद्रकेतूची नव्हती. या वेळीं लवाचें वय १६ वर्षांचें होतें, १२ वर्षांचें नव्हतें. पद्मपुराणाप्रमाणें वाल्मीकीनें स्वतः कुशलवांस धनुर्वेद व अस्त्रविद्या शिकविली होती; याविरुद्ध उत्तररामचरित ९·१९ पहा. उत्तररामचरितांत राम स्वतः युद्धभूमीवर येतो; पुराणांत तसें नाहीं. त्याचप्रमाणें पुराणांत सीतेनें केलेल्या दुसऱ्या दिव्याचा उल्लेख नाहीं. याशिवाय भवभूतीनें नाटकांत पदरचें असें जें कांहीं घातलें आहे—उदाहरणार्थ चित्रदर्शन प्रसंग,[1] वासंति या पात्राची व 'छाया'रूप

१. येथें आम्हांस कोणी असा सवाल करील 'कां हो, तुम्हीं चित्रदर्शनप्रसंगाची इतकी स्तुति करितां पण रामाच्या पूर्वचरितांतील त्या त्या प्रसंगांचीं वर्णनेंच येथें एका पाठीमागून एक आलीं आहेत. तीं कितीही प्रतिभायुक्त

सीतेची तसेंच शेवटच्या अंकांतील गर्भनाटकाची योजना, वगैरे वगैरे— तें सर्व मुळाशीं विरुद्ध आहे असें म्हणतां येणार नाहीं. नाटकद्वारा जो प्रश्न सोडवावयाचा होता त्यास अनुकूल असेच हे प्रसंग आहेत व ते कवीनें स्वप्रतिभेनें कल्पिले आहेत. या सर्व प्रसंगांचें कार्य आम्हीं पुढें विशद करून दाखविणारच आहोंत.

२१ ख.—उत्तररामचरिताच्या संविधानकाची मांडणी तर अत्यंत हृदयंगम झाली आहे. नाटकाचा प्रारंभ व ' बीजनिक्षेप ' ( पुढें पहिल्या अंकाच्या शेवटीं दाखविल्याप्रमाणें ) इतक्या चतुराईनें केला आहे कीं कोणत्याही भाषेंतील फारच थोड्या नाटकांना तो लाभला असेल. जी गोष्ट नाटकाच्या आदीची तीच त्याच्या मध्याची व अंत्याची. यांतील विष्कंभकही ( एक अपवादखेरीज करून ) आटोपशीर व कार्यक्षम असे साधले आहेत. स्वभावरेखनाची तर कमालच केली आहे, व दहा श्लोकांनीं जें कार्य साधावयाचें तें कोठें कोठें दहा शब्दांतच उरकलें आहे.

पहिल्या दोन नाटकांशीं तुलना करितां या नाटकाची भाषा पुष्कळच सुधारली आहे. चार दोन स्थळीं भवभूति पूर्वपदावर गेला आहे. पण एकंदरींत भाषेंत सरलता, मार्दव, प्रसाद, व अर्थगांभीर्य बरेंच आलें आहे. व कोणत्या पात्राच्या तोंडीं कोणती भाषा, कोणत्या उपमा

असलीं तरी नाटक या दृष्टीनें तीं गौणच नव्हेत काय ? ' आक्षेप बरोबर आहे. पण समजा, तुम्हांआम्हांस अत्यंत परिचित अशा एका चित्राचें, इमारतीचें, अथवा वनश्रीचें यथार्थ वर्णन एखाद्या आजकालच्या नाटकांत योग्य स्थळीं आलें तर तें तुम्हांस कंटाळवाणें वाटेल कीं तुमच्या अंतश्चक्षूपुढें असलेलें चित्र कवीच्या शब्दचित्राशीं ताडून तीं जुळलीं म्हणजे तुम्हीं आनंदानें मान डोलवाल ? जुन्या काळच्या राजवाड्यांत भिंतींवरून पुराणांतरींचे अनेक प्रसंग चित्ररूपानें काढिलेले असत. अशाप्रकारचीं चित्रें भवभूतीच्या प्रेक्षकांच्या अत्यंत परिचयाचीं असतील तर त्यांना हा भाग मुळींच कंटाळवाणा होणार नाहीं. प्रसिद्ध पृथ्वीराज चव्हाण याचा असा एक राजवाडा होता. त्याचें व रामायणांतील जीं जीं चित्रें तेथें काढिलीं होतीं त्यांचें सुंदर वर्णन 'पृथ्वीराजचरित' नामक एका बाराव्या शतकांतल्या संस्कृत महाकाव्यांत आलें आहे.

आणिल्या पाहिजेत याकडे कवीनें फार बारकाईनें लक्ष दिलें आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं—विशेषतः ५ व्या अंकांतील युद्धप्रसंगांत—सृष्टीचें अथवा मनोविकारचें वर्णन करितांना अतिशयोक्तीची किंचित् छटा दिसत आहे. पण त्यानें रसभंग क्वचितच होतो. पण या सर्व बाबींचा अशा-रीतीनें येथें मोघम उल्लेख करीत न बसतां पुढें त्या त्या स्थळीं टिपांतून जें आम्हीं प्रस्तुत नाटकाचें गुणदोषविवेचन केलें आहे तेंच वाचण्यास आम्हीं आमच्या वाचकांस आग्रहाची शिफारस करितों.

**२२. भवभूतीच्या तीन्ही नाटकांत आढळणाऱ्या कांहीं विशिष्ट बाबी.**—एखाद्या नाटककारास अथवा त्याच्या एखाद्या नाट-कास एकादोघानें अथवा बऱ्याचजणांनीं सर्वोत्कृष्ट ठरविलें म्हणून तो ग्रंथकार अथवा त्याची ती कृति सर्वांस सारखीच प्रिय झाली पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. 'भिन्नरुचिर्हि लोकः'। तरी पण आपण एकादी गोष्ट कां वाखाणितों अथवा कां निंदितों हें सोदाहरण सांगतां आल्यास बरें. भवभूतीचें उत्तररामचरित हें चांगलें काव्य असेल, पण नाटक या दृष्टीनें तें अगदीं गचाळ आहे असें ठरवून एवढेंच नव्हे तर त्यांत अमुक अमुक फेरफार केले पाहिजेत व ते असे असे केले पाहिजेत असें प्रति-पादन करणाऱ्यांनीं दोन गोष्टी अगोदर केल्या पाहिजेत. एकतर भवभूतीचें नाटक पूर्णपणें समजावून घेण्याचा मनापासून प्रयत्न केला पाहिजे आणि दुसरें ज्या प्रेक्षकवर्गाकरितां, ज्या प्रकारच्या रंगभूमीवर, ज्या उप-करणानिशीं भवभूतीचें उत्तरामचरित हें नाटक प्रथम पुढें आलें, त्यांचें अस्तित्वांत असलेल्या साधनाच्या योगानें शक्य तितकें पूर्ण ज्ञान करून घेतलें पाहिजे. कारण नाट्यकार हा नाट्यविषयक परिस्थितीचा पूर्ण दास बनलेला असतो. ही गोष्ट लक्षांत वागवून, आणि भवभूतीच्या उत्तर-रामचरितामध्यें पुढें प्रयोगाच्या सोईकरितां जे फेरफार घडून आल्याचें आम्हांस आढळून आलें आहे त्यांजवर अप्रत्यक्ष रीतीनें प्रकाश पडावा म्हणून, भवभूतीच्या सर्व नाटकांत साधारण अशा ज्या बाबी आहेत—व ज्यांवरून हीं नाटकें भवभूतीच्या वेळीं कदाचित् एकाच नाटकमंडळी-कडून प्रयोगरूपानें पुढें आलीं असावींत असा तर्क करितां येईल—त्यां-पैकीं प्रमुख येथें आम्हीं नमूद करितों.

भवभूतीचीं सर्व नाटकें कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगीं तात्पुरत्या उभ्या केलेल्या रंगभूमीवर प्रयोगरूपानें केलीं होतीं. त्याचीं उपलब्ध तीन्ही नाटकें आनंदपर्यवसायी आहेत व त्यांतील नायकांस एकच पत्नी आहे; कालिदासाच्या नायकांप्रमाणें ते बहुपत्नीक नाहींत. करुण रस उत्तररामचरितामध्यें प्रधान आहे पण दुसऱ्या दोन्ही नाटकांमध्यें तो आलाच आहे. तीन्ही नाटकांमध्यें शोक करणाऱ्या वृद्धाचें एक पात्र आहे. व तीन्ही नाटकांमध्यें सारख्या तोंडावळ्याचीं निदान दोन तरी पात्रें घातलीं आहेत. नाटकांमध्यें भवभूतीनें एकच प्रकारचें ( शौरसेनी ) प्राकृत घातलें आहे व प्राकृतांत पद्य असें मुळींच नाहीं.[1] दोन नाटकांमध्यें विमानांचा प्रत्यक्ष उपयोग आहे व तिसऱ्यामध्यें विमानांशिवाय हवेंत उड्डाण करणारीं पात्रें ( कपालकुंडला, सौदामिनी, वगैरे ) आहेत. ज्यांमध्यें विमानें आहेत त्यांमध्यें सुद्धां हावभावांवरच सर्व काम भागवून घेतलें जात असावें. त्याचप्रमाणें आपल्याकडील जुन्या पौराणिक नाटकांमध्यें राक्षसपात्र प्रवेश करतांना जशी राळ उडविली जात असे तशाच प्रकारचा एकदम उजेडाचा लोळ व लगेच काळाकुट्ट अंधकार जेणेंकरून करावा लागेल असा एकेक तरी प्रसंग ( ' व्यतिकर इव भीमस्तामसो वैद्युतश्च ' हा श्लोक; पहा मालतीमाधव ९.५४, १०.८; उत्तररामचरित ५.१३; महावीरचरित[2] १.४३ ) प्रत्येक नाटकांत आणिला आहे. नाटकांमध्यें एका प्रवेशापासून दुसऱ्या प्रवेशांत स्थलांतर केलें जाऊं नये, सर्व प्रवेश एकाच घरीं निदान एकाच गांवांत तरी घडून आलेले असावेत; आणि प्रत्यक्ष प्रयोगास जितका वेळ लागतो तितक्याच वेळांत ( निदान २४ तासांपेक्षां कमी वेळांत) सर्व संविधानक आटपणारें असावें अशा प्रकारचे कालस्थलैक्याचे जे नियम ग्रीक नाटकांस लाविले जात असत ते भवभूतीस मान्य नाहींत. मालतीमाधवांतील संविधानकास सुमारें तीन महिने लागतात तर उत्तररामचरितास बारा व महावीरचरितास तर पंधराहून अधिक वर्षें लागतात. सर्व नाटकांमध्यें स्थलाची फेरपालट वरचे-

१. मालतीमाधव ८.१० व ११ या दोन श्लोकांची शब्दरचना अशी ठेविली आहे कीं ते प्राकृतामध्यें व संस्कृतामध्यें एकसारखेच असावेत.

२. येथें श्लोक अक्षरशः जरी तोच नसला तरी भावार्थ तोच आहे.

वर केली जाते. कांहीं प्रवेश घरांत आहेत तर कांहीं राजवाड्यांत, कांहीं उद्यानांत, कांहीं रस्त्यांत, कांहीं स्मशानांत, कांहीं तपोवनांत, कांहीं गहन अरण्यांत, तर कांहीं उंच अंतरिक्षांतही ठेविले आहेत. अर्थात् हीं इतकीं स्थलांतरें सीनसीनरीनें दाखविलीं जात नसत, तर नाट्यशास्त्राच्या बाराव्या अध्यायांत वर्णिल्याप्रमाणें हावभावांनीं. शेवटीं भवभूतीच्या प्रेक्षकवर्गासंबंधानें विचार करितां त्यांपैकीं कांहीं शास्त्रीपंडित असावेत ( ज्यांच्या करितां तो आपल्या शास्त्रीय ज्ञानाचें प्रदर्शन करितो ), व बरेचसे अडाणी असावेत ( ज्यांची रुचि श्रृंगार—अश्लील श्रृंगार—व असभ्य धागडधिंगा आणि अशक्य व उद्दाम मनोविकार यांच्या पलीकडे गेलेली नव्हती ); त्यांमध्यें मार्मिक व सहृदय प्रेक्षक विरळच असावा ( आणि म्हणूनच आपल्या नाटकांतील खोंचा त्याच्या त्यालाच लोकांच्या निदर्शनास आणून आत्मस्तुतीच्या दोषास कवीला वरचेवर पात्र करून घ्यावें लागत होतें. दुसरींही कांहीं किरकोळ साम्यें आहेत. हीं सर्व यदृच्छेनें घडलेलीं नाहींत तर समान नाट्यविषयक परिस्थितीमुळेंच उद्भवलीं आहेत असें निदान आम्हांस तरी वाटतें. असो.

एथपावेतों आम्हांस भवभूतीविषयीं उपोद्घातरूपानें जें म्हणावयाचें होतें तें म्हटलें. आमचे तर्क व सिद्धांत सर्वांस सारखेच पटतील अशी आमची मुळींच अटकळ नाहीं. प्रत्येकानें त्या त्या नाटकाचें प्रत्यक्ष परिशीलन करून आपआपलें मत स्वतःच बनवावयाचें आहे; व ज्यांचा संस्कृताशीं निकट परिचय नाहीं अशांना असें करण्याची संधि द्यावी एवढ्याच करितां आम्हीं भवभूतीच्या उत्तररामचरित या मूळ संस्कृत नाटकाचें मराठींत अक्षरशः भाषांतर करण्याचें योजिलें. तेव्हां आतां पडद्याची दोरी फार वेळ हातांत धरून न ठेवितां पडदा वर करून एकदम मंगलाचरणासच आरंभ करवावा तें बरें.

# भवभूतिप्रणीत उत्तररामचरित

## नाटकांतील पात्रांची यादी*

[ पडद्यांतून बोलणारीं व पडद्यामागें कल्पिलेलीं पात्रें या यादींत नमूद नाहींत. ]

### १ कार्यकारीं पात्रें

**राम**, दशरथ व कौसल्या यांचा पुत्र, कोसलाधिपति (राजधानी अयोध्या).

अष्टावक्र, एक ब्राह्मण दूत.

दुर्मुख, रामाचा गुप्त हेर.

कंचुकी, अंतःपुराधिकारी वृद्ध ब्राह्मण.

प्रतीहारी, द्वारपालिका.

शंबूक,† जनस्थानांतील शूद्रतपस्वी.

कौसल्या, दशरथपत्नी व रामाची माता.

गृष्टि, तिचे तैनातीस असलेला कंचुकी.

**सीता**, जनकाची पृथ्वीपासून प्राप्त झालेली कन्या, रामाची पत्नी.

जनक, सीतेचा पिता, विदेहदेशाचा राजा (राजधानी मिथिला).

अरुंधती, वसिष्ठ ऋषींची पत्नी.

**कुश** आणि **लव**, राम व सीता यांचे जुळे पुत्र.

वाल्मीकि, रामायणप्रणेता, कुशलवांचा पालनकर्ता.

**लक्ष्मण**, दशरथ व सुमित्रा यांचा पुत्र, रामाचा बंधु.

चंद्रकेतु, लक्ष्मण आणि ऊर्मिला यांचा पुत्र.

सुमंत्र, चंद्रकेतूचा सारथि.

पुरुष, चंद्रकेतूच्या सेनेंतील एक शिपाई.

* सदर यादीमध्यें पात्रांचें व्यवस्थित वर्गीकरण करून त्यांचें महत्व व परस्पर संबंध चटकन् लक्षांत यावेत अशी योजना केली आहे.

† रामानें याला मारल्यानंतर हा दिव्य पुरुष होऊन येतो.

## २ सूचक पात्रें

[हीं प्रस्तावनाविष्कंभकांतूनच प्राय: येतात; व पडद्यामागें झालेल्या गोष्टी सुचावितात.]

पहिल्या अंकाच्या प्रस्तावनेंत—

नांदी म्हणणारा ( अथवा म्हणणारे ) नट.

सूत्रधार.

एक नट.

दुसऱ्या अंकाच्या विष्कंभकांत—

वासंती,* जनस्थानांतर्गत पंचवटींतील वनदेवता.

आत्रेयी, वाल्मीकीजवळ अध्ययन करणारी एक स्त्री.

तिसऱ्या अंकाच्या विष्कंभकांत—

तमसा,* तमसा नदीची देवता.

मुरला, मुरला नदीची देवता.

चवथ्या अंकाच्या विष्कंभकांत—

भांडायन } कुशलवांबरोबर वाल्मीकिजवळ
सौधातकि } अध्ययन करणारे तापसपुत्र.

चवथ्या अंकाच्या शेवटीं अश्वमेधाचा घोडा येतो तेव्हां—

मुलें, कुशलवांचे सहाध्यायी.

पांचव्या अंकाच्या विष्कंभकांत—

विद्याधर } लवचंद्रकेतूंचें युद्ध विमानांतून
विद्याधरी } पहाण्यास आलेलें जोडपें.

सातव्या अंकांतील गर्भनाटकांत—

सूत्रधार, वाल्मीकीच्या उपनाटकाची प्रस्तावना करणारा.

सीता }
पृथ्वी† } त्या त्या भूमिका घेणाऱ्या अप्सरा.
भागीरथी† }

नुकतेच उपजलेले जुळे मुलगे.

* ह्या दोघी तिसऱ्या अंकामध्यें प्रधान भूमिकांप्रमाणेंही कार्य करितात.

† खऱ्या पृथ्वीभागीरथी रंगभूमीवर येतच नाहींत. सातव्या अंकाच्या अखेरीस पडद्यामागून त्यांचीं कांहीं भाषणें आहेत.

॥ श्री ॥

# भवभूतिविरचित उत्तररामचरित

## नाटकाचें मराठी भाषांतर

### अंक १ ला

प्राचीन कवींना हें आम्हीं विधिपूर्वक नमन करितों;
आणि तदनंतर परमात्म्याची अमृतकला जी वाग्दे-
वता तिजप्रतही वंदितों. १

( ही नांदी[1] म्हणून झाल्यावर )

**सूत्रधार**—पुरे झालें एवढेंच मंगलाचरण; विस्ताराची काय जरूर आहे ? आज भगवान् कालप्रियनाथाच्या[2] यात्रेमुळें जमलेल्या सज्जनांस मीं नम्रतापूर्वक असें कळवितों कीं, काश्यपगोत्रीय श्रीकंठ नांवाचा व भवभूति ह्या संज्ञेनें प्रसिद्ध असा एक कवि आहे;

मूर्तिमंत ब्रह्मदेवच अशा त्या कवीला वाग्देवता[3]
पूर्ण वश आहे. त्यानें रचिलेलें उत्तररामचरित
नाटक येथें प्रयोगरूपानें आम्हीं दाखविणार आहों.२

तर मग प्रयोगाच्या अनुसंधानानें हा मीं अयोध्यावासी व त्या वेळेचा एक झालों. ( चहूंकडे पाहून ) कायहो, पुलस्त्याच्या[4] कुलाचा संहार करणारे परमपूज्य श्रीराममहाराज यांचा जर हा अभिषेकसमय आहे, व तो समय रात्रंदिवस मंगल स्तुतिपाठांनीं

१. ही नांदी सूत्रधार व त्याचे सहकारी यांनीं मिळून म्हणण्याची असते. नांदीनंतर सूत्रधाराशिवाय इतर नट निघून जात असावेत. पण ही बाब निश्चित नाहीं.

२. उज्जयनींतील महाकालेश्वर. उपोद्घात §§ २ व ३ पहा.

३. वाग्देवता अथवा सरस्वती ब्रह्मदेवाप्रमाणेंच कवीस वश आहे हा अर्थ.

४. पुलस्त्य हा रावणाचा आजा.

जर आपणांस आनंदानें साजरा करावयाचा आहे, तर चौकांमध्यें
६ कोणी चारण नाहींत आणि आज सर्व सामसुम आहे हें काय?

**एक नट** ( प्रवेश करून )—कविजी,[१] महाराजांनीं त्यांची आज आपआपल्या घरीं रवानगी केली; लंकेंतील युद्धांत मदत करणारे ते
९ महात्मे वानर व राक्षस, तसेच अनेक दिशांस पावन करणारे[२] ब्रह्मर्षी व राजर्षी, जे अभिषेकोत्सवाकरितां येथें आले होते व ज्यांच्या सन्मानार्थ हा आज इतके दिवस उत्सव सुरूं होता, त्यांची
१२ बोळवणी झाली. आणि नुकत्याच—

वसिष्ठऋषींच्या पुढाकाऱ्यानें अरुंधतीसहवर्तमान
श्रीरामाच्या वृद्ध माता यज्ञाकारणें जामाताच्या
आश्रमाप्रत निघून गेल्या. ३

**सूत्रधार**—अस्सं. मग ठीक.

**नट**—मी परदेशस्थ[३] म्हणून विचारितों, हा जामात कोण?

**सूत्रधार**—दशरथमहाराजांस शांतानामक कन्या झाली.
तिला त्यानीं राजा लोमपादास दत्तक म्हणून दिली.४

तिचें विभांडकाचा पुत्र ऋष्यशृंग ह्याच्याशीं लग्न झालें. ऋष्यशृंगानें हल्लीं द्वादशवार्षिक सत्र आरंभिलें आहे. त्यामुळें सूनबाई जानकीचे
३ दिवस भरत आले असूनही, तिला मागें ठेऊन वडील माणसें तिकडे गेलीं आहेत. असो. आपणांस त्याशीं काय कर्तव्य आहे? चला. राजद्वारीं जाऊन आपल्या पेशास योग्य ती चाकरी बजावूं या.
६ **नट**—तर मग राजापुढें म्हणण्यास योग्य—अगदीं निर्दोष—असा एकादा स्तुतिपर श्लोक ध्यानांत आणा.

१. संस्कृत, 'भाव'. नट सूत्रधारास 'भाव' असें संबोधितो व सूत्रधार नटास 'मारिष' या नांवानें हांक मारितो.

२. निरनिराळ्या दिशांहून आलेले हा भावार्थ.

३. हा नट अभिषेकोत्सवाकरितां अयोध्येस आला असावा, व म्हणूनच अयोध्यावासी (१·२[१]) सूत्रधारापेक्षां बाजारबातम्या काढण्यामध्यें (१·३, १·६) याची उत्सुकता जास्त. राम हल्लीं कोठें आहेत ही बातमी सुद्धां हा परगांवचा नटच विचारित आहे (१·६[४]).

**सूत्रधार**—मारिषा,

जें आपणांस करावयाचें असेल तें कर्तव्य एव-
ढ्याच दृष्टीनें करावें; त्यामध्यें अगदींच दोष नाहींत
असें कसें होईल ? स्त्रियांच्या असो, अथवा कवि-
त्वाच्या असो. चांगुलपणाविषयीं लोक हे नेहमीं
कुत्सितच. ५ *

**नट**—अहो, कुत्सित नव्हे अतिकुत्सित.

कारण देवि सीतेस सुद्धां दोष लावण्यास लोक[1]
मागें पुढें पहात नाहींत. रावणाच्या घरीं ती
राहिली हें त्यांना निमित्त झालें आहे; आणि
अग्निशुद्धीवर त्यांचा म्हणे विश्वास बसत नाहीं ! ६

**सूत्रधार**—जर कां आतां हा जनप्रवाद महाराजांच्या कानावर गेला तर अनर्थ होणार आहे.

**नट**—ऋषिदेवतांच्या अनुग्रहानेंच हें अरिष्ट[2] सर्वथा टळेल. ( पुढें होऊन[3] ) काय हो, हल्लीं महाराजांची स्वारी कोठें आहे ? ( ऐकलेसें करून ) हे असें सांगतात कीं—

अभिषेकोत्सव साजरा करण्यास आलेला राजा
जनक इतके दिवस स्नेहास्तव येथें राहून आज

*वाग्यवहार करावा अनिंद्यतेला असे कुठें थारा ॥
स्त्रीच्यापरीं वाणीच्या साधुत्वीं लोक दुर्जनाचि सारा ॥ ८ ॥

१. वाल्मीकिरामायणामध्यें एकट्या रजकाचाच उल्लेख आहे. प्रस्तुत नाटकांत जनप्रवाद सार्वत्रिक असल्याचें वर्णन आहे (१·४०, ४·१०[८], ७·६). हा फेरफार करण्यामध्यें कवीचा हेतु रामाचें सीतेशीं वर्तन तेवढ्या अंशानें जास्त सकारण होतें असें दाखविण्याचा असावा.

२. नाटक आनंदपर्यवसायी होणार आहे हें येथें सुचाविलें. ही आशापूर्ण उक्ति एका तरुण नटाची आहे, जगाचे टक्केटोणपे खाऊन (१·५) शहाणा झालेल्या व भावी संकटाची सर्वांच्या आधीं वर्दी देणाऱ्या ( १·६[२] ) वृद्ध सूत्रधाराची नव्हे ह्या या दोन भूमिकांतील फरक वाचकांच्या लक्षांत येईलच.

३. मागें पृष्ठ ७२ टीप ३ पहा.

विदेहदेशाप्रत निघून गेला, यामुळें कष्टी झालेल्या[1]
देवी सीतेचें सांत्वन करण्याकरितां महाराजांची
स्वारी राजकृत्यें आटोपून खास मंदिराकडे चालली
आहे. ७

( उभयतां जातात. )

# प्रस्तावना[2]

( तदनंतर राम व सीता एकत्र बसलेले आहेत असा प्रवेश. )

४ **राम**—देवी, वैदेही, अंमळ धीर धर, धीर धर. वडील माणसें येथून आपखुषीनें कां गेलीं ? त्यांच्यानें मुळीं जाववलेंच नसतें. पण–

१. सीता आतां कमींतकमी २५ वर्षांची–अथवा विवाहानंतर १२ वर्षांनीं वनवासास आरंभ झाला असें मानल्यास जवळ जवळ ४० वर्षांची–झाली होती, तथापि तिचा अद्याप बापाकडे इतका ओढा होता. माहेरचा लळा असणें हें जरी स्वाभाविकच आहे, तरी हा प्रसंग मुद्दाम येथें आणण्यामध्यें सीतेचें मन किती प्रेमळ होतें तें दाखविण्याचाही कवीचा उद्देश असावा.

२. ही प्रस्तावना अगदीं साधी असून इनें पुष्कळ कार्य साधिलें आहे. भवभूतीच्या इतर नाटकांप्रमाणें या प्रस्तावनेंत शब्दांचें अवडंबर नाहीं व स्वतःविषयीं गर्वोक्तिही नाहीं. सूत्रधारानें एका वाक्यानेंच (१·२$^{२-४}$) संविधानकाचा आरंभकाळ अचुक सुचविला आहे. तसेंच जनापवादाचा उल्लेख (१·६) करून वसिष्ठ, वाल्मीकि, अरुंधती, पृथ्वी, भागीरथी, इत्यादिक ऋषिदेवतांच्या साहाय्यानें होणारें कार्य ध्वनित (१·६$^{३}$) केलें आहे. एवढेंच नव्हें तर वर (टीप १) सांगितल्याप्रमाणें सीतेच्या प्रेमळ मनाची साक्ष पटवून, ज्या कर्तव्यरूपी क्रूर व्रताचें पुढें रामानें अवलंबन केलें त्याचा अंधुक प्रतिध्वनिही सूत्रधाराच्या भाषणांत (१·५) आणिला आहे. शिवाय सीता गरोदर आहे (१·४$^{३}$), ऋष्यशृंगाचें सत्र १२ वर्षांचें आहे, (१·४$^{२}$) इत्यादि महत्त्वाच्या बाबी सुचविल्या आहेत त्या निराळ्याच. आणि हें सर्व नट व सूत्रधार यांच्या भाषणामध्यें अगदीं ओघाओघानें आणिलें आहे. त्यांत अस्वाभाविकपणा नाहीं. एका लहानशा प्रस्तावनेमध्यें इतके विषय इतक्या सफाईनें गोंवणें हें बुद्धिमत्तेचें लक्षण आहे.

अनुष्ठान ही नित्याची बाब असल्यामुळें ते
परतंत्र होते. घरंदाज अग्निहोत्र्यांना असे हे
दुःखदायक प्रसंग वारंवार येतातच.८*

**सीता**—आर्यपुत्रा, मलाही तें माहीत कां नाहीं ? पण बंधुजनांच्या वियोगानें दुःख हें होतेंच.

३ **राम**—असें तर खरेंच. हा संसाराचा व्यापच मुळीं हृदयास घरें पाडणारा आहे. आणि म्हणूनच जाणते लोक याच्या भीतीनें सर्वसंगपरित्याग करून अरण्यामध्यें विश्राम पावतात.

६ **कंचुकी** ( प्रवेश करून )—रामभद्रा, ( जीभ चावून, भीतीनें ) महाराज—

**राम** ( किंचित् स्मित करून )—आर्या, वडिलांच्या परिजनांनीं मला

९ 'रामभद्र' म्हणणें हेंच उचित आहे.[1] तर सरावाप्रमाणेंच मला संबोधावें.

**कंचुकी**—ऋष्यशृंगांच्या आश्रमाहून अष्टावक्र आला आहे.

१२ **सीता**—आर्या, मग विलंब कां[2] ?

**राम**—त्याला त्वरित आंत पाठवून द्या.

( कंचुकी जातो. )

१९ **अष्टावक्र** ( प्रवेश करून )—उभयतांचें कल्याण असो.

**राम**—भगवन्, मीं आपणांस वंदन करितों. येथें बसावें.

* कीं अनुष्ठाननित्यत्व स्वातंत्र्यालागि मोडितें ॥
संकटा आहिताग्नीची प्रत्यवायें गृहस्थता ॥ १४ ॥

समवृत्तांत व मूळाचें अक्षरशः भाषांतर कसें होईल याचें हें नमुनेदार उदाहरण आहे.

१. यावरून रामाचा सालस स्वभाव दिसून येतो इतकेंच नव्हे तर वृद्ध, राजरिवाज राखण्यांत दक्ष, व सेवेंत सर्वस्व गमाविलेल्या अशा कंचुकीचें चित्रही डोळ्यासमोर उभें राहतें. हा प्रसंग शेक्सपीयर कवीस शोभेसा आहे अशी वुइल्सनसाहेबांची येथें टीप आहे.

२. सीतेच्या मनाचा अधीरपणा येथें दिसून येतो. कंचुकीनें सीतेस वर्दी दिली नव्हती.

**सीता**—नमस्कार करित्यें. सर्व वडील माणसें खुशाल आहेत ना ? १८तशाच शांतावन्सेंही ?

**राम**—आमचे मेहुणे भगवान् ऋष्यशृंग यांचा सोमयाग निर्विघ्नपणें चालला आहे ना ? शांताताईही खुशाल ?

२१**सीता**—वन्संना आमची आठवण तरी होते कां ?

**अष्टावक्र** ( खालीं बसून[१] )—होते तर. देवी, भगवान् वसिष्ठांचा निरोप असा आहे कीं—

विश्वाचें पोषण करणारी जी भगवती पृथ्वी तिच्या
पोटीं तुझा जन्म. ब्रह्मदेवाची बरोबरी करणारा
राजा जनक हा तुझा पिता. तसेंच आम्हीं व
प्रत्यक्ष सूर्य हे ज्या घराण्याचे गुरु आहोंत अशा
घराण्यांतील राजांची तूं आवडती सून. ९

त्या तुला आणखी दुसरा काय आशीर्वाद द्यावा ? तूं वीरमाता हो.

**राम**—आम्हांवर हा अनुग्रह आहे.

एरवींच्या साधूंची वाणी वस्तुस्थितीच्या धोरणानें
चालत असते; परंतु श्रेष्ठ महर्षींच्या वाणीमागून
स्वतः वस्तुस्थितिच धांवत सुटते[२]! १०*

**अष्टावक्र**—भगवती अरुंधतींनीं आपल्या मातोश्रींनीं आणि शांताबाईंनीं फिरून फिरून असें सांगावयास सांगितलें आहे कीं सीतेला जर

* साधारणसाधूंचीं धांवे अर्थाकडे सदा वाचा ॥
परि ह्या आद्यऋषींच्या वाणिकडे अर्थ धांवतो साचा ॥ १६ ॥

१. आंत येतांच रामानें अष्टावक्रास शिष्टाचाराप्रमाणें प्रथम आसन दिलें. (१.८[१६]) पण लगेच अष्टावक्रावर लागोपाट प्रश्नांचा इतका भडीमार झाला कीं हा वेळपावेतों त्याला बसावयासही फावलें नाहीं. प्रथम सीतेचा दोन प्रश्नांचा मिळून झालेला एक प्रश्न, त्यावर रामाचा तसलाच एक दुहेरी प्रश्न, आणि फिरून सीतेचा स्त्रीस्वभावास शोभणारा (१.८[२१]) पांचवा प्रश्न. बिचाऱ्या अष्टावक्राची धांदल झाली असल्यास नवल नाहीं.

२. या श्लोकाशीं समानार्थक श्लोक ४.१८ हा आहे. तेथें या श्लोकाची प्रचीतिही येते.

३ एकादा डोहाळा झाला[1] तर तो अवश्य विलंब न करितां पुरवावा.

**राम**—ही जें सांगते तें करीत आहों.

**अष्टावक्र**—आपल्या नणंदेचा पति ऋष्यशृंग याचा असा निरोप
६ आहे कीं, ‘ मुली, चिरंजीविनी, तुझे दिवस भरत आले असल्यानें तुला इकडे आणिलें नाहीं. वत्स रामभद्रालाही तुझ्या मनाची करमणूक व्हावी म्हणून मागें ठेविलें आहे. आतां यानंतर तूं स्वपुत्र[2]
९ मांडीवर घेशील त्या वेळीं तुला आम्हीं भेटावयास येऊं.’

**राम** ( आनंदानें, किंचित् लाजून व हास्य करून )—तथास्तु. भगवान् वसिष्ठांचा मला कांहीं निरोप नाहीं काय ?

१२ **अष्टावक्र**—ऐकावें—

जामाता ऋष्यशृंग याच्या यज्ञामध्यें आम्हीं गुंतलों
आहों. तूं अजून लहान आहेस, व राज्याचीं सूत्रें
नुकतींच तुझ्या हातीं आलीं आहेत. करितां
प्रजाजनांचें रंजन करण्यांत दक्ष रहा. त्यापासून
जें यश लाधणारें आहे तेंच तुम्हां राजांचें परम
धन होय. ११

**राम**—होय, भगवान् मैत्रावरुणि[3] म्हणतात तें खरें आहे.
प्रीतीचा, दयेचा, सुखाचा,—फार काय सांगावें,
प्रत्यक्ष या जानकीचा—प्रजाजनास संतुष्ट ठेवण्या-

१. स्त्री जनांनीं डोहाळ्यासंबंधीं निरोप पाठवावा हें उचित आहे. या अंकाच्या शेवटीं या निरोपानें काय कृत्य साधिलें तें कळेलच ( १·३३[5], १·४३[2] १·५१[5] ).

२. महर्षींची सहजगत्या निघालेली ही वाणी पुढें सातव्या अंकाचे अखेरीस वर १·१० मध्यें सांगितल्याप्रमाणें अक्षरशः खरी झाली आहे. मूळ संस्कृतांत ‘मांडी पुत्रपूर्ण होईल’ असें आहे व पुत्रपूर्ण या समासामुळें पुत्रांची संख्या अनिश्चित ठेविली आहे. वर आलेला (१·९[1]) ‘वीरमाता’ शब्द व पुढें येणारा (१·१५[2]) ‘संतति’ शब्द असाच अनिश्चयबोधक आहे. तथापि ६·२८ पहा.

३. मित्र व वरुण या उभयतांचा पुत्र; वसिष्ठ.

साठीं त्याग करावा लागल्यास माझ्या मनाला
व्यथा होणार नाहीं. १२*

**सीता**—आणि म्हणूनच तर आर्यपुत्रांना रघुकुलाचे धुरंधर म्हणावयाचें.

**राम**—बाहेर कोण आहे ? अष्टावक्रांना विश्रांति घेऊं द्या.

३ **अष्टावक्र** ( उठून, चार पावलें चालून)—कोण ? हां, कुमार लक्ष्मण येत आहे. ( जातो. )

**लक्ष्मण** ( प्रवेश करून )—ज्येष्ठ भ्रात्याचा विजय असो. दादा,
६ आम्हीं सांगितल्याप्रमाणें त्या चित्रकारानें तुमच्या चरित्रांतील प्रसंगांचीं चित्रें या दालनामध्यें काढिलीं आहेत. वहिनींना पहावयाचीं असतील ?

९ **राम**—लक्ष्मणा, योग्य. देवीच्या उदास मनाची करमणूक कशी करावी हें तुला समजतें. हीं चित्रें कोठपर्यंत काढून झालीं आहेत ?

**लक्ष्मण**—वहिनींना अग्नीनें शुद्ध केलें येथपावेतों आलीं आहेत.

१२**राम**—नको, त्या प्रसंगाची आठवणही नको.

जन्मापासून जी परम पवित्र तिला आणखी पवित्र
करणारा दुसरा कोण ? महातीर्थें व अग्नि यांची
अन्य उपकरणांनीं शुद्धता करूं लागणें अनुचित
होय. १३

हे देवांच्या प्रत्यक्ष यज्ञभूमींतून उद्भवणारे देवी, सीते, क्षमा कर. आमरण हा माझा तुला प्रणाम असो.

लोकांचें रंजन करणें मोठें कठिण आहे; आणि
असें हें कठिण काम ज्यांचें सर्वस्व कुल व कीर्ति
अशांच्या माथीं आलें आहे. करितां, त्यावेळीं[1] जीं
दुरुत्तरें मीं तुला केलीं तीं सर्वस्वीं अनाठायीं होतीं.
सुगंधि पुष्पें मस्तकीं वहावींत हाच त्यांचा मान.

* जनरंजनाहुनि मला स्नेह दया सौख्य हें अधिक नाहीं ॥
किंबहुना जानकिही टाकलिया मज नसे व्यथा कांहीं ॥ १९ ॥

१. अग्निशुद्धीच्या प्रसंगीं.

त्यांना कोणी पायाखालीं कां तुडवावींत ! १४*

**सीता**—राहूंद्यात, आर्यपुत्रा, राहूंद्यात ते आतां विचार. चला. आपण तीं चित्रें पाहूं चला.

( उठून उभयतां चालूं लागतात. )

४ **लक्ष्मण**—हीं तीं चित्रें.

**सीता** ( न्याहाळून पाहून )—हे अंतरिक्षांत एकमेकांस चिकटून ६ उभे असलेले आणि आर्यपुत्रांची स्तुति करीत आहेतसे दिसतात ते कोण ?

**लक्ष्मण**—हीं तीं जृंभकास्त्रें[1] व तत्संबंधीं गुप्त मंत्र. भगवान् कृशा- ९ श्वमुनीपासून हीं विश्वाचा मित्र जो कुशिकसुत महर्षि विश्वामित्र त्यास प्राप्त झालीं; व त्यांनीं ताटकावधाच्या प्रसंगीं दादांना प्रसाद म्हणून समर्पिलीं.

१२ **राम**—देवी, ह्या दिव्य अस्त्रांप्रत वंदन कर.

ब्रह्मादिकांहीं वेदब्रह्माच्या अभिवृध्यर्थ सहस्त्रावधि
वर्षें तपाचरण केलें तेव्हां, जणूंकाय त्यांचीं उग्र
तपेंच मूर्तिमंत अशीं हीं दिव्यास्त्रें त्या परमपूज्य
आदिगुरूंपुढें प्रकट झालीं. १५

**सीता**—यांना माझें वंदन असो.

**राम**—आतां हीं निःसंशय तुझ्या संततीला[2] लाधतील.

३ **सीता**—मजवर हा मोठाच अनुग्रह.

* कष्टें जना कुलधनें अनुरंजवावें
जें मीं दुरुक्त वदलों तुज तें नसावें ॥
जें नित्य सुंदर सुगंधि शिरीं धरावें
तें पुष्प काय चतुरें चरणें चुरावें ॥ २१ ॥

१. या अस्त्रांचा प्रयोग ज्यांच्यावर करावा ते तत्क्षणीं निद्रावश होऊन निश्चेष्ट होतात. हीं अस्त्रें दिव्यदेहधारी व मानवी भाषेनें बोलणारीं ( ७·१० ) अशीं कवीनें कल्पिलीं आहेत.

२. पृष्ठ ७७ टीप २ पहा. सीतेच्या भावि संततीस हीं अस्त्रें येथें दिलीं या गोष्टीचें महत्व पुढें (५·१२[2],६·२७[3], व ७·९) दिसून येईल.

**लक्ष्मण**—हा मिथिलानगरींतील वृत्तांत.

**सीता**—अहाहा ! हें आर्यपुत्रांचें चित्र किती मोहक साधलें आहे !
६ सहज लीलेनें दुभंगून टाकिलेलें हें येथें शिवधनुष्य काढिलें आहे; तसेंच नुकत्याच उमलणाऱ्या निळ्याभोर कमलाप्रमाणें स्निग्ध, शामवर्ण, तुकतुकीत आणि तेजःपुंज अशी ही यांची सौम्य व सुंदर शरी-
९ राची ठेवण या ( कंप पावणाऱ्या ) झुलुपांनीं[1] फारच खुलून दिसत असून तिजकडे बाबा कौतुकानें व आश्चर्यानें टक लावून पहात आहेत असें दाखविलें आहे !

१२ **लक्ष्मण**—इकडे हें पाहिलें कां, वहिनी ?

वसिष्ठादिक व्याहीमंडळींचा तुमचे वडील, व तसेंच
जनककुलाचे पुरोहित गौतमपुत्र शतानंद, हे उभयतां
सत्कार करीत आहेत. १६

**राम**—खरेंच. पहाण्यास योग्य असाच हा प्रसंग आहे.

जनकाच्या व रघूंच्या कुलांचा हा शरीरसंबंध
कोणास बरें आवडणार नाहीं ? कुशिकनंदन
विश्वामित्र हे स्वतःच या प्रसंगीं दातेही झाले व
प्रतिग्रहीतेही झाले. १७

**सीता**—आणि हे तुम्ही चवघेजण भाऊ गोदानाचा मंगल विधि नुकताच आटोपून येथें विवाहदीक्षा घेत आहांत. अहाहा ! मला जणूं
३ काय मीं आतां मिथिलेंतच त्या वेळीं होत्यें तशी उभी आहें असा भास होतो.

**राम**—खरोखर मलाही वाटतें कीं तोच हा समय ज्या
वेळीं, रुचिर विवाहकंकणें धारण केल्यानें शोभ-

१. शिवधनुष्य भंगण्याच्या उत्साहानें, व धनुर्भंग केल्यानंतरही कांहीं वेळ, रामाच्या मस्तकावरील झुलुपें किंचित् कंप पावत होतीं हा भावार्थ. पूर्वी क्षत्रियकुमारांच्या मस्तकावर पांच झुलुपें ( संस्कृत, काकपक्ष ) राखित असत. ब्रह्मचर्यानंतर गृहस्थाश्रमांत जाण्याच्या वेळीं हीं झुलुपें काढीत असत. या विधीस गोदानविधि ( गो=केश ) म्हणतात. या विधीनंतर ब्राह्मणांस गोप्रदानही ( गो=गाय ) केलें जाई.

णारा आणि मूर्तिमंत महोत्सवच असा हा तुझा
गोंडस हात शतानंद पुरोहितांनीं माझ्या हातीं
दिला असतां माझ्या अंगावर आनंदाचे रोमांच
उभे राहिले.'[१]१८

**लक्ष्मण**—ह्या इथें, वहिनी, तुम्ही; ह्या मांडवीवहिनी; ही सूनबाई[२] श्रुतकीर्ति.

३ **सीता**—आणि, भाउजी, ही हो कोण ?

**लक्ष्मण** ( लाजून व किंचित् हंसून, एकीकडे )—अस्सं ! मीं ऊर्मिलेचें नांव घ्यावें म्हणून हा वहिनींचा प्रश्न ! असो. आपण दुसरीकडे
६ यांचें चित्त वळवूं. ( उघड ) वहिनी हें पाहिलें कां ? ही पहाण्याजोगी गोष्ट आहे. हे भगवान् भार्गव[३].

**सीता**—अगबाई ! मला कांपरें सुटलें !

९ **राम**—महर्षे, तुजप्रत वंदन असो.

**लक्ष्मण**—वहिनी, हें पहा, हें पहा, दादांनीं—

**राम** ( त्यास झिडकारून)—अरे, अजून कितीतरी पहावयाचें आहे.
१२ यापुढचीं चित्रें दाखीव.

**सीता** ( स्नेहानें व बहुमानानें रामास न्याहाळून )—खरोखर, आर्यपुत्रा, या अपार विनयानें तुम्हीं फारच शोभतां.

१५ **लक्ष्मण**—विवाहानंतर अयोध्येस आम्हीं आलों तो हा प्रसंग.

**राम**—हाय हाय ! तें सर्व मूर्तिमंत डोळ्यासमोर उभें राहतें !

१. वधूवरांचा प्रथम हस्तस्पर्श झाला असतां रोमांच येणें हें सात्विक प्रीतीचें लक्षण मानिलें आहे. हा श्लोक म्हणतांना राम सीतेचा हात आपल्या हातांत घेतो. हा श्लोक मंजुभाषिणी या अन्वर्थक वृत्तांत आहे.

२. भरत लक्ष्मणाचा वडील भाऊ व शत्रुघ्न धाकटा भाऊ. म्हणून लक्ष्मण मांडवीस वहिनी म्हणतो, व श्रुतकीर्तीस सूनबाई (सं०, वधू) म्हणतो.

३. परशुराम. हा शिवभक्त होता. रामानें शिवधनुष्य भंगिल्यामुळें परशुराम कोपाविष्ट होऊन मिथिलेस रामाचें पारिपत्य करण्यास गेला, व रामानें त्याचा पराभव केला ही गोष्ट प्रसिद्धच आहे. रामानें परशुरामास वंदन (१·१८[५]) करणें हें त्याच्या सौजन्यास योग्य आहे.

त्या वेळीं आमचे परमपूज्य वडील जिवंत होते;
आम्हां सर्वांचा विवाह नुकताच झाला होता; आणि
मातोश्री आमची सर्व प्रकारें काळजी वहात असत;
गेले ते आमचे दिवस—गेले ! १९

आणि ही जानकी सुद्धां त्या वेळीं—

नाजूक, विरल, (वाऱ्यानें भुरभुरूं लागले असतां)
ज्यांचीं अग्रें चकाकत असे ते तिचे मनोहर केश,
आणि ( उमलणाऱ्या ) कळ्यांसारखे दांत यांनीं
जिचें अल्लड मुख शोभिवंत दिसत असे; त्या या
जानकीच्या ललित, कोमल, चंद्रिकेप्रमाणें आल्हा-
दक, अकृत्रिम विलासांनीं मंडित, मुग्ध व गोजि-
रवाण्या गात्रांकडे पाहून आमच्या मातोश्रींना
मोठें कौतुक वाटे.[1] २०*

**लक्ष्मण**—ही मंथरा.[2]

**राम** ( मुकाट्यानें पुढें होऊन )—देवि वैदेहि,

शृंगवेरपुरांतील हाच तो इंगुदीवृक्ष. येथेंच मागें
आम्हांवर उपकार करणारा निषादपति गूहक याची
व आमची भेट झाली. २१

* काय वर्णूं लावण्य जानकीचे
कुटिल कुंतल शोभती मस्तकींचे ॥
कळ्या कुंदाच्या तसे दंत तीचे
मुग्ध हंसणें पाहणें बाळपणचें ॥ २८ ॥
लाजवी जी स्वप्रभे चंद्रिकेतें
दाखवी जी तें सहज विभ्रमातें ॥
अशा पाहोनी मधुर अवयवांतें
मनीं माता मानिती कौतुकातें ॥ २९ ॥

१. हा श्लोक प्रसंगास उचित अशा हरिणीवृत्तांत आहे. या व याच्या पूर्वीच्या श्लोकावरून, तसेंच ६·३४,३५ यांवरून स्वयंवरानंतर भवभूतीच्या मतें राम अयोध्येस बरेच दिवस ( १२ वर्षें ) होते असें दिसतें.

२. या दाईच्या फितवणीमुळेंच कैकेयी रामाच्या वनवासास कारण झाली.

**लक्ष्मण** ( हंसून, स्वगत )—हं. एकूण दादांनीं कैकेयीमातेचें चरित्र वगळिलें !

३ **सीता**—अगबाई ! तुम्हीं जटा धारण केल्या तो हा प्रसंग !

**लक्ष्मण**—राज्यलक्ष्मी पुत्राकडे सोंपवून इक्ष्वाकुवंशांतील
राजे वृद्धपणीं जें व्रत धारण करीत तें पुण्यकारक
वानप्रस्थव्रत बालपणींच दादांनीं धारण केलें. २२

**सीता**—निर्मल जलानें पावन करणारी ही भगवती भागीरथी.[1]

**राम**—हे रघुकुलदेवते भागीरथी, तुजप्रत वंदन असो.

राजा सगराच्या अश्वमेधसमयीं, चोरीस गेलेल्या
अश्वाच्या शोधास्तव पृथ्वी विदारित असतां कपि-
लमहर्षींच्या कोपाग्नीनें दग्ध झालेले जे [साठ हजार
सगरपुत्र, म्हणजे भगीरथाचे] पितृपितामह त्यांनां
भगीरथानें स्वतःच्या शरीराची पर्वाही न करितां
अघोर तप करून सरतेशेवटीं, हे भगवति, तुझ्या
उदकाचा स्पर्श करविला व सद्गति दिली.[2] २३

ती तूं, माते भागीरथी, ह्या तुझ्या सुनेच्या—ह्या सीतेच्या—कल्या-णार्थ सतत, भगवती अरुंधतीप्रमाणेंच, काळजी वहा.

३ **लक्ष्मण**—ऋषी भरद्वाजांनीं दाखविलेला चित्रकूटपर्वताकडे जाणारा हा मार्ग, आणि हा येथें कालिंदीतीरीं श्याम नांवाचा महान् वटवृक्ष.

१. भागीरथीकडे सीतेचें लक्ष अगोदर गेलें ही गोष्ट पुढें (१·३३[5]) तिला झाले-ल्या डोहाळयाच्या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तशींच सीतेचीं पुढील दोन भाषणेंहि विचारांत घ्यावींत.

२. सगराचा अश्वमेध, व भगीरथामुळें झालेलें भागीरथीचें मृत्युलोकीं अवतरण, या कथा वाल्मीकिरामायण बालकांड, सर्ग ३८·४४ येथें पहाव्यात. या श्लोकानें राम भागीरथीस वंदन करून तिचा सीतेवर अनुग्रह असो अशी प्रार्थना करीत आहे. पुढें (७·१८[6]) या प्रार्थनेचें कार्य स्पष्ट होईल. हा श्लोक शोकपूर्ण हरिणीवृत्तांत आहे. जणूं काय अगोदरपासूनच भावी संकटाची छाप रामाच्या मनावर त्याला न कळत बसली असें कवीनें दाखविलें आहे. एरवीं नुसत्या वंदनास हरिणीवृत्त नको होतें.

**सीता**—या प्रदेशाची आर्यपुत्रांना आठवण आहे का ?

६ **राम**—हो तर ! ती आठवण कशी जाईल ?

श्रमामुळें जड झालेलीं, प्रवासाच्या दगदगीनें विकल झालेलीं व ज्यांचें संवाहनकर्म परस्परांच्या गाढ आलिंगनांनींच केलें आहे,¹ अशीं तीं तुझीं कोमल, मनोहर, व ठेंचलेल्या कमलाच्या देंठाप्रमाणें दुर्बल गात्रें माझ्या वक्ष:स्थलावर ठेऊन यात्र स्थलीं तूं झोंपीं गेलीस ! २४*

**लक्ष्मण**—हा तो विराध राक्षस आम्हीं विंध्यारण्यांत प्रवेश करीत असतां आम्हांस आडवीत आहे.

३ **सीता**—हें पुरें झालें एवढेंच. आतां आर्यपुत्रांनीं मजवर स्वहस्तानें ताडपत्र धरून उन्हाचें निवारण केलें, व अशा थाटानें आम्हीं दक्षिणारण्यांत प्रवेश केला, तें चित्र मला पाहूं द्या.

**राम**—तींच हीं तपोवनें ज्यांमधील डोंगराळ प्रदेशांतून वाहणाऱ्या या नद्या, व त्यांच्याकांठचे मुनिजनांस आसरा देणारे हे वृक्ष. या तपोवनांतून अतिथिसत्कार करण्यांत तत्पर व केवळ मूठभरच नीवार शिजविणारे असे शमसंपन्न लोक घरें करून असतात. २५

**लक्ष्मण**—ज्याच्या पायथ्यांशीं असलेलीं हीं अरण्यें स्निग्ध व नीळसर असून वृक्षांच्या दाट समूहामुळें गडद दिसत आहेत, व ज्यांतील

३ गुहा, वृक्षांनीं गोदावरीच्या प्रवाहास निरोध केल्यामुळें, प्रतिनिनादित

* अलसलुलित मार्गीं चालतां श्रांत झालीं
दृढतर परिरंभा देउनी सांवरीलीं ॥
मृदुलकमलतंतूतुल्य होतां त्वदंगें
पडुनि हृदयिं माझ्या घेतली झोंप संगें ॥३६॥

१. आंग रगडून जो शिण घालवावयाचा तो आलिंगनांनींच घालविला असा भावार्थ.

होत आहेत, तसेंच शिखरांवर सतत अभिषेक करणाऱ्या मेघांमुळें ज्याचा मूळचा नीलवर्ण अधिकच खुलून दिसत आहे, असा तोच हा
६ जनस्थानांतील प्रस्रवण पर्वत.

**राम**—त्या पर्वतावर, लक्ष्मणानें आमची सर्व प्रकारें बरदास्त ठेविल्यामुळें, निःशंकपणें जे आम्हीं दिवस घालविले[1] त्यांची, हे सुंदरि, तुला आठवण आहे कां? तसेंच गोदावरीकांठचा तो सरस वनप्रदेश व त्याच्या लगतच घडून येणारी आमची ती दिनचर्या याची तुला आठवण होते कां ? २६*

त्याचप्रमाणें, ज्यांमध्यें पूर्वापर संबंध मुळींच नसे अशा त्या आमच्या बहारदार गुजगोष्टी एकमेकांसन्निध, अगदीं गालास गाल लावून, आम्हीं हळूं हळूं सांगत असतांना—गाढ आलिंगनामुळें उभ-

* आठवतें तुज काय सीते ॥ ध्रुवपद ॥
ह्याच गिरीवरी आपण होतों । पहात निर्झर
शोभा सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥ १ ॥
अपुलें मानस स्वस्थ कराया । लक्ष्मण फार
झटे गे सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥२॥
दिवस सुखानें नेले येथें । संगतिनें अनु-
जाच्या सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥३॥
ह्या श्रीगोदावरिचें केलें स्नानें पानें
सेवन सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥ ४ ॥
गोदावरिच्या तीरीं आपण । केले फार
विहार सीते ॥ आठवतें तुज काय सीते ॥५॥

१. यावरून तसेंच २·२२,२५,२८ इत्यादि श्लोकांवरून व पंचवटींतील 'चिरनिवासाच्या' वारंवार येणाऱ्या उल्लेखांवरून भवभूतीच्या मतें वनवासांतील बरींच वर्षें रामानें पंचवटींत काढिलीं असावींत. पद्मपुराण ६·२६९,२२६ मध्यें असेंच वर्णन आहे. याविरुद्ध वाल्मीकिरामायण, अरण्यकांड, सर्ग ११ श्लोक २७ पहा.

यतांचा एकेक हात गुंतून गेला असतांना[1]–घटका,
प्रहर कसे एकामागून एक गेले याचें भान मुळींच
न राहून, रात्रच्या रात्र अशी[2] निघून जाई! २७*

**लक्ष्मण**—ही शूर्पणखा पंचवटींत आली.

**सीता**–हा आर्यपुत्रा ! येथपावेतोंच तर तुमचें दर्शन. यापुढें नाहीं[3] !

३ **राम**—अगे भित्रे, झाल्या गेल्या विरहाचें हें चित्र आहे; त्याला कां कोण भितें ?

**सीता**—तें कसेंही असो. दुर्जनापासून दुःख हें आपलें होतेंच.

* एक दिवशीं आपुण एक शयनीं
एकमेकांसी करीं आलिंगोनी ॥
कांहीं कांहीं बोलतां मंदवचनीं
आंगिं उठले रोमांच थरारोनी ॥ ३८ ॥
एकमेकांशीं लावुनिया आंगा
गाल गालाशीं भूज भुजासंगा ॥
काढितांही गोष्टिच्या प्रसंगा
मनीं नाहीं आणिलें क्रम भंगा ॥ ३९ ॥
असें होतां आनंद उभयतांतें
रात्र सरली बोलतां बोलतां ते ॥
नाहिं झालें ठावकें आपणांतें
काय आठवतें सांग सखे तूतें ॥ ४० ॥

१. दुसरा हात अन्य कार्यास मोकळा होता असा ध्वनि विशेष अर्थपोषक आहे असें नाहीं.

२. मूळ पाठ 'रात्रिरेवं व्यरंसीत्.' हा नेपाळामधील एका इ. स. ११९६ च्या सुमारास लिहिलेल्या हस्तलिखित प्रतींत आढळला. आख्यायिका अशी आहे कीं कालिदासानें या ठिकाणीं 'रात्रिरेव व्यरंसीत' असा बिंदुरहित पाठ करण्यास भवभूतीस सुचाविलें. या पाठाचा अर्थ रात्रच निघून गेली व गोष्टी मात्र शिल्लक राहिल्या असा आहे. हा अर्थ सरस आहे खरा, पण मूळ पाठच कायम ठेवणें रास्त आहे. आख्यायिका कल्पित मानिली तरी त्यानें सुद्धां हेंच निष्पन्न होतें.

३. भावी संकट डोळ्यांपेक्षां मनास अगोदर समजतें असें म्हणतात त्याचें हें उदाहरण. पुढें (१·३०[2]) पहा.

६ **राम**—खरोखर. जनस्थानांतील ह्या हकिगती हल्लीं जणूं काय[1] घडून येत आहेत असें वाटतें.

**लक्ष्मण**—यानंतर त्या नीच राक्षसांनीं सुवर्णमृगाचें मिष करून असें कांहीं कृत्य घडवून आणिलें कीं त्यामुळें अद्यापि—त्या कृत्याचें [शत्रूंच्या रक्तानें] क्षालन केलें तरी सुद्धां—व्यथा होते. त्या ओसाड[2] जनस्थानामध्यें विव्हल होऊन दादांनीं ज्या कांहीं करुणपूर्ण गोष्टी केल्या त्यामुळें प्रत्यक्ष पाषाणही रोदन करितात व वज्रांचेंही हृदय उकलतें ! २८

**सीता** (डोळ्यांत आंसवें आणून, स्वगत)—हाय, हाय ! रघुकुलनंदना ! मजकारणें तुझी अशी ही कष्टमय दशा व्हावीना !

३ **लक्ष्मण** ( रामास न्याहाळून, व कांहीं कल्पना मनांत आणून[3] )—दादा, हें काय ?

हा तुमच्या बाष्पांचा ओघ मुक्ताहाराच्या एकाद्या तुटलेल्या सराप्रमाणें [ गालांवरून ] ओघळत जाऊन धारारूपांनीं विशीर्ण होऊन धरणीवर पडत आहे; तसेंच [ भात्याप्रमाणें ] हृदयास फुगवून धरणारा हा हुंदका, दाबून धरिला तरीही,

१. याच्या पूर्वींच्याच भाषणांत रामानें सीतेला धीर दिला होता, व आतां स्वतः धीर सोडीत आहे ! तरी अद्यापि ' जणूं काय ' हा शब्द वापरित आहे. पुढें श्लोक ३० मध्यें तो शब्दही नाहींसा झाला. प्रस्तुतचें व या पूर्वींचें रामाचें भाषण याच्या दरम्यान शूर्पणखेचा कर्णनासिकाच्छेद, खरादिकांशीं रामाचें युद्ध, इत्यादि प्रसंगांचीं चित्रें पाहण्यांत आलीं असावींत. व रामाच्या चित्तवृत्तीची जी पालट झाली आहे तिला हा अवधि जरूर तितका आहे. प्रस्तुतचे हे दोन प्रसंग, व तसेंच यापूर्वीं अहिल्योद्धाराचा प्रसंग, यांचीं चित्रें कवीनें अर्थात् मुद्दाम गाळलीं आहेत. कारण उघडच आहे.

२. 'सीताविरहित' हा भावार्थ.

३. संस्कृत, 'साकूतम्'=साभिप्रायम् ।

स्फुरण पावणाऱ्या या ओठांमुळें व नाकपुड्यां-
मुळें लोकांस अटकळीनें समजून येत आहे. २९

**राम**—लक्ष्मणा,

त्या वेळीं प्रिय जानकीच्या वियोगामुळें उद्भव-
लेला तो दुःखाग्नि, तीव्र तर खराच, पण सूड
घेण्याच्या इच्छेमुळें कसा तरी सहन केला; तोच
मनांतील दुःखाग्नि आतां पेट घेत आहे व हृदयांत
मर्मव्रणाप्रमाणें वेदना करीत आहे.[1] ३०

**सीता**—हाय, हाय! माझेंही दुःख असेंच परमावधीस गेल्यामुळें आर्यपुत्रांचा मला वियोग झाला असाच भास होत आहे!

३ **लक्ष्मण** (स्वगत)—असो, तर मग यांचें चित्त अन्यत्र वेधूं या. (चित्र पाहून, उघड) मन्वंतराहून[2] पुरातन असा हा गृध्रराज तात जटायु; व त्याच्या चारित्र्याचें व पराक्रमाचें हें उदाहरण.

६ **सीता**—हा तात जटायो! मजवरील तुझ्या अपत्यप्रेमाची ही सीमा झाली!

**राम**—हे कश्यपवंशोद्भव पक्षिराजा, तात जटायो, तुजसारखा स-
९ त्तीर्थ व महासाधु जगास फिरून कोठचा लाधणार?

**लक्ष्मण**—जनस्थानाच्या पश्चिमेस असणारा चित्रकुंज या नांवानें प्रसिद्ध असा हा दंडकारण्याचा भाग. मस्तकरहित दनुदैत्य येथेंच
१२ होता. ऋष्यमूक पर्वतावरील मतंगमुनीचें आश्रमपद तें हें. ही येथें श्रमणा नामक सिद्ध शबरी. हें तें पंपा नांवाचें कमलांनीं व्यापिलेलें सरोवर.

१. हा व पुढील श्लोक (१·३१) प्रहर्षिणी वृत्तांत आहे. आनंद अथवा दुःख उत्कट झालें असतां या वृत्ताची योजना करितात. यामध्यें पहिल्या तीन अक्षरांनंतर एक जोरदार खटका आहे व तेथें हुंदक्यामुळें वगैरे वाक्स्तंभ झाला असतां जसा परिणाम व्हावयाचा तसा होतो. पुढें १·४० या श्लोकांत हा प्रकार विशेषच चांगला साधला आहे.

२. एक मन्वंतर=३०६,७२०,००० मानवीं वर्षें. रावणानें सीता हरण केली त्याप्रसंगीं जटायूनें दाखविलेला पराक्रम प्रसिद्धच आहे.

१९ **सीता**—ह्याच ठिकाणीं नव्हे आर्यपुत्रांनीं सर्व धैर्य, शौर्य विसरून मोकळ्या कंठानें रोदन केलें तें ?

**राम**—देवि सीते, मला हें सरोवर फार रम्य वाटतें.

या सरोवरांत [ नीलवर्ण चोंच असलेले ते ]
मदयुक्त मल्लिकाक्ष नामक पक्षी आपल्या पंखांनीं
जेव्हां शुभ्र कमलिनींचें विशाल देंठ हलवीत तेव्हां,
डोळ्यांत आंसवें येण्याच्या व तीं डोळ्यांतून
बाहेर पडण्याच्या मधील अल्प अवधींत, हा
सर्वच प्रदेश निळ्या कमलांनीं व्यापिला आहे
असें मला दिसलें.[१] ३१

**लक्ष्मण**—हा प्रतापशाली हनूमान्.

**सीता**—तोच हा महाभाग मारुति ज्यानें चिरकाल दुःखमग्न झाले-
३ ल्या या जीवलोकाचा[२] उद्धार करून त्याजवर महदुपकार केले.

**राम**—जननी अंजनेच्या आनंदास भरतें आणणारा तोच हा
महाबाहु मारुति, ज्याच्या प्रभावानें आम्हीं व हीं
[ चतुर्दश ] भुवनेंही धन्य झालीं आहेत. त्याचा
सदैव आनंद असो ! ३२*

**सीता**—भाउजी, काय बरें नांव या पर्वताचें, ज्यावरील प्रफुल्लित कदंबवृक्षांवर मयूर नृत्य करीत आहेत असें दाखविलें आहे व जेथें,
३ या वृक्षाखालीं, ज्यांची शरीरलक्ष्मी मलिन झाली असून अनुभाव-रूप माहात्म्यामध्येंच अवशिष्ट राहिली आहे, अशा या माझ्या आर्यपुत्रांनां मूर्छा आली असतां तुम्हीं त्यांना शोकाकुल होऊन सांव-
६ रून धरिलें आहे ?

* तो हा सुत अंजनिचा प्रतापशाली असा नसे अन्य ॥
ज्याच्या भुजवीर्यबळें आम्हांसह जाहलीं जगें धन्य ॥ ४७ ॥

१. आंसवांमुळें दृष्टि अंधुक झाली होती, व त्यामुळें पक्ष्यांच्या चोंचींचा नीलवर्ण कमलांचाच आहे असें समजून, शुभ्र कमलें नील आहेत असा भास झाला.

२. आर्यपुत्रांचें वृत्त मला कळवून माझा, व माझें वृत्त आर्यपुत्रांस कळवून त्यांचा, असें न म्हणतां 'जीवलोकाचा' असें सर्वसाधारण विधान केलें.

**लक्ष्मण**—ताच हा ककुभ[1] कुसुमांनीं सुगंधित माल्यवान् नांवाचा पर्वत ज्याचे शिखरावर हा स्निग्ध व नीलवर्ण मेघ नुकताच येऊन ठेपला आहे.[2]

**राम**—पुरे, वत्सा लक्ष्मणा, पुरे कर; आतां यापुढें माझ्यानें सहन करवत नाहीं. जानकीचा वियोग जणूं काय फिरून एकवार परत आला[3] असें मला वाटत आहे ! ३३

**लक्ष्मण**—आतां यानंतर, आपलीं व त्या महात्म्या वानरांचीं व राक्षसांचीं एकाहून एक अधिक आश्चर्यकारक अशीं असंख्यात कृत्यें ३ दाखवावयाचीं आहेत. वहिनी तर इतक्यानेंच शिणल्या आहेत. म्हणून विनंति करितों कीं आतां विश्रांति घ्यावी.

**सीता**—आर्यपुत्रा, हीं चित्रें पाहून मला एक डोहाळा झाला आहे; ६ म्हणून विनवित्यें कीं–

**राम**—नाहीं. 'आज्ञा करित्यें' असें म्हण.

**सीता**—माझ्या मनांत असें येतें कीं फिरून एकवार त्या प्रसन्न व ९ व गंभीर वनराजींत विहार करावा, व भगवती भागीरथीच्या पवित्र सौम्य, व शीतल अशा उदकांत स्नान करावें.[4]

**राम**—वत्सा लक्ष्मणा.

१२ **लक्ष्मण**—हा मीं येथें आहें. काय आज्ञा ?

**राम**—इचे डोहाळे विलंब न करितां पुरवावेत, असा नुकताच गुरुजनांनीं निरोप पाठविला आहे.[5] तर, ज्यांतून प्रवास सुखकर

१. 'ककुभ'—वृक्षविशेष.

२. विरहिजनांना दुःख देणाऱ्या वर्षाकाळाचा नुकताच आरंभ झाला होता हें सुचाविलें.

३. प्रस्तावनेमध्यें लोकापवादाची बातमी प्रेक्षकांस कळून चुकली असल्यानें रामाचें हें वाक्य म्हणजे भावि संकटाची छाया असा त्यांचा ग्रह सहजच होईल.

४. मागें पृष्ठ ८३ टीप १ पहा.

५. मागें १·१०[3] पहा.

१९होईल व मार्गांतील खांचखळग्यांपासून त्रास होणार नाहीं असा एक रथ सज्ज कर.

**सीता**—आर्यपुत्रा, तुम्हींही बरोबर येणार ना पण ?

१८**राम**—तुझें मन खरेंच कठोर.[1] हें निराळें सांगावयास लागतें वाटतें ?

**सीता**—तर मग माझ्या आनंदास पारावार नाहीं.

**लक्ष्मण**—आज्ञेप्रमाणें व्यवस्था ठेवितों. ( निघून जातो. )

२१**राम**—प्रिये, चल. क्षणभर आपण या खिडकीजवळ निवाऱ्याच्या जागीं बसून विश्रांति घेऊं या.

**सीता**—बरें तर. या श्रमामुळें मला झोपेनें अगदीं घेरिलें आहे.

२४**राम**—असें असेल तर मला घट्ट मिठी घाल, म्हणजे मीं तुला तेथें • [ हळूं हळूं ] नेतों.

> किंचित् भीतीनें[2] व श्रमानें आलेल्या घामामुळें
> आर्द्र, व अतएव चंद्रकिरणांच्या चुंबनानें पाझर-
> णाऱ्या चंद्रकांतमण्याच्या हाराप्रमाणें शोभणारा,
> असा हा तुझा बाहु माझ्या गळयांत घाल, व
> माझें जीवित मला परत मिळूंद्या. ३४

( सीतेचा बाहु आपल्या गळयांत घालून, आनंदानें ) प्रिये, हें काय म्हणून मीं समजूं ?

> हें सुख, कीं दुःख; मोह, कीं निद्रा; हा विषाचा
> प्रभाव किंवा मदाचा; कांहींच निश्चय करवत
> नाहीं. तुझ्या अंगाचा माझ्या गात्रांस स्पर्श होतां-
> क्षणींच तीं सर्वथा विकल होतात, व अशी एक
> मनोवृत्ति उचंबळते कीं तिजमुळें हें जीवित क्षणैक

१. मीं तुजबरोबर वनाविहारास येणार नाहीं अशी ज्या अर्थीं तुझी कल्पना धांवली त्या अर्थीं तुझें मन कठोर; मला ती कल्पनाही करतां आली नाहीं व म्हणून मीं लक्ष्मणास निराळें सांगितलेंहि नाहीं. हा भावार्थ.

२. चित्रांतील कांहीं प्रसंगांमुळें उत्पन्न झालेली भीति.

भ्रमण पावतें व लगेंच लुप्त होतें. ३५*

**सीता** ( हंसून )—आपल्या अढळ प्रीतीचा हा प्रसाद. मग यांत नवल तें काय ?

**राम**—तींच हीं या म्लान झालेल्या जीवितकुसुमांचें
विकासन करणारीं, सर्व इंद्रियांस मोहित करून
तृप्त करणारीं—तींच हीं माझ्या कमलनयनेचीं
मधुर वचनें, जीं कर्णांस अमृताप्रमाणें व चित्तास
रसायनाप्रमाणें आल्हाद देतात. ३६ †

**सीता**—हे प्रिय भाषण करणाऱ्या प्रिया, या. क्षणभर विश्रांति घेऊं.

( शयनार्थ कांहीं साधनें जवळ आहेत काय तें पहाते. )

३ **राम**—प्रिये, शोधतेस काय ?

विवाहापासून आजतागायत, गृहीं अथवा वनीं,
शिशुपणीं अथवा यौवनीं, ज्यावर मस्तक ठेवून
तूं निजत असस व ज्यावर अन्य स्त्रीचा हक्क नाहीं,
असा हा या रामाचा बाहु, तुझ्या उशाचा आधार,
सेवेस तत्पर आहे. ३७ §

* कळेना हें मातें सकळ सुख कीं दुःखचि असे
असे निद्रा किंवा मद, विष चढे, मोहचि वसे ॥
तुझ्या स्पर्शीं स्पर्शीं विकल करितो इंद्रियगणा
विकार प्राणातें भ्रमहि आणि देई स्थिरपणा ॥ ५० ॥

† म्लानास जीवकुसुमास फुलीवणारीं
सर्वेंद्रियांस सुखवून हि मोहणारीं ॥
ऐसीं तुझीं सुवचनें कमलायताक्षी
कर्णांस गोड गमती मन यास साक्षी ॥ ५१ ॥

§ लग्नापासुनि वर्तमानसमयापर्यंत गेहीं वनीं
रात्रीं वा दिवसासही शिशुपणीं तैसा पुन्हा यौवनीं ॥
निद्रेला तव रामबाहुच उशी हा सर्वदा जाहला
जाग्रत्स्वप्नसुषुप्ति यांत न दुजा स्पर्श प्रिये याजला ॥ ५२॥

**सीता**—( झोपीं जातां जातां )—आहे खराच, आर्यपुत्रा, आहे. ( निजते. )

३ **राम**—काय ! माझ्या वक्ष:स्थलावर मस्तक ठेवून ते मधुर शब्द बोलत असतांनाच इला इतक्यांत झोंप लागली ! ( तिला न्याहाळून, प्रेमानें )—

ही गृहाची जणूं लक्ष्मीच, माझ्या नेत्रांना जशी
काय अमृताची शलाका, हा इचा स्पर्श म्हणजे
केवळ अंगास दाट चंदनाची उटी, गळ्यांत घात-
लेला हा इचा हात जणूं स्निग्ध व शीतल मौक्ति-
कांचा दुसरा हारच; इचें काय म्हणून प्रिय नाहीं?
एकच अपवाद. तो दु:सह वियोग ! ३८*

**प्रतीहारी** ( प्रवेश करून )—सन्निध आला आहे, महाराज !

**राम**—काय[1] ! कोण ?

३ **प्रतीहारी**—महाराजांच्या खासगी तैनातीस असलेला दुर्मुख.

**राम** ( स्वगत )—अंत:पुरपरिचारक[2] दुर्मुख. त्याला मीं लोकवार्ता जाणण्यासाठीं हेर म्हणून पाठविलें होतें. (उघड) येऊंद्या त्याला.

( प्रतीहारी निघून जाते. )

* गृहाची ही शोभा तसि अमृतवर्तीच नयना
असे ही श्रीखंडापरिस सुखदस्पर्श ललना ॥
हिचा कंठीं बाहू मृदु शिशिर मुक्तासुसर हा
हिचें सारें आहे प्रिय परि न साहोंचि विरहा ॥ ५३ ॥

१. प्रतीहारीच्या शब्दांनीं राम एकदम दचकतो. कारण तिनें म्हटलेले ‘ सन्निध आला आहे’ हे शब्द आपण नुकत्याच उच्चारिलेल्या ‘तो दु:सह वियोग’ या शब्दांशीं जोडून सीतेचा विरह सन्निध आला आहे अशी तो आपली कल्पना करून घेतो.

२. दुर्मुख अंत:पुरपरिचारक असल्यामुळें राम व सीता एकांतांत असले तरी प्रतीहारीप्रमाणें त्यालाही तेथें प्रवेश करितां येई असें या विशेषणावरून सुचविलें.

७ **दुर्मुख** ( प्रवेश करून, स्वगत )—हाय रे दैवा ! राज्ञी सीतेसंबंधानें, ज्याची कल्पना सुद्धां करवणार नाहीं असा हा लोकापवाद, मीं महा-
९ राजांचे कानीं कसा घालूं ? अथवा मजसारख्या कपाळकरंट्याचें हें नशीबच असें !

**सीता** ( झोंपेंतच बोलते )—हा आर्यपुत्रा, प्रियकरा ! आपण कोठें
१२ आहां ?

**राम**—काय ? चित्रदर्शनापासून उद्भवलेल्या त्या उद्वेगजनक विरहाच्या कल्पनेनें प्रिया स्वप्नांत भीत तर नाहीं ? ( प्रेमानें तिला
१९ थोपटून )—

> सुखामध्यें अथवा दुःखामध्यें ज्याला ढळ नाहीं,
> हरएक प्रसंगीं जो निर्वाणींचा साथीदार, जो हृद-
> याचें विश्रामस्थान, ज्याची बहार वार्धक्यामुळें
> अणुमात्रही कमी होत नाहीं, क्रमाक्रमानें लज्जेचा
> पडदा दूर झाला म्हणजे ज्याचा परिपाक स्नेहसर्व-
> स्वामध्यें होतो,[1] असा तो ( दांपत्यप्रेमरूपी )
> परब्रह्मानंद, अनेक घाव सोसावेत तेव्हांच, भाग्य-
> वंतांनाच केवळ, लाधतो[2] ! ३९

**दुर्मुख** ( पुढें होऊन )—महाराजांचा विजय असो !
**राम**—काय बातमी असेल ती सांग.

१. आरंभींची लज्जा नाहींशी झाली म्हणजे स्त्रीपुरुषांमध्यें खऱ्या प्रीतीचा विकास होतो हा भावार्थ.

२. रामाच्या आनंदाचा येथें अगदीं कळस झाला. एका क्षणार्धांत आपणावर केवढें संकट ओढवणार आहे याची त्याला कल्पनाही नाहीं. पर्वताच्या कड्यावर बेगुमान खेळणाऱ्या अर्भकाप्रमाणें, संकट आ पसरून सज्ज असलें तरीही, मनुष्यास सध्यांच्या आनंदापलीकडे कांहींही दिसत नसतें हें दाखविण्याचा येथें कवीचा उद्देश आहे. मालतीमाधव नाटकाच्या आठव्या अंकाच्या शेवटीं असाच प्रसंग कवीनें आणिला आहे. शेक्सपीयरच्या हॅमलेट नाटकांतील ऑफिलियाच्या (मल्लिकेच्या) मृत्यूचें वर्णन वाचकांस अवगतच आहे.

३ **दुर्मुख**—सर्व प्रजाजन महाराजांस दुवा देत आहेत. राममहाराजांनीं दशरथमहाराजांचा आम्हांस विसर पाडला असें सर्वांच्या तोंडीं आहे.
**राम**—ही केवळ स्तुति झाली. एखादा दोष असल्यास सांग, म्हणजे
६ त्यावर उपाय योजितां येईल.
**दुर्मुख** ( आंसवें आणून )—ऐकावें महाराज. ( कानांमध्यें कांहीं मजकूर सांगतो. )
९ **राम**—हाय, हाय ! हे शब्द नव्हत; हा प्रखर वेगवान् वज्रपातच. ( मूर्छा पावतो. )
**दुर्मुख**—महाराजांनीं सावध व्हावें.
१२**राम** ( सावध होऊन )—

हाय ! धिक्कार असो ! ही विदेहराजकन्या पर-
गृहीं ( बंदीवासांत ) राहिल्यामुळें जो कलंक
लागला होता, व ज्याचें निरसन अद्भुत उपायांनीं
आम्हीं करविलें होतें, तोच तो कलंक पुन्हां, दैव-
दुर्विपाकामुळें, एखाद्या श्वानाच्या विषाप्रमाणें,
चोंहींकडे पसरत आहे. हाय[1] ! ४०

आतां म्यां मंदभाग्यानें येथें काय करावें ? ( विचार करून, करुण-स्वरानें ) अथवा, दुसरें काय ?

कांहींही होवो, लोकांचें आराधन करणें हेंच सज्ज-
नांचें व्रत. व हेंच व्रत, माझा व स्वतःच्या प्राणाचा
त्याग करावा लागला तरी, वडिलांनीं पाळण्यास
मागें पुढें पाहिलें नाहीं ! ४१*

भगवान् वसिष्ठांनीं (याच अर्थाचा) नुकताच निरोप पाठविला आहे.[2] शिवाय—

* जनरंजना कसें तरि साधावें हेंचि योग्य संतातें ॥
प्राणातें मातें ही सोडुनि जें साधिलेंचि मत्तातें ॥ ६२॥

१. पृष्ठ ७३, टीप १ पहा.
२. मागें १·११ पहा.

> सूर्यवंशांतील लोकश्रेष्ठ भूपतींनीं जें शुद्ध व स्पृहणीय चरित्र आजपावेतों उज्ज्वल राखिलें, त्या चरित्रावर या अभाग्यामुळें लोकप्रवादाचा काळाकुट्ट डाग यावा ना? हाय! धिक्कार, धिक्कार असो मला! ४२

हाय, देवि सीते! प्रत्यक्ष देवांच्या यज्ञभूमींतून तुझा जन्म, व वसुंधरेचीही कूस तेथें जन्म घेण्याचा अनुग्रह करून तूं पवित्र केलीस;
३ निमि[१] आणि जनक यांच्या वंशास तूं आनंदविणारी, व साक्षात् अग्नि, वसिष्ठ, अरुंधती यांनींही प्रशंसा केलेलें असें तुझें शील; हा राम म्हणजे तुझें जीवितसर्वस्व; दंडकारण्यामध्यें आम्हीं असतांना एखाद्या
६ जिवलग सखीस शोभेसें तुझें वर्तन; वडिलांची तूं किती तरी लाडकी! तुझें भाषण थोडेंच पण गोड असे. अशा प्रकारची तूं, आणि तुझा हा असा परिणाम व्हावयाचा ना!

> सर्व जग तुजमुळें पवित्र; पण जगाचें भाषण तुजठायीं असें अपवित्र! सर्व लोक तुजमुळेंच सनाथ; पण तुला मात्र आतां अनाथ होऊन विपत्ति भोगावी लागणार! ४३

दुर्मुखा, जा. लक्ष्मणाला सांग, हा 'नवीन' राजा राम तुला अशी आज्ञा करीत आहे. ( त्याच्या कानांत कांहीं सांगतो. )

३ **दुर्मुख**—महाराज, हें काय हें? अग्नीनें जिला शुद्ध केली, जिच्या गर्भामध्यें रघुकुलाची पवित्र संतति आहे अशा महाराज्ञीसंबंधानें केवळ दुर्जनांच्या वचनावरून हें काय करण्याचें महाराजांनीं मनांत आणिलें
६ आहे?

**राम**—छे, असें नको म्हणूं. माझे प्रजाजन, आणि दुर्जन!

१. जनकाचा पूर्वज.

इक्ष्वाकूचा[१] वंश प्रजाजनांस अभिमत आहे. त्या
वंशांत माझ्या कमनशीबानें आज लोकप्रवादास
कारण उत्पन्न झालें आहे. अग्निशुद्धीसमयींचें जें
अद्भुत कृत्य तें दूर [ लंकेंत ] घडून आलें; येथें
त्यावर कोणाचा बरें विश्वास बसावा ? ४४

तेव्हां, जा [ सांगितल्याप्रमाणें कर ].

**दुर्मुख**—हाय, हाय ! देवी ! ( निघून जातो. )

३ **राम**—हायरे नशीबा ! हें माझें कर्म किती क्रूर व भेसूर !
बाल्यापासून ज्या माझ्या प्रियेचें हरएक प्रिय
वस्तूंनीं मीं पोषण केलें, व जी प्रेमानें मजवर
विसंबून वक्षःस्थळीं शिर ठेवून निजली आहे,
तिला, एकाद्या खाटिकानें पाळलेल्या मैनेची
[ मान मुरगळावी ] त्याप्रमाणें, मी कपटानें हा
आज मृत्यूच्या स्वाधीन करीत आहें ! ४५*

* बाल्यापासुनि पोशिली प्रियसखी देऊनि त्या त्या प्रिया
अन्याला जरि भिन्न देह दिसती जी एकचित्ता प्रिया ॥
तीतें छद्म करूनि आज सहसा मी मृत्युला देतसें
जैसा खाटिक पाळिल्या बकरिचा कापी गळा हें तसें ॥६७॥

१. रामाचा एक पूर्वज. रामायणामध्यें भरतादि भाऊ रामास सीतात्यागापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करितात. नाटकांत दुर्मुखच रामाविरुद्ध बोलत आहे; व दुर्मुख हा केवळ परिजन असल्यामुळें त्यास रामानें सहज निरुत्तर केलें. मुळांत हा फेरफार करण्यामध्यें भवभूतीचा हेतु एकतर सीतेचा त्याग करण्यामध्यें रामाचा दुराग्रह जास्त प्रकट दिसूं नये. व दुसरें, अधिकारयुक्त व जबाबदार अशा कोणींच रामाची कानउघाडणी न केल्यामुळें रामाची चूक अर्थात् त्याच्या नजरेस येऊं नये; व सातव्या अंकामध्यें अरुंधतीनें ती चूक त्याच्या नजरेस आणावी हा होय. मागें पृष्ठ ७३ टीप १ पहा; तसेंच पुढें २·६[१५] पहा. सीतेचा त्याग करण्याचा निश्चयही नाटकांत लोकप्रवाद कानीं येतांच अमलांत आला आहे, वाल्मीकिरामायणाप्रमाणें दुसरे दिवशीं नाहीं; हाही फरक लक्षांत ठेवण्यासारखा आहे ( उत्तरकांड सर्ग ४२·४५ ). दूताचें नांव रामायणांत 'भद्र' असें आहे. येथें 'दुर्मुख' असें दिलें आहे.

ज्याचा स्पर्शही होणें अनुचित असा मी महापातकी; याउपर (माझ्या स्पर्शानें ) मी देवीस कसें दूषित करूं ? ( सीतेचें मस्तक हळूंच
३ उचलून व आपला हात काढून घेऊन )—

भोळे जानकि, [ घोर ] अघटित कृत्यें करणारा
मी चांडाल आहें; माझा आसरा [ याउपर ]
तुला काय कामाचा ? तूं चंदन समजून ज्याला
भ्रांतीनें कवटाळिलेंस तो हा विषवृक्ष आहे, व
याचीं फलें जहर आहेत. ४६

( उठून उभा राहून ) हाय हाय ! आतां मात्र ही जीवनयात्रा मला विपरीत दिसूं लागली. या जगांत या उपर राहण्याचें तरी या
३ रामाला काय प्रयोजन उरलें ? कारण, हें जग म्हणजे यापुढें निव्वळ जीर्ण, ओसाड अरण्यच. संसाराची बहार मावळली. हें कष्टमय शरीर [ आतां कशाकरितां तगवून धरावयाचें ? ] मी असहाय
६ झालों. आतां जावें तरी कोठें व करावें तरी काय ? अथवा—

या रामाला हें जीवित जें प्राप्त झालें आहे तें
केवळ दुःखाची जाणीव करून देण्याकरितांच.
मर्मस्थानीं आघात करणारा हा प्राण बाहेर जातां
जात नाहीं; एकाद्या वज्राच्या खिळ्याप्रमाणें
आंत रुतून बसला आहे ! ४७

माते अरुंधति, ऋषिश्रेष्ठा वसिष्ठा, भगवंता विश्वामित्रा; हे विश्वपावका अग्ने, हे विश्वास धारण करणारे देवि पृथ्वी; हा तात, हा जनकराज,
३ हा मातांनो; हे प्रियसख्या किष्किंधाधिपते सुग्रीवा, हे कृपासागरा हनूमंता; हे परमोपकारका लंकेश्वरा विभीषणा, हे परमार्थभगिनी त्रिजटे;[1] या पापिष्ठ रामानें तुम्हां सर्वांस ठकविलें, तुमचा उपमर्द
६ केला. अथवा, त्यांना हांक मारण्याचा तरी मला आतां काय अधिकार ?

कारण त्या महात्म्यांचीं नांवें मज कृतघ्न दुरा-
त्म्याच्या तोंडीं आल्यास न जाणों कदाचित् तेही

१. सीता रावणाच्या बंदिवासांत असतां त्रिजटा राक्षसी तिला फार उपयोगी पडली.

माझ्या पापानें दूषित होतील ! ४८

जो मी—

जिनें मजवर विश्वास ठेवून निजावयास माझ्या वक्षःस्थलाचा आधार घेतला आहे, त्या या माझ्या प्रिय गृहिणीस, माझ्या गृहलक्ष्मीस, दिवस पूर्ण झाल्यामुळें स्फुरण पावणाऱ्या व दुःसह अशा गर्भ-भारानें ती भारावली असूनही, तिला, मांसभक्ष-कांपुढें बली द्यावा त्याप्रमाणें, आज निर्दयपणें टाकून जात आहें ! ४९

( सीतेच्या पायांवर मस्तक ठेवून ) देवि, देवि ! तुझ्या पायांचा रामाच्या मस्तकाला हाच शेवटचा स्पर्श म्हणावयाचा ! ( रोदन करितो. ) ३

**पडद्यांत**—अब्रह्मण्य, अब्रह्मण्य[1] !

**राम**—ही काय गडबड आहे पहा बरें.

पुनः **पडद्यांत**—उग्र तप करणाऱ्या यमुनातटवासी ऋषीं-चा समुदाय लवण राक्षसाच्या त्रासामुळें तुजप्रत शरण आला आहे. ५०

**राम**—काय ! अद्यापि राक्षसांचा त्रास? तर मग या दुरात्म्या कुंभी-नसी[2] पुत्राचें निर्दलन करण्यास ताबडतोब शत्रुघ्नाची रवानगी केली पाहिजे. ( कांहीं पावलें जाऊन पुनः माघारा येऊन[3] ) हा देवी, ३

१. रामाचें मन सीतात्यागापासून परावृत्त होऊं लागणार तोंच स्वकर्तव्याची आठवण देणारा हा ब्राह्मणाचा करुण स्वर त्याच्या कानीं येऊन त्याचें मन कर्तव्यनिष्ठुर होतें हा योग्य अप्रतिम आहे.

२. लवण राक्षसाची माता.

३. वर श्लोक ४९ मध्यें ' मांसभक्षकांपुढें बली द्यावा ' असें राम म्हणत आहे तोंच मांसभक्षक राक्षसांची त्याला वर्दी येऊन पोहोंचावी हाही योग लक्षांत ठेवण्यासारखा आहे. पुढें अंक ३ श्लोक २९ पहा. निराशापूर्ण मनानें पृथ्वीस रामानें केलेली ही प्रार्थना फुकट गेली नाहीं हें पुढें तिसऱ्या अंकाच्या विष्कंभकांत व सातव्या अंकाच्या शेवटीं दिसून येईलच.

सीते ! आतां तुझें कसें बरें होईल ? भगवति वसुंधरे, या सुशील दुहितेवर तुझी कृपादृष्टि असूं द्या.

[ कारण ] ही जनकांच्या व रघूंच्या कुलांचें मंगल-
सर्वस्व आहे; व देवांच्या पवित्र यज्ञभूमींत पवित्र
आचरणाच्या या कन्येला त्वां जन्म दिला आहेस.५१

( निघून जातो. )

**सीता** ( झोपेंतच )—हा प्रियकरा आर्यपुत्रा ! ( दचकून जागी
३ होऊन ) मी किती वेडी ! दुष्ट स्वप्नामुळें फसून जाऊन मी आर्यपुत्रां-
नाच हांक मारीत आहें[1] ! ( आसपास पाहून ) अगबाई, हें काय !
मला एकटीला येथें टाकून आर्यपुत्र निघून गेले ! हें काय बरें असावें ?
६ असो. पुनः स्वारींची गांठ पडली म्हणजे चांगलें रागावलें पाहिजे.*

* येथें परशुरामपंतांनीं सीतेच्या तोंडीं अत्यंत अप्रासंगिक अशा कांहीं पदरच्याच दिंड्या घातल्या आहेत. त्या मूळांत रसहानी करणाऱ्या असल्या तरी पुष्कळांस चिरपरिचित असल्या कारणानें येथें दिल्या आहेत.

असे कोठें तो प्राणनाथ माझा ॥
दाखवा हो लवकरी रघूराजा ॥ ८२ ॥
कसा गेला टाकून एकटीला ॥
शीर अंकीं ठेवून नीजलीला ॥ ८३ ॥
काय कारण जाहलें जावयाला ॥
कोण आलें हो त्यास न्यावयाला ॥ ८४ ॥
तुझ्या संगें येईन मी वनांत ॥
बोलिला जें तें नाहिं कां मनांत ॥ ८५ ॥
स्वप्न आतां तैसाच मज झाला ॥
प्राणनाथ टाकून मला गेला ॥८६॥
हांक मारित फीरतें प्राणनाथा ॥
येईं येईं सत्वरी जगन्नाथा ॥८७॥
तेंच झालें कीं खरें हा कपाळा ॥
कुठें पाहूं मी प्रिया जगत्पाळा ॥८८॥

१. यावरून राम आपणास टाकून जाईल अशी सीतेस कल्पनाही करणें अश-क्य होतें हें कवीनें दाखविलें आहे.

पण स्वारींना पाहून माझें मन माझ्या ताब्यांत राहिलें तरच रागाची गोष्ट[1] ! बाहेर परिजनांपैकीं कोण आहे ?

९ **दुर्मुख** ( प्रवेश करून )—देवि, कुमार लक्ष्मणाची विनंति आहे कीं राणीसरकारांकरितां रथ तयार आहे. चलावें.

**सीता**—ठीक, मजकडून तयारी. ( उठून ) गर्भभार स्फुरण पावत १२आहे[2] असें वाटतें. हळू हळू जाऊं या.

**दुर्मुख**—असें इकडून, इकडून यावें, राणीसरकार.

**सीता**—रघुकुलदेवतांस माझा नमस्कार असो.[3]

( उभयतां जातात. )

## महाकविश्रीभवभूतिप्रणीत उत्तररामचरित नाटकाचा चित्रदर्शन नामक अंक पहिला[4] समाप्त.

असो आतां पाहीन त्यास जेव्हां ॥
त्याजवर मी होईन रुष्ट तेव्हां ॥८९॥

१. तिसऱ्या अंकांत होणारी सीतेच्या मनाची स्थिति या एका वाक्यावरूनच उघड होते.

२. वनांत टाकल्यानंतर थोड्याच अवधींत सीतेस प्रसववेदना होतात ( अंक ३, विष्कंभक) याचें कारण या वाक्यांत आलें आहे. दुर्मुख नित्याचा परिजन असल्यामुळें(पृष्ठ९३, टीप २) व वयोवृद्ध असल्यामुळें (तो लक्ष्मणास 'कुमार' म्हणत आहे १.५१[९] ) सीतेला त्याचेजवळ हें सांगण्यास संकोच नव्हता. सबब घनश्याम या टीकाकारानें या बाबतींत भवभूतीस दिलेला दोष अनाठायीं आहे.

३. घरांतून बाहेर पडतेवेळीं कुलदेवतांस नमस्कार करणें ही पद्धतच आहे. आपण पतीसहवर्तमान वनविहारास जात आहों अशीच अर्थात् सीतेची कल्पना.

४. या अंकासारखा सर्वांगपरिपूर्ण व कार्यक्षम अंक संस्कृत नाटकांत क्वचितच आढळून येतो. भवभूतीचें नाट्यरचनाकौशल्य या अंकाच्या प्रत्येक ओळींत दिसून येतें असें ह्मटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. याकरितां प्रस्तुत अंकाचें थोडेंसें विस्तृत विवरण येथें करण्याचा विचार आहे.

सीतेचा त्याग व बारा वर्षांनंतर पुनः तिचा स्वीकार असे प्रस्तुत कथानकाचे लि
दोन भाग आहेत. त्यांपैकीं पहिल्या अंकांत त्यागरूपी पूर्वार्ध घडून येतो. या उपर सहा अंकांची काय जरूर आहे? या प्रश्नास उत्तर असें कीं, भवभूतीच्या मतें त्यागानंतर सीतेचें रामाशीं जर संमेलन व्हावयाचें, तर तें अंतःकरणापासून झालें पाहिजे. वरकरणीं असून उपयोगी नाहीं. अगोदर परित्यागरूपीं शल्य मनांतून काढून टाकिलें पाहिजे, आणि नंतर व्यावहारिक दृष्ट्या त्यांचा एकोपा झाला पाहिजे. यापैकीं मानासिक संमेलन तिसऱ्या अंकाच्या शेवटीं होतें. व्यावहारिक संमेलन, अथवा पत्नी व पुत्रांशीं रामाची भेट, उरलेल्या चार अंकांनीं घडून येते.

या प्रकारचें हें अंतिम ध्येय अगदीं प्रथमपासून भवभूतीनें आपल्या डोळ्यासमोर, ठेविलें आहे. प्रस्तावनेनें साधिलेलें कार्य यापूर्वी (पृष्ठ७४) ध्वनित केलेंच आहे. उरलेल्या अंकामध्यें भवभूतीनें जे भाग आणिले आहेत त्यांपैकीं अगदीं उघड दिसणारे ह्मणजे (१) जृंभकास्त्रांचें सीतेच्या भाविसंततीस वितरण. सहाव्या व सातव्या अंकांमध्यें पुत्रांची ओळख पटण्याचें हें प्रधान साधन होय. (२) भागीरथीची, व (३) पृथ्वीची सीतेच्या कल्याणार्थ रामानें केलेली प्रार्थना. रानांत टाकलेल्या सीतेचें पृथ्वी व भागीरथी ह्या देवतांनींच संरक्षण केलें आहे; व सातव्या अंकांत ऐन वेळीं सीतेस घेऊन या आल्या आहेत. (४) अरुंधत्यादि वडील बायांनीं डोहाळे पुरवण्याबद्दल रामास पाठविलेला निरोप, चित्रदर्शनामध्यें पाहिलेल्या प्रसंगावरून वनविहाराची सीतेस होणारी साहजिक इच्छा, व या मिषानें सीतेचा त्याग करण्याची रामास आलेली आयतीच संधि, हेंही या अंकाचें कार्य उघड लक्षांत येण्यासारखेंच आहे. पण हीं चारींही बाह्यसृष्टींतील कार्यें झालीं.

या अंकाचा खरा रोंख अंतःसृष्टींतील कार्यांवरच आहे. लोकप्रवादाची बातमी प्रस्तावनेंत आम्हांस कळून चुकली आहे. पण ती रामाच्या कानीं येण्यापूर्वी कवीस खालील गोष्टी सिद्ध करावयाच्या होत्या. (१) जनप्रवाद कांहींही असो; सीतेसंबंधीं रामाचें मत अगदीं अकलुषित होतें. दुष्यंताप्रमाणें त्यास शापानें भ्रम झाला व म्हणून त्यानें आपल्या पत्नीस दूर केलें असा प्रकार नाहीं. ही गोष्ट कवीनें मोठ्या खुबीनें १.१२[११] ते १.१४ यामध्यें आणिली आहे. लक्ष्मणानें चित्रें राज्याभिषेकापर्यंत आलीं आहेत, अथवा नंदिग्रामीं भरतभेट झाली तेथपर्यंत आलीं आहेत, असें म्हटलें असतें तरी चाललें असतें. पण लक्ष्मण सहज अग्निशुद्धीचा उल्लेख करितो, व तेवढ्यानें भवभूति आपलें काम साधून घेतो. (२) सीता निष्कलंक आहे हें जाणूनही

राम तिचा त्याग कारितो याचें कारण राजाच्या कर्तव्यासंबंधीं रामाची उदात्त कल्पना हें होय. राजा हा प्रजेचा शास्ता अथवा उपभोगिता नव्हे. तर तिचा नेता आहे. राजाचें प्रत्येक कृत्य प्रजेस आदर्श झालें पाहिजे. खासगी अथवा सरकारी, स्वकीय अथवा परकीय, राज्यांतील कोणतीही बाब अशी नसावी कीं जीमुळें प्रजेस असंतोषास अथवा अविश्वासास कारण राहील. राजा प्रजेकरितां आहे, प्रजा राजाकरितां नव्हे. रामाच्या मनाची ही स्थिति १·१२ अथवा १·४१ यामध्येंच दाखविली आहे असें नव्हे, तर सीतेच्या व रामाच्या अगदीं पहिल्या भाषणामध्यें त्याची कर्तव्य रूपी असिधाराव्रताची कल्पना स्पष्ट झाली आहे. येणाऱ्या वादळाची ही पूर्व सूचनाच समजावयाची. ( ३ ) ही कर्तव्याची उदात्त कल्पना रामाप्रमाणें सीतेलाही पूर्णपणें अवगत होती. व त्याकरितां जरूर तर ती आपखुषीनें वनांत गेली असती. हें १.१२ नंतरच्या सीतेच्या भाषणावरून स्पष्ट होत आहे. सीतेला राग आला तो रामानें आपणास टाकिलें म्हणून नव्हे, तर टाकण्यामध्यें आपला गैरविश्वास दाखविला, आपणाशीं कपट केलें, ह्मणून. पहा श्लोक ४९ आणि पृष्ठ १०१ टीप ३. या कपटी वर्तनामुळें, आपल्या पातिव्रत्याविषयीं रामास खरोखर संशय तर आला नसेलना, अशीहि सीतेची कल्पना होणें साहजिक होतें. पुनश्च पतिपत्नींचें संमेलन होण्यापूर्वी सीतेच्या मनास झालेली ही जखम भरून येणें अवश्य होतें. ( ४ ) रामानें तरी सीतेचा अशा रीतीनें त्याग कां केला? हें कोडें नीट उलघडण्यासाठीं भवभूतीनें रामास कचाट्यांत आणून ठेविलें आहे. नुकताच राज्याभिषेक होऊन राज्यकारभाराचें बिकट जूं त्यानें आपल्या शिरावर घेतलें आहे; व ज्याला एकादें जबाबदारीचें काम प्रथमच अंगावर पडलें म्हणजे सच्छील मनुष्याची काय स्थिति होते त्याचा अनुभव असेल त्यालाच या प्रसंगानें झालेल्या रामाच्या मनोवस्थेची कल्पना करितां येईल. शिवाय राम हल्लीं अयोध्येंत एकटा आहे. गुरुजन व वयोवृद्ध उपदेशक ऋष्यशृंगाच्या आश्रमांत आहेत, व या त्याच्या असहाय अवस्थेची त्याला जणू काय पूर्ण जाणीव पटविण्याकरितांच वसिष्ठ ऋषींचा श्लोक ११ मध्यें आलेला निरोप. अर्थात् रामाच्या मनाची अगदीं चलबिचल झाली होती. अशा अवस्थेंत लोकापवादाची ती बातमी येतांच रामानें कर्तव्याची न्याय्य दिशा सोडावी व निरर्थक बेसुमार स्वार्थत्याग करण्यास तयार व्हावें यांत नवल तें काय? अरुंधतीनें सातव्या अंकांत केल्याप्रमाणें लोकांची कानउघाडणी करणें जरी रामास शक्य नव्हतें तरी निदान त्यानें सीतेसंबंधीं कपटप्रयोग तरी

करावयाचा नव्हता. पण मन स्वस्थ नसलें म्हणजे थोरांच्या हातूनही प्रसंगविशेषीं अकार्य कसें घडून येतें हें कवीनें येथें दाखविलें आहे. ( ५ ) रामानें सीतेचा त्याग केला म्हणून त्याला म्हणजे दुःख होणार नाहीं असें मुळींच नव्हतें. श्लोक १२ मध्यें तो कांहींही म्हणो. कल्पनेच्याच त्या गोष्टी होत्या तेव्हां ती फुशारकी ठीक; पण कदाचित् आपल्याबरोबर वनविहारास राम येणार नाहीं अशी कल्पनासृष्टींतून थोडीशी वस्तुस्थितीकडे कलणारी शंका सीतेनें घेतांच रामास राग काय आला ! ही एकच गोष्ट नव्हे तर चित्रदर्शनाचा सर्वच प्रसंग सीता व राम यांचें परस्परांविषयींचें अगाध प्रेम उत्कृष्ट रीतीनें व्यक्त करितो. व त्या मानानें पुढें येणारा वियोग त्यांना किती दुःसह होईल याची आपणांस अंधुक कल्पना बांधितां येते.

पूर्वीं दर्शविलेलीं बाह्य सृष्टींतील चार, व हीं अंतःसृष्टींतील पांच, अशीं नऊ कार्यें या अंकानें साधिलीं आहेत. ठिकठिकाणीं ज्या दुसऱ्या खोंचा आहेत त्या आम्हीं टिपांमधून दाखविल्या आहेतच. तथापि आणखी एक दोन कार्यांचा येथें स्पष्ट उल्लेख करणें जरूर आहे. ( १ ) रामानें राजवाड्यांतील दालनें आपल्या पूर्व आयुष्यक्रमांतील अनेक प्रसंगांचीं चित्रें काढवून भूषविलीं आहेत असें आपणांस समजलें, व या चित्रांकडे एकाग्रतेनें पाहतांना त्याच्या मनाची काय स्थिति होतें हें आपण प्रत्यक्ष पाहिलें, म्हणजे पत्नीस टाकिलें तरी, तिचीं चित्रें पाहून होणाऱ्या दुःखसंमिश्र आनंदानें तो तदनंतर आपलें चित्त कसें रिझवील याची आपणांस सहज कल्पना होते. सीतेस टाकल्यानंतर रामानें द्वितीय विवाह केला नाहीं हें या उपर सांगावयास कशास हवें ? अर्थात् त्यानें दुसरा विवाह केला नाहीं, त्याच्यानें तो करवणारही नाहीं, त्याची तशी इच्छाही कधीं होणें शक्य नाहीं. ( २ ) रामाचें या अंकातील पहिलेंच भाषण ध्या. एका अपरिहार्य गोष्टीबद्दल—गुरुजनांच्या झालेल्या वियोगाबद्दल—राम येथें सीतेचें सांत्वन करीत आहे व सर्व नाटकाचा मथितार्थ तरी हाच आहे. ( ३ ) तसेंच, चित्रदर्शनाचे वेळीं पूर्वकालीन सुखाच्या आठवणींमध्यें सीता व राम अगदीं गढून जाऊन आनंदानें जेथें जेथें तल्लीन झाले आहेत (उदाहरणार्थ, १·२०, १·२२, १·२७) तेथें तेथें कवीनें कथाप्रसंग असा आणिला आहे कीं लक्ष्मणानें लगेच त्यांस एकाद्या दुःखद प्रसंगाचें चित्र दाखवावें (पहा, १·२०^१, १·२४^१, १·२७^१) व त्यांच्या सुखस्वप्नाचा मोड व्हावा. ऐहिक सुखाची क्षणभंगुरता हा भवभूतीचा आवडताच विषय आहे ( उपोद्घात § १९ क,

शेवट पहा), पण येथें पहिल्याच अंकांत या प्रमेयाचा असा अस्पष्ट ध्वनि जागोजाग उमटवून ठेवणें एकंदर रसपरिपोषाच्या दृष्टीनें अत्यंत चातुर्याचें आहे. असो.

भवभूतीनें हीं सर्व कार्यें चोख उरकलीं आहेत एवढेंच नव्हे, तर तसें करण्यामध्यें शब्दावडंबर मुळींच केला नाहीं. चित्रदर्शनामधील प्रसंग तरी शेलके तेवढेच घेतले आहेत, व प्रत्येकाचें कांहींना कांहीं तरी कार्य आहे. सर्व रामायणच्या रामायण येथें उतरिलें नाहीं. विशेषतः पृष्ठ ८७, टीप १ पहा. ( यास एकच अपवाद आहे—१·३०[४] ते १·३१ अखेर. हा भाग विशेष कार्यकारी अथवा रसपोषक आहे असें म्हणवत नाहीं. पण हाही भाग प्रयोगाचे सोईकरितां, कदाचित् भवभूतीच्याच संमतीनें, वगळला जात असावा असें म्हणण्यास आधार आहे. ) अंकांतील भाषाही प्रौढ व प्रसादयुक्त आहे, व मानवी मनोविकारांचें चित्र कांहीं ठिकाणीं तर अप्रतिम साधिलें आहे. भवभूतीच्या पूर्वीच्या दोन नाटकांच्या मानानें हा अंक अत्यंत सरस तर आहेच, पण इतर संस्कृत नाटकांमध्यें व खुद्द शेक्सपीयरच्या नाटकांमध्येंही नाटकाचा प्रारंभ इतक्या खुबीनें केलेला वरचेवर पहावयास मिळत नाहीं.

## अंक दुसरा

**पडद्यांतून**—महातपस्विनीचें स्वागत असो.

( तदनंतर प्रवासाचा वेष केलेली एक तापसी प्रवेश करिते. )

३ **तापसी**—कोण ? हो, ही वनदेवता फल, कुसुम, आणि पल्लव यांनीं मिश्रित असा हा अर्घ्य घेऊन माझें स्वागत करण्यासाठीं येत आहे वाटतें.

६ **वनदेवता** ( प्रवेश करून, व अर्घ्य अर्पण करून )—

हें वन तुम्हांस खुलें आहे; याचा हवा तसा उपयोग करावा. आजचा हा दिवस मला मोठा भाग्याचा. कारण सज्जनांची सज्जनांशीं गांठ सहजासहजीं घडून येत नसते; तिला पुण्याईच लागते. तरूंची छाया, पाणी, अथवा तपश्चरणांस उचित अशी फलमूलादि अशनसामग्री, सर्व कांहीं येथें तुम्हांस पराधीन नाहीं. १*

**तापसी**—हो, तें काय सांगावें ?

प्रायशः प्रेमळ असें आचरण; विनययुक्त, मधुर, व मितस्थ असें संभाषण; जात्याच कल्याणावह स्वभाव; आणि निर्दोष असा परिचय; तसेंच आरंभापासून शेवटापर्यंत जेथें रसविपर्यास म्हणून होत नाहीं, असें हें साधुत्वाचें निष्कलंक

* तुझें सारें आहे वन, सुदिन मातें उगवला
सतांचा संतांशीं परमसुकृतें संग घडला ॥
तरुच्छाया पाणी मुनिस अशना योग्य असती
फलें मूलें जीं जीं सकलहि पराधीन नसती ॥ १ ॥

व परमशुद्ध रहस्य सदैव विजयी असो ! २*

( उभयतां बसतात. )

**वनदेवता**—आपणांस कोणत्या नांवानें मीं ओळखावें ?

३ **तापसी**—मला आत्रेयी म्हणतात.

**वनदेवता**—आर्ये आत्रेयी, आपलें येथें कोठून येणें झालें ? व या दंडकारण्यांत येण्याचा उद्देश[१] काय असावा बरें ?

**आत्रेयी**[२]—या प्रदेशांत अगस्त्यादिक अनेक सामवेदवेत्ते
ऋषी रहातात, तेव्हां त्यांच्यापासून वेदांतविद्या
शिकावी म्हणून वाल्मीकि ऋषींच्या आश्रमांतून
मी येथें फिरत फिरत आल्यें आहें. ३

**वनदेवता**—पण मी म्हणत्यें, वरकड सर्व मुनी जर ब्रह्मविद्या शिकण्यासाठीं त्या पुरातन, ब्रह्मवेत्त्या, वरुणपुत्र वाल्मीकि महर्षींजवळ
३ जाऊन राहतात, तर तेथून आपण निघून आलात तें काय म्हणून ?

**आत्रेयी**—तेथें आमच्या अध्ययनाला एक मोठें विघ्न उत्पन्न झालें म्हणून हा लांबलचक प्रवास पत्करावा लागला.

६ **वनदेवता**—विघ्न ! तें कोणतें ?

**आत्रेयी**—भगवान् वाल्मीकींना कोणी एका देवतेनें सर्व प्रकारांनीं अद्भुत व नुकतेंच ज्यांचें स्तनपान सुटलें आहे अशा वयाचीं दोन
९ मुलें अर्पण केलीं. आणि या मुलांनीं भगवान् वाल्मीकीच्याच केवळ नव्हे तर सर्व चराचर भूतमात्रांच्या अंतःकरणांत स्नेह उत्पन्न केला आहे.

* सदा प्रीती चित्तीं विनयमधुरा वाणिहि सदा
स्वभावें कल्याणी मति परिचया भेद न कदा ॥
पुढें किंवा मागें मनिं रसविपर्यास नसती
रहस्यें साधूंचीं अकपट विशुद्धें च असती ॥ २ ॥

१. परक्या मनुष्याची गांठ पडली असतां चौकस लोक बहुधा याच प्रकारचे प्रश्न विचारितात.

२. प्रवेशाच्या आरंभींची 'तापसी' तिचें नांव कळतांच 'आत्रेयी' झाली. याच-प्रमाणें पुढें (२.५[२३]) 'वनदेवता' 'वासंती' झाली आहे.

१२**वनदेवता**—त्या मुलांचीं नांवें कळलीं आहेत काय?

**आत्रेयी**—त्या देवतेनेंच त्यांचीं कुश आणि लव हीं नांवें व त्यांचा प्रभावही निवेदन केला.

१९**वनदेवता**—तो कसा काय?

**आत्रेयी**—त्यांना म्हणे जृंभकास्त्रें व तत्संबंधीं गुप्त मंत्र जन्मापासून सिद्ध आहेत.

१८**वनदेवता**—हें मोठेंच नवल म्हणावयाचें!

**आत्रेयी**—भगवान् वाल्मीकींनीं प्रत्यक्ष एकाद्या दाईप्रमाणें या मुलांचें पालन-पोषण केलें. चौलविधीनंतर एका त्रयीशिवाय इतर तिन्ही विद्या २१त्यांना यथासांग पढविल्या. नंतर गर्भापासून त्यांना दहा संपून अकरावें वर्ष लागतांच क्षात्रविधीप्रमाणें त्यांचें उपनयन करून त्रयीविद्याही त्यांना शिकविली.[१] तेव्हां याप्रमाणें त्यांची बुद्धि व धारणाशक्ति अति २४तीव्र असल्यामुळें आमच्यासारख्यांनीं[२] त्यांच्याबरोबर अध्ययन करणें दुरापास्त झालें आहे. कारण—

विद्यार्थी तरतरीत असो अथवा जड असो, उभयतांना गुरुजी विद्या द्यावयाची ती सारखीच देतात. त्यांपैकीं एकाची ज्ञानशक्ति ते वाढवितात आणि दुसऱ्याची कमी करतात असा मुळींच प्रकार नसतो. आणि तथापि सुद्धां त्या विद्येचें फल उभयतांत भिन्न भिन्न हें दिसून येतेंच. उघडच आहे. शुद्ध स्फटिक जसें बिंबग्रहण करितो तसें मातीचा

१. त्रयीविद्येस—वेदपठणास—उपनयनापूर्वी अधिकार नसतो हें प्रसिद्धच आहे. त्रयीशिवाय इतर तीन विद्या आन्वीक्षिकी ( न्यायशास्त्र ), वार्ता ( कृषिवाणिज्यादि ), व दंडनीति ह्या होत. कौटिलीय अर्थशास्त्र १·१·१ पहा.

२. गुरुकुलांत राहून स्त्रीपुरुषांनीं एकत्र अभ्यास करणें हें भवभूतीच्या काळीं बरेंच प्रचारांत असावेंसें दिसतें. उदाहरणार्थ मालतीमाधव १·१२[१-३] पहा.

गोळा करूं शकत नाहीं. ४*

**वनदेवता**—तुमच्या अध्ययनाला विघ्न म्हणून उत्पन्न झालें तें हेंच?

**आत्रेयी**—दुसरेंही एक आहे.

३ **वनदेवता**—दुसरें तें कोणतें ?

**आत्रेयी**—त्यानंतर एके दिवशीं ब्रह्मर्षि [ वाल्मीकि ] माध्यान्हिक संध्यावंदनार्थ तमसा नदीच्या तीरीं गेले. तों तेथें विहार करणाऱ्या ६ क्रौंचांच्या जोडप्यांतून एका पक्ष्यास पारध्यानें [ बाणानें ] मारून पाडला आहे असें त्यांच्या नजरेस आलें. त्यासरशीं त्यांना आकस्मिक स्फूर्ति होऊन त्यांच्या मुखांतून ही दिव्य वाणी—हा शुद्ध ९ छंदोबद्ध अनुष्टुभ् श्लोक—बाहेर पडला—

> रे निषादा[1], शाश्वतपदीं तूं कधींही प्रतिष्ठित होणार
> नाहींस; कारण या काममोहित क्रौंचांच्या जोड-
> प्यांतील एका पक्ष्याचा त्वां वध केला आहेस. ५

**वनदेवता**—मोठी नवलाची गोष्ट कीं, अशी ही नूतन छंदोबद्ध वाणी वेदांशिवाय अन्यत्र[2] प्रकट व्हावी !

३ **आत्रेयी**—मग या प्रकारें ज्यांच्या अंतरात्मीं शब्दब्रह्माचा प्रकाश प्रकटला आहे अशा त्या भगवान् वाल्मीकि ऋषीसमोर तत्क्षणींच कमलापासून ज्याची उत्पत्ति व जो भूतमात्रांस उत्पन्न करणारा भगवान् ६ ब्रह्मदेव तो प्राप्त होऊन बोलला कीं, ' ऋषे, शब्दरूपी ब्रह्माची

> * गुरू विद्या प्राज्ञा जसि तसिच अज्ञाहि वितरी
> तयांची धीशक्ती अधिक अथवा न्यून न करी ॥
> तथापी दोघांच्या बहुतचि फलीं भेद दिसतो
> जसा बिंबग्राही शुचिमणि तसा लोष्ठ नसतो ॥४॥

१. हा श्लोक वाल्मीकिरामायण, बालकांड (२·१५) येथून घेतला आहे. ह्याच श्लोकाचा कालिदासानें रघुवंशामध्यें (१४·७०) उल्लेख केला आहे.हा श्लोक जसा वनचरास उद्देशून आहे तसा तो विष्णूस उद्देशूनही आहे असा रामायणावरील टीकाकाराचा अभिप्राय आहे. विशेष स्पष्टीकरणार्थ टीका पहावी.

२. वाल्मीकींनीं रामायण रचण्यापूर्वीं छंदाचा उपयोग वेदांशिवाय अन्यत्र कोणींही केला नव्हता असें म्हणतात.

तुझे ठायीं जागृति झाली आहे; तर आतां रामचरित वर्णन कर. तुझी दिव्य व प्रतिभाशाली दृष्टि सर्वत्र अकुंठित असो. तूं आद्य
९ कवि आहेस.' असें बोलून ब्रह्मदेव अंतर्धान पावला. तदनंतर भगवान् वरुणपुत्र वाल्मीकि हे शब्दब्रह्मास रामायण नामक एका ऐतिहासिक काव्याच्या रूपानें नटविते झाले.

१२**वनदेवता**—वा: ! या कृतीनें संसारास खरोखरच शोभा आली.

**आत्रेयी**—म्हणूनच मीं म्हटलें कीं तेथें आमच्या अध्ययनाला एक मोठें विघ्न उत्पन्न झालें.

१९**वनदेवता**—आतां बरोबर उलगडा झाला.

**आत्रेयी**—बाई, मीं आतां बरीच विश्रांति घेतली; तर आतां अगस्त्य-ऋषींच्या आश्रमास जाण्याची वाट दाखवा.

१८**वनदेवता**—असें या बाजूनें पंचवटींत प्रवेश करून पुढें गोदावरी-च्या तीरानें जा.

**आत्रेयी** ( डोळ्यांत आंसवें आणून )—एकूण हें तपोवन म्हणजे
२१ पंचवटी, आणि ही नदी गोदावरी; तसेंच हा पर्वतही प्रस्त्रवणच ना, आणि जनस्थानांतील देवता वासंती त्या तुम्हीच ?

**वासंती**—आपण तर्क केला तो सर्व खरा आहे.

२४**आत्रेयी**—हाय गे वत्से, जानकी !

> तेच हे तुझे वल्लभ बंधुजन कीं ज्यांच्या त्वां हर-
> एक प्रसंगीं गोष्टी काढीत असाव्यास. त्यांना
> आज मीं येथें समक्ष पाहिल्यानें, जरी तूं आतां
> नामशेषच झाली आहेस तरी, प्रत्यक्ष तुझी मूर्ति थेट
> माझ्या डोळ्यासमोर उभी राहते. ६

**वासंती**—( दचकून, स्वगत ) काय ? 'नामशेषच झाली आहेस' असें या म्हणतात ! ( उघड ) आर्ये, सीतादेवीवर असें कोणतें
३ संकट ओढविलें ?

**आत्रेयी**—अहो संकटच ओढविलें नव्हे तर ठपकाही आला! (तिच्या कानांत कांहीं सांगितलेसें करिते. )

६ **वासंती**—हाय हाय! दुर्दैवाचा कोण हा प्रखर आघात! ( मूर्छित होते. )

**आत्रेयी**—बाई, सावध व्हा, सावध व्हा.

९ **वासंती**—हाय गे माझे प्रियसखी! तुझें दैव थोर म्हणून आम्ही वर्णावें; आणि दैवाचा असा हा फेरा आज तुजवर यावा ना? रामभद्रा! रामभद्रा!! अथवा नको या उपर तुझें नांव. आर्ये १२ आत्रेयी, याप्रमाणें सीतेला लक्ष्मणानें अरण्यांत नेऊन सोडून दिल्यावर तिचें पुढें काय झालें याबद्दल कांहीं बातमी आहे काय?

**आत्रेयी**—छे. नांव नाहीं.

१५ **वासंती**—हाय हाय! अरुंधती, वसिष्ठ, यांसारखे रघुकुलाचे अग्रणी असतांना,—वृद्ध राजमातांच्या डोळ्यांदेखत—अशी गोष्ट कशी घडून आली?

१८ **आत्रेयी**—त्या समयीं सर्व गुरुजन ऋष्यशृंगाच्या आश्रमीं होते. हल्लीं त्यांचें तें द्वादशवार्षिक सत्र संपलें, व ऋष्यशृंगानें गुरुजनांची सन्मानानें बोळवणी केली. तेव्हां भगवती अरुंधतीचा विचार पडला २१ कीं अयोध्येंत जर सूनबाई [ सीता ] नाहीं तर मी कांहीं तेथें जाणार नाहीं. श्रीरामांच्या मातोश्रींचाही त्यास रुकार पडला. तदनुसार भगवान् वसिष्ठांच्या मुखांतून अशी पावन वाणी निघाली कीं आपण २४ वाल्मीकींच्या तपोवनांत जाऊन राहूं या.

**वासंती**—आणि तो–तो राजा[1], त्यानें हल्लीं काय आरंभिलें आहे?

**आत्रेयी**—राजा रामानें हल्लीं अश्वमेध यज्ञ आरंभिला आहे.

२७ **वासंती**—हा धिक्! एकूण त्यानें दुसरें लग्नही केलें!!

**आत्रेयी**—शिव शिव! भलतेंच!!

**वासंती**—तर मग यज्ञकृत्यांत धर्मपत्नी कोणास केलें आहे?

३० **आत्रेयी**—सीतेची सुवर्णमयी प्रतिमा.

**वासंती**—काय म्हणतां! खरें?

१. वासंती रामावर इतकी रागावली आहे कीं, त्यास 'रामभद्र' असें न म्हणतां 'राजा' ह्या स्नेहशून्य नांवानें ती उल्लेखिते.

वज्राहून देखील कठोर आणि कमलापेक्षांही मृदु
असें लोकोत्तर महात्म्यांचें मानस; त्याचें यथायोग्य
आकलन कोणास बरें करितां येईल ? ७

**आत्रेयी**—वामदेवांनीं[1] अभिमंत्रण करून यज्ञाचा अश्व सोडिला आहे व त्याकारणें यथाशास्त्र[2] रक्षक सैन्याचीही योजना झाली आहे.
३ त्याच्या शिरोभागीं लक्ष्मणात्मज चंद्रकेतु यास चतुरंग[3] दळ बरोबर देऊन पाठविलें आहे. दिव्य अस्त्रांमध्यें त्याची नुकतीच गति झाली आहे.

**वासंती** ( स्नेहानें, कौतुकानें व डोळ्यांत आंसवें आणून )—छोट्या
६ लक्ष्मणाला स्वतःचा मुलगा झाला अं ? एकूण मी बरेच दिवस जगलें म्हणावयाची[4] !

**आत्रेयी**–इतक्यांत एका ब्राह्मणानें आपल्या मेलेल्या मुलाचें शव राज-
९ द्वारीं आणून टाकिलें, व ऊर बडवून 'अब्रह्मण्य', 'अब्रह्मण्य' असा आक्रोश केला. तेव्हां राजानें एकादा अपराध केला असल्याशिवाय प्रजेमध्यें असा अकालीं मृत्यु येणें शक्य नाहीं या विचारानें राजा
१२ राम करुणायुक्त होऊन आत्मचरिताचें निरीक्षण करूं लागला असतां[5] अकस्मात् अशी आकाशवाणी झाली कीं—

शंबूक नांवाचा एक शूद्र पृथ्वीचे पाठीवर तप
करीत आहे. त्याचा शिरच्छेद करणें, हे रामा,
तुला प्राप्त आहे. त्याचा वध करून ब्राह्मण-
पुत्रास जीवदान दे. ८

ही वाणी ऐकतांच हातांत खड्ग घेऊन प्रभु रामचंद्रांनीं पुष्पक विमानीं आरूढ होऊन त्या शूद्रतपस्व्याच्या शोधार्थ सर्व दिशा व उपदिशा
३ धुंडाळण्यास आरंभ केला आहे.

१. वसिष्ठ संन्निध नसल्यानें कुलगुरूंचें काम वामदेवावर आलें.
२. यथाशास्त्र म्हणजे काय याचा पुढें (४·२६[१६]) उलघडा होईल.
३. गज, अश्व, रथ, आणि पायदळ.
४. वासंतीनें रामलक्ष्मणांस पाहिल्यास बारा वर्षे झालीं होतीं.
५. या प्रसंगीं, आपण सीतेचा त्याग केला त्याचेंच हें फल असावें, या विचारानें रामाचे अंतःकरणांत काहूर उठला असेल !

**वासंती**—तो धूम्रपान[१] करणारा शंबूक नांवाचा शूद्र ह्या आमच्या जनस्थानांतच तपश्चर्या करीत आहे. तर मग रामभद्र[२] फिरून
६ एकवार आपल्या आगमनानें या जनस्थानास शोभा आणणार !

**आत्रेयी**—बरें तर, बाई, आतां मला जाऊं द्या.

**वासंती**—ठीक, आर्ये आत्रेयी, यावें. दिवसही बराच वर आला
९ आहे. कारण हे पहा—

गोदावरीच्या कांठचे पक्ष्यांच्या घरट्यांनीं गजबजलेले वृक्ष [ ज्यांचे बुंधे ] कंडूल[३] गज गंडस्थलांच्या घर्षणांनीं हालवीत आहेत, व त्यामुळें उन्हानें अगोदरच शिथिल झालेल्या देंठापासून ज्यांचीं पुष्पें खालीं गळून पडत असतांना जणूंकाय ते गोदावरीस [ माध्यान्ह] पूजाच अर्पण करीत आहेतसें वाटतें. तसेंच या वृक्षांच्या छायेमध्यें, हे पहा भक्ष्यार्थ गवगवा करणारे पक्षी, आपल्या चोंचींनीं त्वचेखालीं लपलेल्या किड्यांना वेंचून बाहेर काढीत आहेत, व त्यांतच हीं गोजिरवाणीं कपोतांचीं व कुक्कुटांचीं कुटुंबें यांनींहीं किलबिलाट करून सोडिला आहे. ९*

( उभयतां [ भिन्न दिशांनीं ] चार पावलें चालून निघून जातात. )

## विष्कंभक[४]

* गजगंडघर्षणानें पुष्पें पडतात जीं जळावरती ॥
त्यांहीं श्रीगोदेची पूजा हे वृक्ष आदरें करिती ॥ ८ ॥
स्कंधीं जयाच्या बसुनी सुखानें पक्षी किडे वेंचिति ते मुखानें ॥
चंचूपुटें विंचरिती स्वपक्ष पहा असे रम्य तटस्थ वृक्ष ॥ ९ ॥

१. स्वतःस उलटें टांगून घेऊन.
२. पुनः 'राजा'चा 'रामभद्र' झाला !
३. मदोत्कट गजांच्या गंडस्थलांस कंडू सुटतो हें प्रसिद्धच आहे.
४. भवभूतीनें लिहिलेल्या कांहीं उत्तम विष्कंभकापैकीं हा एक आहे. विष्कंभकाचें प्रधान कार्य मागें घडून आलेल्या व पुढें घडून येणाऱ्या कथां-

शांची सांगड घालून देणें हें होय. पण एखाद्या ग्रीक नाटकाच्या आरंभीं अथवा अंतीं एकादें पात्र येऊन जशी आपली कुळकथा सांगतें अथवा एकाद्या प्रसंगाचें लांबलचक वर्णन करीत सुटतें; अथवा रामभट व शामभट, किंवा सभ्यगृहस्थ नंबर १ व सभ्यगृहस्थ नंबर २ देवडीवर वा चवाठ्यावर शिळोप्याच्या गप्पा मारण्यासाठीं जमून निरर्थक प्रश्नोत्तरांची जशी माळा गुंफतात; तसला प्रकार नाटकास नाटक या दृष्टीनें कमीपणा आणणारा आहे. विष्कंभकांत थोडासा कृत्रिमपणाचा अंश असणें अपरिहार्य आहे; पण जसजसा नाट्यकाराच्या बुद्धीचा व कौशल्याचा विकास होतो, तसतसा तो विष्कंभकांत अधिकाधिक स्वाभाविकपणा आणण्याचा प्रयत्न करितो. या दृष्टीनें भवभूतीच्या ' महावीरचरित ' व ' मालतीमाधव ' या नाटकांतील विष्कंभकांची प्रस्तुत नाटकांतील विष्कंभकांशीं तुलना करणें बोधप्रद होणार आहे. उत्तररामचरितांतील सर्वांत उत्तम विष्कंभक चवथ्या अंकाच्या आरंभींचा होय. त्या खालोखाल दुसऱ्या अंकांतील. या विष्कंभकांतील मुख्य प्रशंसनीय भाग म्हणजे आत्रेयीची भूमिका. एकादा गप्पीदास व मिजासखोर विद्यार्थी कीं ज्यानें अभ्यासाकरितां पुस्तक हातीं घेतलें कीं, दिव्याची बत्ती सरळ नाहीं, खोलीच्या ईशान्येच्या कोपऱ्यांत थोडीसी धूळ आहे, आग्नेयीच्या बाजूच्या खिडकींतून कसलासा वास येत आहे या व असल्या असंख्य गोष्टी ज्याचें मन वेधून बिचाऱ्यास अभ्यास म्हणून करूं देत नाहींत; तथापि ज्याच्या मनाचा अनुदारपणा आपण अभ्यास करीत नाहीं म्हणून गुरूजीस अथवा दुसऱ्या कोणास दोष देण्यापावेतों जात नाहीं एवढेंच नव्हे तर आपण बुद्धिमंद असल्याबद्दलची टिमकी स्वतःच वेळीं अवेळीं वाजविण्यामध्यें ज्याला भूषण वाटतें; एखाद्या नवशिक्या विद्यार्थ्यास अथवा चौकस परस्थास शाळेसंबंधी वगैरे सर्व प्रकारची माहिती पुरविण्यामध्यें ज्याचा पहिला नंबर; व सुट्टीमध्यें एकाद्या खेडेगांवीं गेल्यावर तर ज्याच्या वक्तृत्वास एकसारखा पाझर सुटतो—या प्रकारच्या बहुतेक सर्वांच्या परिचयाच्या व्यक्तीची आत्रेयी आठवण करून देते. आत्रेयीच्या भूमिकेचें हें रहस्य लक्षांत आणिलें म्हणजे तिनें आपल्या अध्ययनास आलेलीं म्हणून सांगितलेलीं दोन पोंचट विघ्नें, राजधानींतील बातमी दूरदेशस्थ वासंतीपुढें ओतण्याची दाखविलेली उत्सुकता ( २.७[१], २.७[८], वगैरे ) या सर्व गोष्टींचा बरोबर जम बसतो. अध्ययनार्थ एका गुरूहून दुसऱ्या गुरूकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या या प्रसंगाचें राजशेखर या दहाव्या शतकांतील कवीनें आपल्या ' बालरामायण ' या नाटकांत अनुकरण केलें आहे.

( तदनंतर हातांत उगारलेलें खड्ग घेतलेला पण दयापूर्ण असा राम पुष्पक विमानांतून येतो. )

**राम**—हे माझ्या सव्यहस्ता, मृत झालेल्या ब्राह्मणपुत्राच्या
संजीवनार्थ या शूद्रतपस्व्यावर [निष्ठुर] तरवारीचा
प्रहार कर. भारावलेल्या गर्भामुळें अत्यंत कष्टी
झालेल्या सीतेला ज्यानें दूर केलें त्या या रामा-
चाच तूं झालास तरी अवयव आहेस.[1] त्या तुला
करुणा कोठची ? १०

( मोठ्या कष्टानें प्रहार करून[2] ) तो ब्राह्मणपुत्र आतां तरी सजीव होईल ना ?

३ **एक दिव्य पुरुष** (प्रवेश करून)—महाराजांचा जयजयकार असो!
तूं हातांत दंड धारण करून प्रत्यक्ष यमापासूनही
अभय देण्यास सिद्ध असल्यामुळें हा या क्षणींच
द्विजपुत्र जिवंत झाला व मलाही हें ऐश्वर्य प्राप्त
झालें. मीच तो शंबूक हल्लीं तुजप्रत शिरसा
प्रणाम करीत आहें. सज्जनांच्या हातून आलेला
मृत्युही उद्धार करणारा होतो. ११

**राम**—दोन्ही गोष्टी आम्हांस प्रिय अशाच घडून आल्या आहेत; तर आतां आपल्या उग्र तपश्चरणाचें फल भोगावें.
जेथें आनंदाचें सदैव साम्राज्य आहे व जेथें जन्म
होण्यास थोर पुण्याईच लागते असे ते 'वैराज'
नामक दिव्य लोक तुजप्रत शाश्वत लाधोत.[3] १२

१. बारा वर्षांपूर्वी टाकिलेल्या सीतेचा रामास कसा निदिध्यास लागला होता याची साक्ष पटविण्यास हें एकच वाक्य पुरें आहे.

२. प्रहार करण्यापूर्वी राम बहुधा विमानांतून खालीं उतरत असावा. पृष्ठ १२० टीप १ पहा.

३. या श्लोकांतील प्रथम चरण ऋग्वेद ९·११३·११ याशीं जुळतो. हा वैदिक ध्वनि रामाच्या भाषणांत कवीनें मुद्दाम आणिला आहे. पुढें चवथ्या व पांचव्या अंकांतील जनक, अरुंधती, व लव यांचीं भाषणें पहा.

**शंबूक**—हें ऐश्वर्य प्रभूंच्या पादप्रसादाचेंच फल होय. तपश्चरणानें तें येथें काय केलें ? अथवा माझ्या तपानें मजवर मोठाच अनुग्रह
३ केला म्हणावयाचा. कारण,

तूं सर्व भूतांचा अधिपति. शरणागतांचा तूंच एक आधार. जगांत सर्वत्र तुझा शोध चालला आहे. असा हा तूं एका यःकश्चित् शूद्राचा शोध करीत करीत शेकडों योजनें ओलांडून येथें आला आहेस. हा जर माझ्या तपाचा प्रभाव न म्हणावा तर अयोध्येहून या दंडकेमध्यें[1] आपलें फिरून येणें कसें घडून येतें ? १३ *

**राम**—काय म्हटलें ? ही दंडका ! ( चहूंकडे पाहून ) खरेंच,—
कोठें स्निग्ध आणि श्यामवर्ण, तर कोठें रुक्ष आणि भयानक; ठिकठिकाणीं निर्झरांच्या झंकाररवांनीं दश दिशांना निनादवून सोडणारे; तीर्थें, आश्रम, पर्वत व नद्या यांनीं व्याप्त असलेल्या वनप्रदेशांनीं युक्त, असे तेच हे आम्हांस परिचित असलेले दंडकारण्यांतील निरनिराळे भाग येथें दृग्गोचर होत आहेत. १४

**शंबूक**—होय, ही दंडकाच. असें म्हणतात कीं पूर्वीं येथें असतांनाच प्रभूंनीं—

ते भीमकर्में करणारे चवदा हजार राक्षस आणि त्यांचे ते तिघे पुढारी, खर, दूषण व त्रिशिरस्, यांचा रणांत वध केला.[2] १५

* ज्या सोधावें त्रिभुवनिं जनीं लोकनाथा शरण्या
तो शूद्रातें हुडकित मला पातला या अरण्या ॥
हें पुण्याचें फल न तरि हे लंघुनी योजनातें
येते कैसे सुचरण पुन्हा दंडका ह्या वनातें ॥ १३ ॥

१. दंडकेचा उल्लेख येथें किती सहज व खुबीनें आणिला आहे !
२. श्लोकाचा प्रथम चरण रामायणांत अनेक वेळां आला आहे.

आणि म्हणूनच तर जनस्थानासारख्या सिद्धक्षेत्रामध्यें मजसारख्या भीरु जनांना सुद्धां चहूंकडे अगदीं निर्भयपणें संचार करणें शक्य
३ झालें आहे.

राम—नुसती दंडकाच नव्हे तर खुद्द जनस्थान !

शंबूक—अगदीं रास्त. भूतमात्रांच्या अंगावर भीतीमुळें शहारे आण-
६ णारीं, आणि चंड व मदोत्कट श्वापदकुलांची ज्यांच्या निबिड गिरि-गव्हरांमध्यें वसती आहे, अशीं हीं जनस्थानाच्या लगतचीं अफाट अरण्यें, हीं पहा या दक्षिणेच्या बाजूस लागून गेलीं आहेत. तसेंच,

कांहीं ठिकाणीं अगदीं स्तब्ध व शब्दशून्य तर
कांहीं ठिकाणीं चंड श्वापदांच्या ध्वनींनीं दणाण-
लेले, [ उन्हामध्यें] स्वस्थ झोंप घेणाऱ्या धिप्पाड
व विक्राळ भुजंगांच्या [ प्रखर ] श्वासोच्छ्वासा-
मुळें ज्यांमध्यें वणवे पेटले आहेत, असे हे [ जन-
स्थानाचे ] प्रांतभाग, ज्यांच्या दरीखोऱ्यांमधून
जलाचे अगदीं अपुरे संचय [सूर्यप्रकाशांत] चम-
कत आहेत, व त्यामुळें या तान्हेलेल्या सरडांना
अजगरांचें घर्मजलच प्यावें लागत आहे[1] ! १६

राम[2]—जेथें पूर्वीं खर राक्षसाची वसती होती तें हें जन-
स्थान दृष्टीस पडतांक्षणींच पूर्वीं घडलेला सर्व वृत्तांत
मी आज प्रत्यक्ष अनुभवीत आहेंसें वाटतें. १७

१. याच धर्तीचें वर्णन कालिदासकृत ऋतुसंहारांत (१·१३ ते २१) आलें आहे. वर्णन अतिशयोक्तीचें आहे.

२. हें सर्व भाषण स्वगत असावें, अथवा एकाएकीं रामाचें दुःख एवढें अनावर झालें कीं परकी कोणी आपल्याजवळ आहे याचें त्याला भानही राहिलें नसावें, पण पुढें शंबूकाचें भाषण ऐकतांच मन थाऱ्यावर आणून तो त्यास निरोप देतो. अशीही कल्पना शोभेल.

(चोंहोंकडे न्याहाळून पाहून) माझ्या वैदेहीला वनश्रीची खरोखर केवढी आवड असे ! आणि हींच ना तीं अरण्यें ? ह्या उपर अधिक
३ भयानक तें काय असणार ? (डोळ्यांत आंसवें आणून)—

'मीही पण आपणांसह वनांमध्यें राहीन. वनें किती मधुर व सुगंधित असतात !'—केवळ याच विचारानें तिनें ते दिवस आनंदानें काढिले. तिचें प्रेमच कांहीं तसें होतें. १८ *

परस्परांकरितां कांहीं प्रत्यक्ष करावयासच हवें असें नाहीं. [ केवळ एकमेक जवळ असणें या ] आनंदानेंच सर्व दुःख लयास जातें. ज्याचा जो प्रियजन तो त्याला खरोखर एक अमूल्य ठेवा असतो.[1] १९ §

**शंबूक**—हीं दुर्गम, उद्वेगकारक अरण्यें सोडून देऊन क्षणभर या शांत व गंभीर अशा मध्यवर्ती अरण्यांकडे महानुभावांनीं अवलोकन
३ करावें. यांमधून ठिकठिकाणीं पर्वतांवर मदोत्कट मयूरांच्या कंठाप्रमाणें नाजुक व नीलवर्ण छटा पसरल्या आहेत; अगदीं दाटणीनें लागून गेलेल्या तरुण वृक्षांच्या रांगांनीं आपल्या विपुल व नीळसर[2] छायेनें

* तुम्हांसंगें राहीन ह्या वनांत
मंद शीतळ मधुगंधि वायु ज्यांत ॥
म्हणत होती कीं प्रिया दिवसरात
स्नेह तीच्या तैसाच तो मनांत ॥१८॥

§ जरि कांहीं न करी प्रियजन सौख्यें दुःख दूर करितो कीं ॥
तें त्यास धन विलक्षण जो ज्यास प्रिय असेल जन लोकीं ॥१९॥

१. मूळ संस्कृत श्लोक अगदीं साधे आहेत. त्यांत समास वा अलंकार मुळींच नाहींत. भवभूतीची भाषा जसजसे मनोविकार प्रबळ होतात तसतशी सोपी होत जाते. वीररसाचा प्रकार मात्र उलट होतो. अंक पांचवा पहा.
२. 'नीळसर' छाया. भवभूतीनें सृष्टीचें निरीक्षण सूक्ष्मपणें केलें होतें ह्याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे.

६ यांना शोभिवंत केलें आहे; व निरनिराळ्या हरिणांचे कळप यांमधून निर्भयपणें संचार करीत आहेत. तसेंच,

या येथें नद्या, ज्यांचीं शीतल व निर्मल जलें,
यौवनांत आलेल्या पक्ष्यांनीं [तीरावरील] वानीर
लतांवर गिल्ला केला असतां, [ त्यांपासून गळून
पडणाऱ्या ] पुष्पांमुळें सुगंधित झालेलीं असतात;
व ज्यांचे प्रवाह, पक्व फलांनीं ओथंबिलेल्या
श्यामवर्ण जांभुळींच्या बेटांवरून [ वारंवार ]
खालीं पडणाऱ्या जांभुळांमुळें, एकसारखे बडबड
करीत[1] आहेतसें वाटतें. २०

त्याचप्रमाणें,

येथें गिरिकुहरांतून असलेलीं तरुण आस्वलें जेव्हां
जेव्हां गर्जना करितात तेव्हां तेव्हां तो आवाज प्रति-
ध्वनीमुळें अत्यंत घुमतो. आणि हत्ती शल्लकीच्या
फांद्या मोडून चहूंकडे विखरून टाकितात तेव्हां
त्यांच्या पर्वांपासून होणाऱ्या रसस्त्रावाचा शिशिर,
कटु, व कषाययुक्त गंध [ हत्तींच्या मदस्त्रावाच्या
गंधाशीं मिश्रित होऊन ] वृद्धि पावतो. २१

राम—( आंसवें आंवरून धरून) बाबारे, तुझा मार्ग तुला[2] सुखका-

१. प्रवाह नाहीं, पण शंबूक मात्र निरर्थक बडबड करीत आहे !

२. जनस्थानांतील मध्यमारण्यें शंबूकाच्या पूर्ण परिचयाचीं. त्यांचें वर्णन करितांना रामास तो प्रदेश आपल्यापेक्षां जास्त परिचित आहे, व आपण आपल्या लांबलचक वर्णनानें रामास कंटाळा आणीत आहों याचें त्याला भानही राहिलें नाहीं. थोर लोकांची सुदैवानें गांठ पडली असतां त्यांच्या संगतींत आपला काळ शक्य तितका जास्त घालवावा अशी साहजिक इच्छाही शंबूकास झाली असावी. रामास शेवटीं 'आतां जा' असें त्यास प्रत्यक्ष सांगणें भाग पडलें.

रक होवो. आतां पुण्य लोकांस जाण्याकारणें तूं देवयानांत[1]
३ प्रवेश कर.

**शंबूक**—ठीक. तरी पण प्राचीन ब्रह्मर्षि अगस्त्य यांना अभिवंदन करून नंतरच शाश्वत पदाचा मार्ग सुधारीन म्हणतों. (जातो).

**राम**—तेंच तें हें वन आज मी फिरून पहात आहें,
ज्यामध्यें पूर्वीं कितीतरी दिवस[2] आम्ही वास
करून होतों ! येथें आमची वृत्ति वनेचराची तर
खरीच, तरी पण आम्ही गृहस्थाश्रमी होतों, व
स्वधर्मांत रत असून आम्हीं सर्व प्रकारचें संसार-
सुखही उपभोगिलें. २२
मयूरांच्या केकारवांनीं निनादित असे तेच ते हे
पर्वत. मत्त हरिणांनीं गजबजलेलीं तींच तीं हीं

१. देवयान म्हणजे छांदोग्यबृहदारण्यकादि उपनिषदांतून वर्णिलेला अर्चिरादि मार्ग. यासच पुढें शाश्वत पद म्हटलें आहे. राम या अंकांत आरंभापासून शेवटपर्यंत विमानांतच बसलेला आहे, हें लक्षांत घेतां 'देवयान' ह्याचा 'विमान' असा अर्थ केल्यास उभयतांचें भाषण जास्त सुलभ होणारें आहे. तथापि तरवारीचा प्रहार करण्यापूर्वीं राम विमानांतून खालीं उतरला ही कल्पना कदाचित् जास्त समर्पक होईल.

२. दक्षिणारण्यप्रवेशास आरंभ केल्यानंतर पंचवटीस जाऊन श्रीराम आश्रम बांधून राहिले. याचे दरम्यान १०।१२ वर्षे अधिक ते मध्यंतरींच्या निरनिराळ्या आश्रमांत साधुवृंदाचा पाहुणचार घेत फिरत होते. त्याशिवाय जास्त नवल विशेष कांहीं झालें नाहीं असें वाल्मीकिरामायणांत वर्णन आहे. पंचवटींत प्रवेश करून फार दिवस झाले नाहींत तोंच खरादिक राक्षसांशीं संग्राम व तदनुषंगानें सीताहरण झालें असें वाल्मीकिरामायणावरून दिसतें. उलटपक्षीं पद्मपुराणांत (५·२६९·२२६) श्रीराम पंचवटींत आश्रम बांधून तेथेंच कैक वर्षें राहिले असें आलें आहे. भवभूतीच्या नाटकांतून आलेल्या निरनिराळ्या उल्लेखांवरूनही हेंच अधिक संभवतें. पूर्वींच्या १०।१२ वर्षांमध्यें कोठेंही आश्रम बांधिला नाहीं व अल्पकालाकरितां पंचवटींत मात्र आश्रम बांधिला हा विसंगतपणाही येणें-करून दूर होतो.

वनस्थलें. आणि मनोहर वंजुललता व दाट, नील-
वर्ण निचुलवृक्ष यांनीं व्याप्त अशीं तींच तीं
हीं नदीतीरें. २३

मेघमालेप्रमाणें दिसणारा हा पर्वत जो दुरून
देखील सहज ओळखितां येतो तो हाच तो प्रस्रवण,
ज्याच्या लगत गोदावरीचा प्रवाह आहे. २४

याच गिरीच्या प्रचंड शिखरावर गृध्रराज जटा-
यूचा वास असे, व त्याच्या पायथ्याशीं आमच्या
पर्णकुटींमध्यें आम्हींही सुखानें वसत असूं. ज्या-
मधील गर्द वृक्षांची शोभा गोदावरीच्या [निर्मल]
प्रवाहामध्यें संपूर्ण प्रतिबिंबित झालेली दिसते व
ज्याचा अंतरिक्षभाग पक्ष्यांच्या मधुर किलबिला-
टानें निनादित होई असा तो मनोहर वनप्रदेश
याच ठिकाणीं आहे. २५

आणि ती पंचवटीही येथेंच आहे, ज्या पंचवटींत आम्हीं कैक दिवस
राहिलों व जींतील अनेक स्थळें विस्रंभातिशयामुळें घडून आलेल्या
३ आमच्यांमधील असंख्य बहारीच्या प्रसंगांची अजून साक्ष देऊं शक-
तील. माझ्या प्रियतमेची प्रियसखी वासंतीही पण येथेंच आहे !
हाय हाय ! मला—या रामाला—आज हें असें काय होत आहे ?
६ कारण सांप्रत—

एखादा तीव्र विषरस [आजपावेतों मूर्छित असून]
इतक्या अवधीनंतर मोठ्या वेगानें अंगांत भिनून
जसा प्रसरण पावूं लागावा, अथवा [ मांसांत]
रुतून राहिलेलें ] एकादें बाणाचें शल्य अवाचित
धक्का लागल्यामुळें जसें लसूं लागावें, किंवा व्रणा-
वर वाढलेला एकादा ग्रंथि हृदयाच्या मर्मभागीं
जसा फुटून वाहूं लागावा, तद्वत् हा माझा प्राचीन
[ जणूं काय अनेक आघातामुळें] घनावस्था पाव-

लेला शोक आज मला एकाद्या नवथर शोका-
प्रमाणेंच विकल करूं पहात आहे. २६

कांहीं होवो, ते माझे जुने मित्र—ते वनप्रदेश—अवलोकन करा-
वेतच. ( नीट लक्ष लावून पाहून ) या भूप्रदेशाचे रचनेंत कितीतरी
३ उलटापालट घडून आली आहे ही !

जेथें पूर्वीं नद्यांचे प्रवाह होते तेथें वाळवंटें झालीं
आहेत. झाडी जेथें दाट होती तेथें विरल झाली
आहे व जेथें विरल होती तेथें दाट झाली आहे.
बऱ्याच कालानें पाहिलेलें तेंच हें वन एकादें
दुसरेंच असावेंसें वाटत आहे. पर्वतांची स्थिति
स्थिर असल्यामुळेंच कायतें तेंच हें वन ही बुद्धि
दृढ होते. २७

मीं मुद्दाम तिचें दर्शन टाळण्याचा प्रयत्न केला तरीही पंचवटीविषयीं
माझ्या मनांत असलेला प्रेमा मला बलात्कारानें तिजकडे ओढून नेत
३ आहे यास काय म्हणावें ? ( करुण मुद्रेनें )—

ज्या पंचवटीमध्यें तसे ते दिवस तिजसमागमें मीं
घालविले, फिरून गृहीं परत गेल्यावर जिच्या
संबंधाच्या कधींही न संपणाऱ्या त्या आमच्या
गोष्टी एकमेकांस आम्ही अखंड सांगत असूं, त्याच
या पंचवटीचें, सांप्रत, म्यां एकट्यानें, आपल्या
प्रियतमेच्या नाशास कारण झालेल्या या पापी
रामानें, अवलोकन तरी कसें करावें व तिचें दर्शन
घेतल्याविना तरी कसें परत फिरावें ? २८

**शंबूक** ( प्रवेश करून )—महाराजांचा विजय असो. आपण येथें
सन्निध आलां आहांत हे वर्तमान भगवान् अगस्त्यांस मजकडून सम-
३ जल्यानें त्यांचा आपणांस असा निरोप आहे कीं, अक्षवणाची[१]

१. बाहेरून मनुष्य आला असतां त्यास ओंवाळणें त्याच्यावरून कांहीं उतरून टाकणें वगैरे मंगल विधि.

वगैरे सर्व मंगल सामग्री सिद्ध करून लोपामुद्रा मोठ्या ममतेनें व उत्कंठेनें आपली वाट पहात आहे; व तसेच सर्व महर्षीही. तर
६ आपण आगमनाचा अनुग्रह करावा. नंतर आपल्या वेगवंत पुष्पक विमानांतून आपणांस स्वदेशीं वेळेवर परत जाऊन अश्वमेधार्थ सज्ज होतां येण्यासारखें आहे.[1]

९ **राम**—भगवंताची जशी आज्ञा.

**शंबूक**—तर मग महाराजांनीं या बाजूनें आपलें पुष्पक[2] वळवावें.

**राम**—भगवती पंचवटी ! गुरुजनांच्या आज्ञेनुसार जाणें भाग आहे.
१२ क्षणभर रामाकडून होत असलेल्या तुझ्या या अतिक्रमाबद्दल त्यास क्षमा कर.

**शंबूक**—हें पाहिलें का महाराजांनीं ?—

हा क्रौंचावत पर्वत व त्यावरील हीं अफाट वेळूंचीं बेटें ज्यांमधून [ वाऱ्यामुळें ] गुण् गुण् असा ध्वनि निघत आहे व ज्यांच्या अंतर्भागीं असलेल्या लहानशा घरकुलांतून असंख्य घुबडांचा घूत्कार-शब्द उठला असतांना हीं काककुलें भीतीनें नि-श्शब्द झालीं आहेत. तसेंच उंच तळपत असलेल्या मयूरांच्या कूजनामुळें गांगरून जाऊन ह्या पर्वता-

१. अगस्त्य ऋषि त्रिकालज्ञ होते. तेव्हां अयोध्येची बातमी वासंतीस मुळींच नाहीं व अगस्त्यास सर्व खडानखडा माहिती आहे यामध्यें दिसून येणारा विसंगतपणा हा दोष नाहीं. पुढें ४·१८ व तत्पूर्वीची अरुंधतीचीं भाषणें पहा.

२. पृष्ठ १२० टीप १ पहा. विमान वळविण्यास मनुष्य विमानांतच असावयास नको. पुढें तिसऱ्या अंकाच्या शेवटास पहा. कदाचित् यासंबंधांत निश्चय करितां येत नाहीं यावरून भवभूतीनें ज्या नाटक मंडळीकडे हें नाटक करावयास दिलें त्यांचेजवळ खरोखरीचें विमान नसून सर्व हावभावावरच भागत असेल. मग सर्व अंकभर राम विमानांतच होता कीं काय याचा विचारच करावयास नको.

वरील या पुरातन चंदन वृक्षांच्या स्कंधाभोंवतीं
हे पहा सर्पही विळखे घालीत आहेत.[1] २९

त्याचप्रमाणें—-

हे दक्षिणेकडील इतर पर्वत, ज्यांचीं शिखरें मेघ-
सान्निध्यामुळें नीलवर्ण दिसत आहेत व ज्यांच्या
गुहागव्हरांतून गोदावरीच्या जलाचा गद्गद ध्वनि
निघत आहे. तसेच हे अगाध सरितांचे पावन
संगम, जे एकमेकांवर लागोपाट बेफाम आदळ-
णाऱ्या प्रचंड लाटांतून उठणाऱ्या कल्होळानें उचं-
बळून गेले आहेत. ३० *

( उभयतां जातात. )

## महाकविश्रीभवभूतिप्रणीत उत्तररामचरित नाटकाचा पंचवटीप्रवेश नामक अंक दुसरा[2] समाप्त.

* ज्यांचे गुहांत रव गद्गग फार होती
गोदाप्रवाह बहु ज्यावर वाहताती ॥
शृंगाग्रभाग अवलंबिति मेघ ज्यांचे
ते हे पहा सकल पर्वत दक्षिणेचे ॥३३॥
अन्योन्य भेटी घडतां जयांच्या
कल्लोळमाळा उठती जळांच्या ॥
प्रवाह गंभीर पवित्र ज्यांचे
पहा महासंगम हे नद्यांचे ॥ ३४॥

१. सारांश, कावळे जसे घुबडांस भितात तसे सर्प मोरांस भितात. शंबूकास वर्णन करण्याचा जसा कांहीं कंटाळाच येत नाहीं !

२. प्रस्तुत नाटकाचें अंतिम साध्य म्हणजे वियुक्त राम व सीता यांची पुनश्च भेट करून देणें. परंतु उभयतांची नुसती भेट होऊन उपयोग नाहीं. परित्यागामुळें सीतेच्या मनास झालेली जखम अगोदर पूर्णपणें भरून आली पाहिजे. तसें न झाल्यास त्यांची भेट होऊन न होऊन सारखीच. उत्तरराम-चरिताचे स्थूलमानानें तीन भाग करितां येतील. पहिल्या अंकाचे शेवटीं

राम व सीता यांचा वियोग घडून येतो. तिसऱ्या अंकाचे शेवटीं उभय तांचे मानसिक ऐक्य होतें. सातव्या अंकाच्या शेवटीं सर्वत्रांच्या समक्ष गांठी पडून सर्व दुःखांचें निवारण होतें.

पहिल्या अंकामध्यें व इतर नाटकामध्यें पूर्ण बारा वर्षांचें अंतर आहे. या अवधींत घडून आलेल्या गोष्टी दुसऱ्या अंकाच्या विष्कंभकांत नमूद झाल्या आहेतच. दुसऱ्या अंकाच्या उरलेल्या भागाचें कार्य रामास पंचवटींत आणून तिसऱ्या अंकाची पूर्व तयारी करणें. दुष्यंत व शकुंतला यांची पुनर्भेट करण्यास कालिदासानें ज्याप्रमाणें भूमीवरील, वसंतऋतूच्या अमदानींतील, व 'तपश्चरणास मूर्तिमंत विघ्न' अशा मदोन्मत्त गजानें व्यापिलेली तपोवनभूमि न घेतां, भूतलापासून दूरवर असलेलें, सर्व ऐहिक मनोविकारांपासून पूर्णपणें अलिप्त, असें एक स्वर्गीय आश्रमपद घेतलें आहे, त्याचप्रमाणें सीतेच्या मनांत आलेलें कालुष्य घालविण्याकरितां भवभूतीनेंही ' जींतील अनेक स्थळें विस्रंभातिशयामुळें घडून आलेल्या आमच्यांमधील असंख्य बहारीच्या प्रसंगांची अजून साक्ष देऊं शकतील ' अशा पंचवटीचीच समर्पक निवड केली आहे यांत संशय नाहीं.

बारा वर्षांचा अवधि कांहीं लहानसहान नव्हे. मध्यंतरीं असा खंड असलेल्या नाटकामध्यें संविधानकाचें ऐक्य ठेवणें हें काम दुरापास्त आहे. प्रत्यक्ष शेक्सपीअरलाही हें पूर्णपणें साध्य झालें नाहीं. उदाहरणार्थ ' The-Winter's Tale' पहा. त्या मानानें भवभूतीला येथें बरेंच यश आलें आहे. प्रथमतः बारा वर्षांच्या अवधीची जाणीव देण्याकरितां भवभूतीनें काय काय उपाय योजिले आहेत ते पहा. या बारा वर्षांत अनेक स्थित्यंतरें घडून आलीं आहेत. सृष्टींत विलक्षण उलटापालट झाली आहे ( २·२६[३] ). गजाचे लहान छावक, मोरांचीं चिमुकलीं पिल्लें, ऐन ज्वानींत आलीं आहेत ( ३·६,३·१९ व २० ), लहान रोपट्यांचे मोठे वृक्ष झाले आहेत (३·२१); सारांश चहूंकडे वाढझड सुरू आहे. मानवी सृष्टींत सुद्धां अनेक फेरफार घडून आले आहेत. लवणराक्षसाचा वध करून शत्रुघ्नानें मथुरेचें नवीन राज्य वसविलें आहे (अंक १ व ७, शेवट); जनकानें राज्यत्याग करून वानप्रस्थाश्रम घेतला आहे( अंक ४, विष्कंभक); ऋष्यशृंगाचें द्वादश वार्षिक सत्र संपलें आहे ( २·६[१५]); व लक्ष्मणादिकांस पुत्र होऊन ते कर्तेसवरते झाले आहेत. पण नुसत्या स्थित्यंतरानें नाटकाच्या पूर्वखंडांत व उत्तरखंडांत ऐक्य कसें येणार ? त्याकरितां कांहींतरी गोष्टी अचल ठेवाव्या लागतात. पंचवटींतील पर्वत अद्यापि अचल आहेत

( २·२७च ); जनस्थानांतील हरिणें व इतर प्राणी अजून सीतेचें स्मरण करीत आहेत (३·२२); राजधानींत अनेक कार्यांनीं व्यापृत असला तरी राम मनानें निरंतर सीतेचा ध्यास करीत आहे ( मागें पृष्ठ १०४ पहा ); व सर्वांत मुख्य म्हणजे रघुकुलाचे अभिवृध्द्यर्थ अक्षय झटणाऱ्या पृथ्वीभागीरथ्यादि देवता व वसिष्ठारुंधत्यादि महर्षी यांचे अपेक्षित कार्याबद्दल एकसारखे प्रयत्न सुरूं आहेत.

या पूर्व तयारीनंतर तिसऱ्या अंकानें काय कार्य साध्य व्हावयाचें आहे तें आतां आपण पाहूं या.

# अंक तिसरा

( तदनंतर दोन नद्या प्रवेश करितात. )

**पहिली**—सखि, मुरले ! अशा गडबडीनेंशी कोणीकडे ?

३ **मुरला**—भगवति तमसे, अगस्त्यऋषींची पत्नी—लोपामुद्रा—इनें मला महानदी गोदावरीकडे जाण्यास सांगितलें आहे. [ गोदावरीस] कळवावयाचा निरोप असा आहे कीं, " गोदावरी, तुला माहीतच

६ आहे आमच्या सूनबाई सीतेचा त्याग केल्या दिवसापासून—

आंतून जरी अनिवार दुःखाचे कढ येत आहेत
तरी त्याचें मन खंबीर असल्यानें तें तो बाहेर
मुळींच उमटूं देत नाहीं; व यामुळें रामाचा करुण
रस पुटयंत्रांत घातलेल्या औषधीप्रमाणें [ एक-
सारखा आंच घेत ] आहे. १

तसेंच जिच्यावर त्याचें तें तसलें प्रेम तिजवर आलेल्या या अशा संकटामुळें उद्भवलेला व दिवसें दिवस वृद्धिंगत होत असणारा, हा

३ त्याचा दीर्घ शोक, यानें तर माझा रामभद्र अगदींच वाळून गेला आहे. तो इतका कीं त्याला पाहिलें म्हणजे माझ्या हृदयास धक्का बसून तें समूळ कंपित होतें. आतां तर रामभद्र परत येथें आला

६ आहे तेव्हां पंचवटीच्या वनांत वधूसह वास करीत असतांना घडून आलेल्या प्रेम प्रसंगांची खूण पटविणारीं तेथील तीं अनेक स्थळें तो अवश्य पाहणारच. व तो जात्या जरी खंबीर मनाचा आहे तरी

९ अशा स्थळीं व अशा स्थितींत त्याच्या अंतर्गत शोकसागराचा आवेग अनावर होऊन त्याजवर पदोपदीं काळजी करण्यासारखे प्रसंग येतील अशी भीति वाटणें साहजिक आहे. करितां, हे भगवती

१२ गोदावरी, तूं त्या त्या वेळीं सावध रहा.

१. वैद्यलोक अग्निपुट देण्याकरितां औषधी कुपिस्थ करून आटवितात तो प्रकार प्रसिद्धच आहे.

तुझ्या प्रवाहावरून वाहत येणाऱ्या व [ अत-
एव ] जलकणांनीं सुशीतल आणि [ तुझ्या ]
कमळपरागांचा सुगंध चोहोंकडे पसरविणाऱ्या
अशा वाऱ्यांच्या साहाय्यानें तूं, रामभद्राचा शोक
विकोपास गेलाच तर, त्याचें युक्तिप्रयुक्तीनें
सांत्वन कर. " २

**तमसा**—[ भगवती लोपामुद्रेचें रामभद्रावर ] प्रेमच तसें आहे, तेव्हां त्याच्याबद्दल तिनें ही कळकळ दाखविणें उचितच आहे.
३ परंतु रामभद्राचा अगदीं निर्वाणींचा जो संजीवनोपाय तोच आज येथें जातीनें हजर आहे.

**मुरला**—तें कसें काय ?

६ **तमसा**—ऐक. तुला कदाचित् माहित नसेल कीं आसन्नप्रसव देवी सीतेस वाल्मीकिऋषीच्या तपोवनासन्निध सोडून देऊन लक्ष्मण परत गेल्यावर तिनें त्या वेदना व तो शोकाचा भार असह्य झाल्यामुळें
९ एकदम गंगेच्या प्रवाहांत उडी घेतली. तत्क्षणींच तेथें ती दोन पुत्र प्रसविली. भगवती पृथ्वी व भागीरथी यांनीं तिचें सांत्वन करून तिला आपल्याबरोबर रसातलीं नेलें. नंतर त्या मुलांचें स्तनपान
१२ सुटल्यावर त्या दोघांनाही गंगादेवीनें स्वतः नेऊन महर्षि वरुणपुत्राच्या [वाल्मीकीच्या ] स्वाधीन केलें.

**मुरला** ( विस्मयानें )—

अशा [ थोर ] सत्पुरुषांचा विपत्तिसमयही परम
आश्चर्यकारक होतो; कारण अशा [ ऋषि
देवतादिक श्रेष्ठ ] विभूतीही प्रसंगीं त्यांस साहाय्य
करितात. ३

**तमसा**—आतां हल्लीं या शंबूकप्रकरणामुळें बहुधा रामभद्र जनस्थानांत जाण्याचा संभव आहे असें शरयूच्या[1] तोंडून ऐकल्यावर

१. शरयूनदीच्या तीरीं अयोध्या वसली असल्यामुळें राजधानींतील वृत्त तिला सहजच समजलें व तें तिनें भागीरथीस निवेदन केलें. शरयू भागीरथीस अयोध्येपासून थोड्या अंतरावर मिळते.

३ स्नेहामुळें भगवती लोपामुद्रेस जी आशंका वाटली तीच आशंका घेऊन, भगवती भागीरथी सीतेसहवर्तमान एका ग्रहाचाराचें निमित्त करून गोदावरीस भेटण्याकरितां येथें आली आहे.[1]

६ **मुरला**—हा भगवती [ भागीरथीचा ] विचार योग्य आहे. रामभद्र राजधानींतच असला म्हणजे लोककल्याणाच्या हरएक कार्यांत त्याचें मन गुंतून जाऊन त्यास त्या द्वारें थोडीबहुत करमणूक करून घेतां येणें
९ शक्य आहे;[2] परंतु तसा व्याप मागें नसतांना आतां जो हा त्यानें, केवळ शोकाचीच सोबत घेऊन, पंचवटींत प्रवेश केला तो एक महान् अनर्थच म्हणावयाचा. पण मी म्हणत्यें झाल्यासवरल्या गोष्टी लक्षांत
१२ घेतल्या म्हणजे आतां सीतादेवीस रामभद्राचें सांत्वन तें कसें करितां येईल ?

**तमसा**—भगवती भागीरथींनें [सीता देवीस] सांगितलें आहे––" बाळे,
१५ देवांच्या यज्ञभूमींतून उत्पन्न होणारे हे सीते, तुला स्मरण आहेच कीं आज चिरंजीव कुशलवांच्या वाढदिवसाप्रीत्यर्थ बारावी सूत्रगांठ मारावयाचें[3] मंगल कृत्य करणें आहे. तेव्हां तूं आज आपल्या पुराण
१८ श्वशुरास —या सर्व मानव[4] राजर्षिवंशाच्या आदिपुरुषास—सर्व

१. भवभूतीनें हा गंगागोदावरींचा समागम देवतारूपानेंच केवळ नसून नदीरूपानें सुद्धां कल्पिला असावा असें मला वाटतें; व हा समागम म्हणजे 'पंचवटीस ( नाशिकास ? ) गंगा येणें' यासारखाच एकादा सृष्टिचमत्कार असावा. निदान असल्या चमत्कारामुळेंच प्रस्तुत अंकाच्या स्थलपात्रादिकांची कल्पना कवीस सुचली असावी.

२. मूळाचा दुसरा अर्थ असा करितां येईल—' हरएक कार्यांत त्याचें मन गुंतून राहिल्यानें त्यास आपल्या दुःखाचा थोडाबहुत विसर पडणें शक्य आहे.'

३. मूल उपजतांच माता त्याच्या गळ्यामध्यें ( अथवा स्वतःच्या हातामध्यें ) एक सूत्र बांधून दर वाढदिवसास त्यास एक एक गांठ मारिते. अशा प्रकारची वाढदिवस साजरा करण्याची ही जुनी रीत असावी.

४. मनूपासून उत्पन्न झालेल्या.

पापांचें निरसन करणाऱ्या देव सवित्यास—स्वहस्तानें पुष्पें वेंचून तीं अर्पण कर.[१] या कार्याकरितां भूपृष्ठावर संचार करित असतांना[२] २१तूं आमच्या प्रभावानें देवतांच्या सुद्धां दृष्टीस पडणार नाहींस, मग मनुष्यांच्या[३] तर राहोच." [ गंगादेवींनीं ] मलाही आज्ञा केली— " तमसे, आमच्या सूनबाईचा—बाळे जानकीचा—तुजवर अगोदर-२४पासूनच पुष्कळ लोभ जडला आहे. तेव्हां तूंच हिच्या बरोबर अस." ही आज्ञा मीं आतां पार पाडावयास निघाल्यें आहें.

**मुरला**—आणि मीहि हा वृत्तांत भगवती लोपामुद्रेस जाऊन निवेदन २७करित्यें. रामभद्र सुद्धां हा आलाच असें वाटतें.

**तमसा**—आणि ही पहा गोदावरीच्या डोहांतून बाहेर निघून—

कृश आणि पांडुर अशा गालांमुळें जिच्या
मुखास विशेष शोभा आली आहे व जिची

१. यावरून पूर्वींच्या वाढदिवसांच्या प्रसंगीं सीतेनें जरी कुळाचाराप्रमाणें सवित्याची पूजा केली असली तरी तिला दुसऱ्या कोणीतरी—तमसेनें—पुष्पें आणून दिलीं होतीं, व बारावा वाढदिवस विशेष महत्त्वाचा असल्यामुळें आज सीता स्वतः फुलें वेंचून पूजा करणार होती असें अनुमान निघतें.

२. सीता रसातलीं ( पृथ्वीच्या उदरीं अथवा पातालांत ) राहिली होती हें वर ( ३·२[१०] ) सांगितलेंच आहे. भागीरथी स्वर्ग, मृत्यु, व पाताळ या तीन्ही लोकांमध्यें आहे हें प्रसिद्धच आहे. रसातलाहून सीतेला बरोबर घेऊन भागीरथीनें जी वर उसळी घेतली ती एकदम ती पंचवटींतच प्राप्त झाली असें समजावयाचें. पंचवटी कोठें आहे याबद्दल अद्यापि निश्चित मत झालें नसल्यामुळें ह्या विषयाची येथें विशेष चर्चा करण्याचें प्रयोजन नाहीं.

३. उत्तररामचरितामध्यें रामाची भूमिका त्यास पूर्णांशानें मनुष्य कल्पून भवभूतीनें सजविली आहे. त्यांत दैवी अंश नाहीं. या विरुद्ध महावीरचरित ४·६०,७·२, वगैरे पहा.

वेणी अस्ताव्यस्त झाली आहे[1] अशी जानकी—
जणूं काय करुणरसाची मूर्ति अथवा [ मानवी ]
शरीर धारण करणारी प्रत्यक्ष विरहव्यथाच,—
ही पहा [पंचवटी] वनांत प्रवेश करीत आहे. ४

**मुरला**—हो, हीच ती.

हृदयरूपी कुसुमास करपवून टाकणारा हा दीर्घ
व दारुण शोक, बंधनापासून गळून पडलेल्या ए-
काद्या कोमल किसलयाप्रमाणें कृश व कोमेजलेल्या
हिच्या ह्या शरीरास, ज्याप्रमाणें शरत्कालीन उष्णता
केतकीपुष्पाच्या अंतर्गत पाकळ्यांस ग्लानि आणिते
त्याप्रमाणें, ग्लानी आणित आहे. ९ *

( उभयतां चार पावलें चालून [ भिन्न दिशांनीं ] निघून जातात. )

## विष्कंभक[2]

* नवपल्लवकोमल अंग असे
हृदयीं अतिदारुण शोक वसे ॥
सुकवी परिपांडु शरीर तिचें
शरदर्क जसा दल केतकिचें ॥ ६ ॥

१. पतीच्या विरहामध्यें पत्नीनें 'एकवेणीधर' असावें असा नियम आहे. 'एक-वेणीधर' ह्याचा अर्थ पतीच्या प्रयाणाच्या दिवशीं जी वेणी घातली ती, केशांस नंतर केव्हांही संस्कार न करितां, तशीच पुनः पतिसमागम होई-तों कायम ठेवणें असा कित्येक करितात. परंतु एकवेणीधर म्हणजे एक पेडाची वेणी अथवा बुचडा बांधणें, नेहमींप्रमाणें तीन अथवा पांच पेडांची न घालणें, हा अर्थ नाट्यशास्त्रास संमत दिसतो. भरताचें नाट्य-शास्त्र अध्याय २१ श्लोक ४५–४९ पहा.

२. ह्या विष्कंभकासंबंधानें विचार करण्याची पाहिली गोष्ट म्हणजे नद्यांचा (अथवा नदीदेवतांचा ) पात्राप्रमाणें उपयोग. स्थावर जंगम सर्व भूतमात्रांस आत्मा आहे हें हिंदुधर्मास परिचित असलेलें मत ध्यानांत आणिलें म्हणजे यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं. भवभूतीनें या भिन्न भिन्न ठिका-णच्या नद्यांना एकत्र आणण्याच्या प्रयत्नास स्वाभाविकपणा कोणत्या

प्रकारानें आणिला आहे हें वर पृष्ठ १२८ टीप १, पृष्ठ १२९ टीप १व पृष्ठ १३० टीप २ यावरून व्यक्त होईलच. भवभूतीची ही कृति प्रसन्नराघव अंक ५ च्या विष्कंभकामध्यें, सागर ( बंगालचा उपसागर) व त्यास मिळणाऱ्या भागीरथीपासून कावेरीपर्यंतच्या क्रमाक्रमानें सर्व प्रमुख नद्या यांच्या संभाषणरूपानें, जयदेवकवीनें पूर्णपणें अमलांत आणिली आहे. मुरला ही ' पंचवटी 'जवळच गोदावरीस मिळणारी एकादी नदी असावी. तमसेच्या तीरीं वाल्मीकीचा आश्रम होता हें प्रासिद्धच आहे. मागें २·४[५] पहा.

बारा वर्षांच्या विरहानंतर सीतेची व रामाची पंचवटींत कोणत्या परिस्थितींत गांठ पडावयाची याचें दिग्दर्शन या विष्कंभकानें केलें आहे. जेथें उभयतांनीं आयुष्यांतील कैक वर्षें सुखानें काढिलीं, व ज्या स्थळींची प्रत्येक वस्तु 'विस्रंभातिशयामुळें घडून आलेल्या आमच्यांमधील अनेकविध बहारीच्या प्रेमप्रसंगांची अद्याप साक्ष देऊं शकेल' अशा पंचवटीची वियुक्त पतिपत्नींच्या समागमास व त्यांच्या मनाचा मिलाफ होण्यास भवभूतीनें जी ही योजना केली आहे ती फारच योग्य झाली आहे. पत्नीचा त्याग केल्यानंतर शंबूकाच्या वधाकारितां राम पुनः एकवार पंचवटींत गेले ह्या प्रसंगाचा रामायण उत्तरकांडामध्यें (सर्ग ७४·८२) व पद्मपुराणामध्येंही ( ५·३५·२६ वगैरे ) उल्लेख आला आहे, पण 'पंचवटीप्रवेशाची' काव्यदृष्ट्या केवढी महती आहे याची खरी जाणीव भवभूतीसच प्रथम झाली असावीसें वाटतें. दुष्यंत आणि शकुंतला यांची विरहोत्तर गांठ पडण्यास मारीच ऋषीच्या शांत व स्वर्गीय अशा तपोवनाची निवडणूक करण्यांत कालिदासानें जें औचित्य व नाट्यनैपुण्य दाखविलें आहे तेंच येथें भवभूतीनें प्रकट केलें आहे.

सातव्या अंकामध्यें सीतेची प्रत्यक्ष गांठ पडून सीतेचा रामानें पुनः स्वीकार केला आहे; पण त्या पूर्वीं रामाविषयीं सीतेच्या मनांत उत्पन्न झालेला सकारण रोष नाहींसा होऊन 'परित्यागरूपी शल्य' दूर झालें असलें पाहिजे, हें उघड आहे. व हें मानसिक ऐक्य घडवून आणण्याचा या अंकाचा प्रधान उद्देश आहे हें मागें सांगितलेंच आहे. परंतु एकादा न्यायाधीश अथवा वकील घडून आलेल्या अपराधाची भरपाई करून घेण्यांत ज्या प्रकारचें न्यायनैष्ठुर्य दाखवितो त्या प्रकारचें वर्तन सीतेच्या हातून घडवून न आणण्याची भवभूतीनें खबरदारी ठेविली आहे हें त्यास खरोखर भूषणावह आहे. सीता जी पंचवटींत आली ती तेथें रामाचा जाब घ्यावा ह्या हेतूनें मुळींच आली नव्हती. किंबहुना रामाची

येथें आपणास गांठ पडेल ही कल्पनाही तिचे मनास शिवली नाहीं. मला वाटतें आपण पंचवटीस जाणार आहों हें सुद्धां त्या बिचारीस प्रत्यक्ष पंचवटींत येऊन पोहोंचण्यापूर्वीं ठाऊक नसावें. रामाची समक्ष गांठ पडल्यावर तिचें वर्तन एकाद्या खऱ्या आर्यपत्नीस शोभेसें कसें घडून आलें याचें विवरण पुढें होईलच. तूर्त प्रस्तुत विष्कंभकानें साधलेला मुद्दा हा कीं पंचवटींतील निरनिराळ्या प्रियवस्तूंच्या दर्शनानें रामाच्या मनाची जी चलबिचल झाली व त्याच्या तोंडून जे शोकाचे उद्गार बाहेर पडले ते त्याच्या न कळत सीतेच्या कानीं पडावेत. असें करण्याकरितां सीतेस पंचवटींत अदृश्यरूपानें ठेवणें अर्थात् जरूर होतें; व तें कसें शक्य झालें तें वर ( $३·३^{१४-२२}$ ) सांगितलें आहेच. योगाच्या बलानें ( योगसूत्र ३।२१ पहा ) अथवा देवतादिकांच्या वरप्रसादानें मनुष्यास अदृश्यरूपानें रहातां येतें ही गोष्ट प्रसिद्धच आहे. व या युक्तीचा नाट्यदृष्टया उपयोग भास ( अविमारक अंक ३ ), कालिदास ( शाकुंतल अंक ६, आणि विक्रमोर्वशीय अंक ३ ), इत्यादि कवींनीं केला आहे.

मुख्य प्रश्न हा आहे कीं अशा प्रकारच्या योजनेमुळें जो नाटकावर अस्वाभाविकपणाचा दोष येतो त्याची वाट काय ? प्रेक्षकांस सीता व राम दोघेही सारखेच दिसत आहेत. सीता रामाच्या सन्निध उभी आहे व ती त्यास मूर्छना आली असतां स्पर्श करून सावधही करिते; इतकेंच नव्हे तर राम सीतेचा हातही आपल्या हातांत धरितो. सीता व राम यांचीं कित्येक भाषणें परस्परांस उत्तरप्रत्युत्तरादाखल असल्याचा केव्हां केव्हां ( उदाहरणार्थ $३·२९^{१}$, $३·४६^{११}$, वगैरे ) भास होतो; व राम व वासंती यांच्यामधील संभाषणास सीता व तमसा यांच्यामधील कांहीं कांहीं प्रसंगीं बराच वेळ टिकणाऱ्या ( उदाहरणार्थ संस्कृत मूळ $३·१२^{७-१२}$, $३·१२^{१४-२०}$, $३·१२^{२}$ ते ३·१३, $३·१४^{१-५}$, $३·१५^{१४-१८}$ $३·१७^{१}$ ते ३·१८, $३·२२^{२-१०}$, $३·२३^{१}$ ते ३·२४, $३·२९^{३}$ ते ३·३१, $३·३४^{१}$ ते ३·३५, $३·३७^{१-३}$, $३·३८^{१-३}$, $३·३९^{५-१०}$, $३·४०^{८-१२}$, $३·४२^{१}$ ते $३·४३^{४}$, $३·४६^{४-९}$, $३·४६^{१७-२२}$, $३·४६^{२५}$ ते ३·४८ इत्यादि) संभाषणांनीं मधून मधून अडथळा येणेंही शक्य आहे. या सर्व नाटक या दृष्टीनें असंभाव्य अशा प्रसंगांबद्दल कवीस जबाबदार धरणें साहजिक आहे हें खरें, तरी असा सृष्टिनियमांचा खून भवभूतीनेंच केला आहे असें नाहीं. भासकालिदासादिक संस्कृत कवी तर राहोच. शेक्सपीअरच्या The Winter's Tale या नाटकामध्येंही असाच प्रकार झाला

आहे. राम वासंतीस आपलें हृद्गत उघडें करून दाखवीत असतांना सीता अदृश्यरूपानें जवळ उभी असून तें भाषण ऐकते असा प्रकार ज्या हेतूनें भवभूतीनें कल्पिला आहे तोच हेतु साधण्याकरितां वरील नाटकांत शेक्सपीयरनें जिवंत नायिकेसच पाषाणप्रतिमा बनवून तिजपुढें नायक गतापराधाबद्दल पश्चाताप प्रकट करितो असा प्रसंग आणिला आहे. असल्या प्रसंगाबद्दल दोघांही कवींवर दोषारोप करण्यापूर्वीं या अस्वाभाविकतेसच स्वाभाविकपणा देण्याचा नाट्यकारानें प्रयत्न केला आहे किंवा कसें, व केला असल्यास तो कितपत सिद्धीस गेला आहे याची नीट चौकशी केली पाहिजे. शेक्सपीयरनें या बाबतींत काय केलें आहे याचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. भवभूतीनें जें कांहीं केलें आहे तें हें.

भवभूतीनें राम, सीता, व पंचवटी यांचा संबंध इतका निकटचा दाखविला आहे कीं पंचवटींत गेल्यावर रामास सीतेची ( ३·१[५–११] पहा ) व सीतेस रामाची ( ६·६[३] पहा ) आठवण ही हटकून व्हावयाचीच. त्यांतल्या त्यांत कवीनें रामाच्या भूमिकेमध्यें मानसिक सृष्टिचें एवढें प्राबल्य दाखविलें आहे, त्याचें सीतेबद्दलचें प्रेम व सीतात्यागानंतर त्यास तिजविषयीं लागलेला निदिध्यास, याचें वर ( पृष्ठ ११५, टीप १ ) दर्शविल्याप्रमाणें, इतकें स्पष्ट चित्र रेखाटलें आहे कीं त्यास पंचवटीमध्यें ठायीं ठायीं सीतेच्या मूर्ती दिसाव्यात यांत नवल वाटण्याजोगें कांहीं नाहीं. या दृष्टीनें पुढें अंक ६·३८ मधील रामाचे उद्गार लक्षांत घेण्याजोगे आहेत. तसेंच संस्कृत मूळ ३·१४[६], ३·३८[४] ३·४३[१२–१४], इत्यादि संभाषणेंही पहावीत.

येथपावेतों प्रेक्षकांस सीता जशी समक्ष दिसते तशी ती रामासही प्रत्यक्ष कशी दिसत होती—कल्पनेच्या प्राबल्यामुळें त्यास तिला समक्ष पाहिल्याचा भास कसा होत होता—व त्यामुळें या अस्वाभाविक प्रसंगासच भवभूतीनें स्वाभाविकतेचें रूप देण्याचा कसा प्रयत्न केला हें दर्शविलें. मात्र रामाचे हे सर्व कल्पनातरंग आहेत हें प्रेक्षकांच्या स्मरणांतून जाऊं नये याकरितां जेथें जेथें राम व सीता यांचीं उत्तरप्रत्युत्तरें कल्पनासृष्टीची मर्यादा ओलांडितात असें प्रेक्षकांस वाटण्याचा संभव आहे तेथें तेथें भवभूतीनें प्रेक्षकांचें मन वस्तुस्थितीकडे मुद्दाम ओढण्याचा प्रयत्न केला आहे. यास प्रत्यंतर ३·१२[११], ३·१५[१६–१७], ३·२९[२], ३·४३[५], इत्यादि स्थळें पहा.

३ **पडद्यांतून**—काय हा अनर्थ, काय हा अनर्थ !
( तदनंतर फुलें वेंचण्यांत गढून गेलेल्या व कारुण्यानें व उत्कंठेनें
कान देऊन ऐकणाऱ्या सीतेचा प्रवेश. )

६ **सीता**—अगबाई ! मला वाटतें हा माझ्या प्रियसखी वासंतीचा शब्द!
**पडद्यांतून**—देवी सीतेनें कोमल शल्लकींचे पल्लव आपल्या
हातांनीं गोळा करून लालसेनें पुढें पुढें करणाऱ्या
ज्या हत्तीच्या छाव्यास एकेकाळीं चारिलें होतें;—

**सीता**—मग त्याचें काय ?
पुनः **पडद्यांतून**—स्वस्त्रीसह तो पाण्यामध्यें क्रीडा
करीत असतांना दुसरा एक उद्दाम गजपति त्या-
वर आवेशानें चाल करून येत आहे. ६

त्याचप्रमाणें सीता व तमसा यांचीं कांहींकाळ पावेतों चालणारीं परस्पर संभाषणें व सीतेचीं ४।५ ओळींहून अधिक अशीं आत्मगत भाषणें भवभूतीनें प्रायशः अशा स्थळीं योजिलीं आहेत कीं त्या वेळीं राम [ व वासंती ] एकाद्या अन्य व्यवसायामध्यें व्यापृत असावेत. असे व्यवसाय म्हणजे सीतेच्या शोधार्थ चहूंकडे पाहणें (३·१२[७–१२]), शोकार्त होणें ( ३·१२[२१] वगैरे), एका स्थळाहून दुसऱ्या स्थळास जाणें (३·१५[१३] ), एकाद्या वस्तूकडे न्याहाळून पहात असणें ( ३·१७ व ३·१८ यांचे दरम्यान ), रोदन करणें (३·२२ व ३·२५ व तसेंच ३·२९ व ३·३१ यांचे दरम्यान ), विचारांत मग्न असणें ( ३·३४ ते ३·३५[१] ), मूर्छना येऊन पडणें ( ३·३९ ते ३·४० ), सानंदाश्चर्यानें परवश होणें (३·४०[८] वगैरे ), खिन्न होणें ( ३·४२ ते ३·४३[५] ), इत्यादि होत; व अभिनयकुशल नटाकडून त्या त्या स्थळीं तो तो हावभाव केला गेल्यास, एरवीं राम आणि वासंती यांच्या संभाषणास अडथळा करितातशीं वाटणारीं हीं सीतातमसांची संभाषणें स्वाभाविक घडून येणारीं आहेत असा प्रेक्षकांचा ग्रह होण्यास अडचण पडूं नये. भवभूतीनें प्रस्तुत नाटक रंगभूमीवरील नटवर्गास अनुलक्षून व त्यांची सोय लक्षांत घेऊन केलें आहे या विधानास पुष्टी देणारीं जीं अनेक प्रमाणें या नाटकांत आहेत व ज्यांचा प्रसंगोपात्त उल्लेख केला जाईल त्यांपैकीं हें एक लहानसें प्रमाणच होय. असो. सीतेनें पंचवटींत प्रवेश केल्यास बराच अवधि झाला. पुढें तिचें काय झालें व रामाची व तिची गांठ कशी पडली हें आतां पाहूं या.

**सीता** ( गडबडीनें कांहीं पावलें चालून )— आर्यपुत्रा ! त्या माझ्या [ मानिलेल्या ] पुत्राचें रक्षण करा. ( स्मरल्यासारखें करून, विषा-
३ दानें. ) हाय हाय ! तेच चिरपरिचित शब्द या पंचवटीच्या दर्शनानें मज मंदभागिनीच्या ओंठावर [ वारंवार ] येत आहेत ! हा आर्यपुत्रा ! ( मूर्छित होते. )

६ **तमसा** ( प्रवेश करून )—वत्से, सावध हो सावध हो.

**पडद्यांतून**—विमानश्रेष्ठा, येथेंच थांबावें.[1]

**सीता** ( सावध होऊन, आनंदानें कंपित अशा स्वरानें )—अग-
९ बाई ! एकाद्या जलानें ओथंबिलेल्या मेघाच्या हलवून सोडणाऱ्या गर्जनेप्रमाणें गंभीर व मांसल असा हा शब्दध्वनि कोठून बरें आला असावा, कीं जो माझ्या कर्णरंध्रावर आदळतांच मज मंदभागिनीमध्यें
१२सुद्धां [ अपूर्व ] उत्साह उत्पन्न करीत आहे ?

**तमसा** ( किंचित् स्मित करून, व खिन्न स्वरानें )—बाळे, सीते !

स्पष्ट ऐकूं न येणाऱ्या व कोठून तरी उत्पन्न
झालेल्या या शब्दध्वनीनें—घनगर्जनेनें जशी
एकादी मयूरी तशी—तूं चकित आणि उत्कंठित
झालीस हें काय ? ७

**सीता**—भगवतींनीं काय म्हटलें ? स्पष्ट ऐकूं न येणाऱ्या ! मीं तर स्वरसंदर्भावरून खास ओळखिलें कीं हे शब्द आर्यपुत्रांचेच.

३ **तमसा**—शक्य आहे. एका तप करणाऱ्या शूद्रमुनीच्या पारिपत्यार्थ इक्ष्वाकुकुलोद्भव राजा [राम] जनस्थानांत आला आहे असें ऐकितों.

**सीता**—तो—तो राजा[2] इतक्या उत्तम प्रकारें राजधर्म पाळितो ही
६ आनंदाची गोष्ट आहे.

१. हे शब्द रामानें आपल्या इच्छागमनी पुष्पकविमानास उद्देशून म्हटले आहेत हें वाचकांनीं ताडिलें असेलच. रामाच्या शब्दध्वनीसरशी सीता सावध व्हावी हा योग कवीनें मुद्दाम जुळवून आणिला आहे.

२. रामानें केलेल्या परित्यागामुळें सीतेचें मन किती व्यथित झालें होतें, व तिला त्याजबद्दल किती राग आला होता हें या भाषणावरून व्यक्त होतें. त्याचें

**पडद्यांतून**—जेथील वृक्ष तसेच मृग मला स्वजनांप्रमाणें झाले होते व जेथें प्रियेसहवर्तमान मीं दीर्घकाल वास केला, तेच हे अनेक गुहा व जलप्रवाह यांनीं गज-बजून गेलेले व गोदावरीस लागून असलेले पर्वतांचे तटप्रदेश. ८

**सीता** (पाहून)—हाय ! प्रभातकाळच्या चंद्रमंडलाप्रमाणें क्षीण, पांडुर-वर्ण आणि दुर्बल अशी ही मूर्ति—जी त्यांच्या सौम्य आणि गंभीर
३ अशा अनुभावावरून मात्र ओळखितां येते—ती ही एकूण माझ्या आर्य-पुत्रांचीच ! माझ्यानें उभेंही राहवत नाहीं. ( तमसेस आलिंगून मूर्छा पावते.[1])

६ **तमसा** (तिला सांवरून)—वत्से, असें काय ? धीर धर.

**पडद्यांतून**—या पंचवटीच्या दर्शनामुळें–

आजवर आंत धुमसत असलेला दुःखाग्नि आज एकदम भडकणार आहे म्हणूनच कीं काय हा मोहरूपी धूमाचा लोट तत्पूर्वीं मला दडपून टा-कीत आहे. ९

हाय, प्रिये जानकि !

**तमसा** (स्वगत) —गुरुजनांना आशंका वाटली ती तरी हीच.

३ **सीता** (सावध होऊन) हाय ! याचा अर्थ तरी काय समजावा ?

व आपलें नातें इतउत्तर राजा व प्रजा याच्या पलीकडे राहिलें नाहीं हें तिनें येथें सूचित केलें.

१. मूर्छामरणादिकांचा अभिनय कसा करावयाचा हें नाट्यशास्त्राच्या २५ व्या अध्यायांत सांगितलें आहे. मूर्छेमध्यें मनोविकार ज्या प्रमाणानें प्रबळ असतील त्याप्रमाणें मंद, तीव्र, तीव्रतर इत्यादि भेद आहेतच; व त्यांचे अभिनयही निरानिराळे असणें शक्य आहे. भवभूतीच्या नाटकांमध्यें मूर्छना फार असतात, व त्यामुळें तीं प्रयोगदृष्ट्या सोईचीं नाहींत या आरोपाचें वर सांगितलेला भेद लक्षांत घेतां कांहीं अंशीं निराकरण होणें शक्य आहे. मूर्छनेच्या वेळीं अनुरूप गीतवाद्याच्या प्रयोग करीत असत हेंही लक्षांत आणावें.

**पडद्यांतून**—हे देवि, दंडकारण्यांतील माझे प्रिय सखी ! हाय, हे विदेहराजतनये !

६ **सीता**—हाय हाय ! या मंदभागिनीला उद्देशून ते नीलकमला-प्रमाणें शोभणारे नेत्र मिटून आर्यपुत्र मूर्छितच झाले ! हाय, हे पहा कसे कलाहीन व व्याकुल होऊन धरणीवर अस्ताव्यस्त पडले आहेत
९ ते ! भगवति तमसे, धांव, धांव. माझ्या आर्यपुत्रांना सावध कर. ( तमसेच्या पायां पडते. )

**तमसा**—पण तूंच आतां, हे कल्याणि, या जगत्पति
[रामभद्रास] जीवदान दे. तुझ्या हस्ताचा स्पर्श
त्याला प्रिय आहे[1] व या प्रसंगीं सर्व भार त्याज-
वरच आहे. १०

**सीता**—जें होईल तें होवो. भगवतीची आज्ञाच आहे, जात्यें. (घाई-
२ घाईनें निघून जाते.)

( तदनंतर भूमीवर मूर्छित पडलेल्या व साश्रु अशा सीतेनें स्पर्श केल्यामुळें साल्हाद व सावध झालेल्या रामाचा प्रवेश.[2] )

५ **राम**—हें काय असेल बरें ?

ही कां हरिचंदनपल्लवांच्या रसाची उटी, अथवा
चंद्रकिरणरूपी अंकुर मर्दून काढिलेल्या रसाची
वृष्टि ? किंवा या माझ्या संतप्त झालेल्या जीवि-

१. प्रणयी जनांच्या परस्पर अंगस्पर्शांचा महिमा भवभूतीनें अनेक प्रसंगीं वर्णिला आहे. उदाहरणार्थ, उत्तररामचरित १·८,३४,३५,३८;३·१४,४०–४२; ६·८,१३,२२;७·१८; वगैरे स्थळें पहा.

२. मूर्छित झालेलें पात्र प्रवेश कसा करणार हें एक कोडेंच आहे. या कालीं वर खालीं जाणाऱ्या पडद्यांचा हल्लींप्रमाणें उपयोग करीत नसत. तेव्हां बहुधा राम चालतच रंगभूमीवर येऊन पुढें मूर्छित होतो असेंच मानणें भाग पडतें. सीतेच्या पाठोपाठ तमसा निघून जाते असें सांगितलें नाहीं. याव-रून तमसाहि प्रेक्षकांप्रमाणें स्वस्थ उभी राहून रामाची सर्व हालचाल पहात असावी, व नूतनपात्रप्रवेशार्थ गीतवाद्यही सुरू असावें.

ताचा ताप निवविणाऱ्या एकाद्या संजीवनौषधी-
च्या रसाचें हें सिंचन समजावें ? ११
निःसंशय तोच हा एके कालीं माझ्या पूर्ण परि-
चयाचा स्पर्श, ज्यानें मला जीवन दिलें व माझ्या
मनास इतका मोह पाडला, व ज्याच्यामुळें संता-
पानें आलेली ही मूर्छना जरी दूर झाली तरी
आनंदानें उत्पन्न झालेल्या या जडतेचा मज-
वर पुनरपि अंमल बसूं लागला आहे. १२

**सीता** ( भीति व करुणा यांनीं कंपित अशा स्वरानें, किंचित् मागें सरून )—झालें हेंच एवढें मला आतां जास्त आहे.

३ **राम** ( उठून बसून )—देवी [ सीतेनें ] तर करुण होऊन मजवर हा अनुग्रह केला नसेल ?

**सीता**—हें काय ! आर्यपुत्रांनीं कां बरें आतां माझा शोध
६ करावा[1] ?

**राम**—बरें, आपण शोधून पहावें.

**सीता**—भगवति तमसे, आपण येथून जाऊं या. जर कां मी दृष्टीस
९ पडल्यें तर अनुज्ञेशिवाय मी सन्निध गेल्यें म्हणून राजाचा मजवर अधिकच कोप व्हावयाचा.[2]

**तमसा**—पण वत्से, भागीरथीच्या वरप्रसादामुळें तूं देवतांच्या
१२सुद्धां दृष्टीस पडणार नाहींस हें तुझ्या लक्षांत नाहीं काय ?

**सीता**—हो, असें खरें.

**राम**—प्रिये जानकी ! प्रिये, जानकी ! ओ कां देत नाहींस ?

१. आपण होऊनच माझा त्याग केला, आतां मला त्यांनीं कां म्हणून शोधावें ? मूळामध्यें ' मन्तिस्सति ' असें पाठांतर आहे; त्याचा अर्थ, 'आर्यपुत्रांनीं मला न जाणों पाहिलें तर मजविषयीं त्यांचें काय बरें मत होईल ?'

२. अनुज्ञेशिवाय सन्निध जाऊं नये हा विचार आतां सीतेला सुचत आहे. प्रत्यक्ष जातांना हा विचार करण्यास सवडच नव्हती. आपला प्राणनाथ मूर्छित होऊन पडला आहे त्याला, कांहीं होवो, सावध हें केलेंच पाहिजे हा एकच विचार तेव्हां तिच्या मनांत होता.

१९**सीता** ( कोपानें गळा दाटून ) पण आर्यपुत्रा, झाल्या गेल्या गोष्टींशीं याचा मेळ कसा घालावयाचा ? ( डोळ्यांत आंसवें आणून) अथवा, ज्यांचें [ सर्वस्वीं ] असंभाव्य दर्शन दुसऱ्या जन्मांत व्हावें
१८तशासारखें आज मला येथें प्राप्त झालें आहे, व ज्यांच्या तोंडून या मंद-भागिनीला उद्देशून असे प्रेमाचे उद्गार निघत आहेत, त्या या माझ्या आर्यपुत्रांवर वज्रासारखें मन करून मीं कां बरें निर्दय
२१व्हावें[1]? त्यांचें हृदय मला ठाऊक आहे व माझें त्यांना.[2]

**राम**—( चहूंकडे पाहून झाल्यावर, विषण्ण होऊन )—हाय, येथें तर कोणीही नाहीं !

२४**सीता**—भगवति तमसे, यांनीं जरी माझा तसा निष्कारण परित्याग केला तरी या स्थितीमध्यें घडलेल्या यांच्या या दर्शनानें माझ्या मनाची जी कांहीं अवस्था झाली आहे ती [ माझी मलाच ] सम-
२७जत नाहीं.

**तमसा**—तें मला समजतें, बाळे, मला समजतें.

> निराशेमुळें उदासीन व तसेंच कृतापराधाबद्दल
> कलुषित, या दीर्घ वियोगानंतर प्रियाची एकदम
> गांठ घेण्यास उत्कंठित, अंगच्या सौजन्यामुळें
> प्रसन्न व पतीच्या करुण [ विलापानें ] अत्यंत
> करुणार्द्र, आणि प्रेमामुळें पाझरणारें असें हें तुझें
> हृदय ह्या क्षणार्धात झालें आहे. १३*

> * निराशेनें जाहलें उदासीन
> चित्त तूझें विप्रियें फार खिन्न ॥
> करुण वचनें याचिया होय दीन
> तरी सौजन्यें असे सुप्रसन्न ॥ १४॥
> तुझें आधीं चित्त तें महोदार
> दीर्घविरहें उत्सूक असे फार ॥

१. मागें: १·५१^७ मधील ‘ पण स्वारींना पाहून माझें मन माझ्या ताब्यांत राहिलें तरच रागाची गोष्ट !’ हे शब्द कितीतरी यथार्थ होते !
२. पुढें अंक ६ श्लोक ३२ पहा.

**राम**—देवि,

तुझा मूर्तिमंत प्रसादच असा हा स्नेहानें आर्द्र व
सुशीतल स्पर्श अद्यापि माझें शरीर शीतल करीत
आहे, पण हे आनंददायिनी, तूं कोठें आहेस? १४

**सीता**—अंतर्यामींच्या अगाध स्नेहाचें भांडार व्यक्त करणारे व मज-
वर जणूं आनंदाचा वर्षाव करणारे तेच ते हे माझ्या आर्यपुत्राचे
३ उद्गार ( पुनरपि ) माझ्या कानांवर येत आहेत, व त्यांमुळें, जरी
माझा निष्कारण त्याग केला हें शल्य माझ्या हृदयांत सलतच आहे,
तथापि माझ्या जन्माचें [अंशतः] सार्थकच झालें असें मला वाटत आहे.

६ **राम**—अथवा माझी प्रियतमा येथें कोठून येणार ? सतत मी तिचें
चिंतन करितों, त्या सरावामुळें उत्पन्न झालेला[1] हा माझा मनाचा
भ्रम असावा.

९ **पडद्यांतून**—काय हा अनर्थ, काय हा अनर्थ !

देवी सीतेनें कोमल शल्लकीचे पल्लव आपल्या हा-
तांनीं गोळा करून, लालसेनें पुढें पुढें करणाऱ्या
ज्या हत्तीच्या छाव्यास एकेकाळीं चारिलें होतें;—

**राम** ( करुणायुक्त होऊन, )—मग त्याचें काय ?

पुनः **पडद्यांतून**—स्वस्त्रीसह तो पाण्यामध्यें क्रीडा करीत
असतांना दुसरा एक उद्दाम गजपति त्याजवर
आवेशानें चाल करून येत आहे. १५

**सीता**—आतां कोण बरें त्याला मध्यें पडून सोडविणार ?

तया पाहोनी न करितां उशीर
अला प्रेमाचा पूर त्या गभीर ॥१५॥
चित्त तूझें वाटतें चंद्रकांत
पुढें येतां प्रिय पूर्णचंद्र कांत ॥
प्रेमपाझर सूटला तया भारी
घडे स्वाभाविक कोण तया वारी ॥ १६ ॥

१ मागें पृष्ठ १०४ पहा.

**राम**—कोठें, कोठें आहे तो दुरात्मा ? जो माझ्या प्रियेनें पुत्राप्रमाणें
३ पोसलेल्या त्या हत्तीच्या छान्यावर—[ विशेषतः ] तो स्वस्त्रीसह क्रीडा करीत असतांना!—चाल करून येत आहे? (उठून उभा राहतो.)

**वासंती** ( गडबडीनें प्रवेश करून )—कोण ? महाराज रामचंद्र !

६ **सीता**—माझी प्रियसखी वासंतीच, एकूण !

**वासंती**—महाराजांचा विजय असो.

**राम** ( न्याहाळून पाहून )—कोण? देवी [ सीतेची ] प्रिय सखी,
९ वासंती !

**वासंती**—महाराज, त्वरा करा, त्वरा करा. या इकडे जटायुशिखराच्या दक्षिण बाजूनें सीतातीर्थानें[१] खालीं गोदावरींत उतरून देवी
१२[ सीतेच्या ] पुत्रावर अनुग्रह करा.

**सीता**—हा ताता जटायो ! हें जनस्थान आज तुझ्याशिवाय ओकें दिसत आहे[२]!

१५**राम**—हाय हाय ! इनें सहज म्हणून भाषणांत आणिलेलीं हीं नांवें हृदय विदारण करीत आहेत !

१. तीर्थ म्हणजे पाणउतार. पंचवटींत रहात असतांना सीता ज्या तीर्थानें खालीं गोदावरींत स्नानार्थ उतरत असे त्याला सीतातीर्थ हें नांव पडलें होतें. सीता त्यागामुळें उत्पन्न झालेला वासंतीचा रामाविषयींचा सकारण रोष ती रामास सीतेची आठवण होईल अशी भाषणें मुद्दाम काढकाढून शमवीत आहे. वासंती रामास पंचवटींतील जे जे पशुपक्षी दाखवीत आहे ते ते स्वस्त्रीशीं आनंदानें रममाण झालेले आहेत असेच तिनें शोधून काढिले आहेत हें ही येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वासंतीच्या या कृतीमुळें नाटकांतील दुसरें एक महत्वाचें कार्य सहजच साधून गेलें आहे. वासंतीस उत्तर म्हणून रामास स्वकृतीचें त्याच्या मताप्रमाणें समर्थन करावें लागतें व तें सीतेच्या कानावर पडल्यामुळें तिचें रामाविषयीं कलुषित झालेलें मन हळूं हळूं प्रसन्न होत आहे.

२. मागें १·३०[४–५] पहा. रावणानें सीतेस हरण केलें त्या वेळीं जटायूनें केलेली कामगिरी लक्षांत घेतां जटायूची सीतेसच प्रथम आठवण व्हावी हें उचित आहे. जटायूच्या मृत्यूनंतर आज कैक वर्षांनीं ती प्रथमच पंचवटींत आली आहे.

**वासंती**—इकडून, इकडून यावें महाराजांनीं.

१८**सीता**—भगवती [ तमसे ], वनदेवतांना सुद्धां मी दिसत नाहीं हें खरें कां ?

**तमसा**—बाळे, सर्व देवतांपेक्षां देवी भागीरथीचा प्रभाव अधिक

२१आहे हें तूं विसरलीस वाटतें ! अशी तुला शंका कशी आली ?

**सीता**—तर मग आपण—आपण यांच्या मागून जाऊं या.[1]

(उभयतां [राम व वासंती यांच्या] मागून जातात.)

२४**राम**—भगवति गोदावरी तुला माझा नमस्कार असो.[2]

**वासंती** ( न्याहाळून पाहून )—मोठी आनंदाची गोष्ट, महाराज, कीं देवी सीतेचा पुत्र—हा वधूसहवर्तमान [क्रीडा करणारा] हत्तीचा

२७छावा—विजयी झाला आहे.

**राम**—पुत्रका, तुझा [ सदा ] विजय असो.

**सीता**—अगबाई ! एवढा कां मोठा झाला आहे हा !

३०**राम**—देवी,[3] तुझें भाग्य थोर समजलें पाहिजे.

कमलाच्या देंठाप्रमाणें मृदु असलेल्या आपल्या
[ नुकत्याच ] उगवलेल्या कोंवळ्या दातांनीं, हे
सुतनु, ज्यानें तुझ्या कानावर ठेविलेले लवली
[ लतेचे ] पल्लव खालीं ओढावेत,[4] तो आज हा
तुझा [ मानिलेला ] पुत्र मदोन्मत्त हत्तींसही
भारी झाला आहे, व तरुणपणीं जें कांहीं म्हणून

१. मागें पृष्ठ १३९ टीप २ पहा. रामापाठीमागून जाण्याची गोष्ट सीता आतां आपण होऊनच काढीत आहे. तिच्या मनःस्थितींत झालेला हा फरक लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

२. मागें १·२२[2] पहा. एकाद्या सुवृत्त सालस पुरुषास योग्य असें रामाचें नेहमींच वर्तन असे. उदाहरणार्थ १·८[c] पहा.

३. राम हें भाषण अंतश्चक्षूपुढें उभ्या असलेल्या सीतेस उद्देशून करीत आहे.

४. हत्तीचा छावा अगदींच लहान असल्यामुळें त्याची उंची पुरुषभरच सुमारें होती हें येथें सुचाविलें. मागें पृष्ठ १२५ पहा.

[ अत्यंत ] श्रेयस्कर मानिलें जातें[1] त्याचाही
त्यास लाभ झाला आहे. १६

**सीता**—आतां मागणें म्हणून एवढेंच कीं त्याचा या सौम्य मुद्रेच्या सहचरीपासून कधींही वियोग न होवो[2] !

३ **राम**—सखि वासंती, पहा पहा, या गुलामानें कांतेचें मन रंजविण्याची कलाही अर्धीअधिक आपलीशी केली आहे—

लीलेनें उपटलेले कमलिनींचे कोंवळे देंठ चावून
झाल्यानंतर उमललेल्या कमलांतून [ उपटतांना ]
खालीं पडलेल्या परागानें सुवासित झालेल्या
पाण्याचे आपल्या सोंडेनें गुळणे घेऊन तो ते तिच्या
तोंडामध्यें घालीत आहे. आणि त्यानंतर सोंडें-
तून पाण्याचे फवारे उडवून त्यांनीं तिला यानें
स्नानही घातलें. हें सर्व ठीक झालें. पण तें
झाल्यावर एक सरळ देंठाचें कमलाचें पान उपटून
घेऊन त्याची तिच्या मस्तकावर तिला ऊन्ह लागूं
नये म्हणून एक छत्री धरावयाची, तेवढें मात्र
हा विसरला[3]! १७*

* श्रांता स्वकांता निरखोनि सत्वरीं
करी करानें जलसेक तीवरी ॥
छत्रापरी पुष्करपत्रही धरी
स्नेहें प्रियेचा श्रमखेद तो हरी ॥ २१ ॥
लीलेनें उपटुनि अब्जनालखंडें
दंतांनीं चघळुनि काढितो स्वतुंडें ॥
भक्षाया कवल तिला करोनि देतो
कांतेचें मन रमवी कसें पहा तो ॥ २२ ॥

१. अर्थात् अनुरूप वधूशीं समागम.
२. स्वतःच्या अनुभवावरून सीतेनें हाच आशीर्वाद देणें किती साहजिक आहे !
३. व म्हणूनच रामानें कांतेचें मन रंजविण्याची कला याला अर्धीच अवगत आहे असें म्हटलें. हा श्लोक मालतीमाधव ९·३४ येथें आला आहे. उत्तररामचरिताच्या कांहीं हस्तलिखित प्रतीमध्यें वर ३·१६[4] मधील

**सीता**—भगवति तमसे, हा एक मोठाधाटा झाला, पण या इतक्या दिवसांत ते दोघेजण—कुश आणि लव—ते केवढे मोठे झाले अस-
३ तील कोण जाणे.[१]

**तमसा**—जसा हा [ मोठा ] झाला आहे तसेच तेही पण.

**सीता**—अशी मी फुटक्या नशीबाची कीं मला आर्यपुत्रांचे चरण
६ अंतरले एवढेंच नव्हे तर माझे पुत्रही मजपासून दूर झाले आहेत.

**तमसा**—भवितव्यताच अशी !

**सीता**—थोडथोड्या कोंवळ्या व शुभ्र अशा दंतपंक्तींनीं ज्यांचे
९ गाल प्रफुल्लित दिसत आहेत, मुग्ध व मधुर हास्य ज्यांच्या ओंठांवर खेळत आहे, ज्यांच्या मस्तकावर काकपक्ष्याच्या आकाराचीं झुलुपें[२] शोभत आहेत, अशा त्या माझ्या लाडक्यांचीं निर्मल व मनोहर
१२ मुखकमलें आर्यपुत्रांनीं चुंबिलीं नाहींत,[३] तेव्हां मग म्यां प्रसूत होऊन तरी काय मिळविलें ?

**तमसा**—देवतांच्या प्रसादानें हेंही घडून येईल.[४]

' अर्धीअधिक ' हे शब्द नाहींत व ३·१७ च्या शेवटच्या चरणांत त्यानें छत्रीही धरिली या अर्थाचे शब्द आले आहेत. पण आमच्या मतें हा पाठभेद तितका चांगला नाहीं. हत्तीच्या छाव्यास तारुण्य नुकतेंच प्राप्त झालें आहे; आपल्या प्रेमपात्राची बरदास्त कशी ठेवावी हें त्यास पूर्णपणें अजून ठाऊक झालें नाहीं. हा आम्हीं स्वीकारिलेल्या पाठामधून निघ- णारा ध्वनि काव्यदृष्टया अधिक हृदयंगम आहे. उत्तररामचरिताच्या अत्यंत जुन्या प्रतींतही हाच पाठ आहे.

१. कुशलव यांना लहानपणींच भागीरथीनें नेऊन वाल्मीकीच्या स्वाधीन केलें होतें ( ३·२[१२] ) त्यानंतर मातापुत्रांची भेट झाली नव्हती.

२. कानांभोंवतीं ठेविलेल्या झुलुपांची आकृति थोडीशी काकपक्ष्यासारखी असते, व म्हणूनच संस्कृतांत झुलुपास 'काकपक्ष' असें म्हणतात.

३. मुलांचें स्वतः कौतुक करण्यापेक्षां बाप त्याचें कौतुक करीत असतांना तें पहाण्यामध्येंच आईला विशेष धन्यता वाटत असते.

४. नाटक आनंदपर्यवसायी होणार आहे हें फिरून एकदां सुचविलें.

१९**सीता**—भगवति तमसे, हें पुत्रांचें स्मरण झालें एवढ्यानेंच माझ्या स्तनांना तटतटून पान्हा आला आहे, व त्यांचे वडीलही सन्निधच आहेत यामुळें क्षणमात्र मी संसारांत [ पुनः परत ] आल्यें असें १८मला वाटूं लागलें आहे.

**तमसा**—हें काय सांगावें ? मुलें म्हणजे स्त्री-पुरुषांच्या प्रेमाची परमावधि. मातापितरांचीं मनें सांधणारा हा एक अत्यंत निकटचा २१दुवा आहे.

स्त्री-पुरुषांच्या स्नेहानें एकवटलेल्या अंतःकरणरूप धाग्याची अपत्यरूपानें एक आनंदाची गांठच बांधिली जाते. १८

**वासंती**—महाराजांनीं इकडेही[१] पण पहावें.

मदोत्कट होऊन नुकताच जो नाचत होता व ज्याचा नवथरच[२] फुटलेला मनोहर पिसारा अद्यापिहीं[३] हलतच आहे आणि पसरलेल्या पिसाऱ्यामुळें या कदंबवृक्षावर जो एकाद्या [ नील ] मण्याच्या मुकुटाप्रमाणें शोभिवंत दिसत आहे तो हा पहा हा मोर वधूसहवर्तमान[४] [या कदंब वृक्षावर]

१. म्हणजे सीता व तमसा यांचें मध्यंतरींचें लांबलचक संभाषण चाललें असतांना राम हत्तीची जलक्रीडा पहाण्यांतच गुंग झाला होता. जेथें जेथें सीता तमसा यांच्या भाषणामुळें राम व वासंती यांच्या संभाषणाच्या ओघास विशेष अडथळा होईलसें वाटलें तेथें तेथें कवीनें अशींच कांहीं ज्ञापकें घातलीं आहेत त्यांवरून मध्यंतरीं नटांनीं काय काय अभिनय केले पाहिजेत तें उघड होतें. नटवर्गाच्या अडचणीची भवभूतीस पूर्ण जाणीव होती हें सिद्ध करणाऱ्या अनेक प्रसंगांपैकीं प्रस्तुतचा एक होय. मागें पृष्ठ १३५ पहा.

२. मागें पृष्ठ १२५ पहा.

३. नृत्य संपलें तरी सुद्धां.

४. मागें पृष्ठ १४२ टीप १ पहा.

आनंदानें बसला आहे. १९*

**सीता** ( डोळ्यांत आंसवें आणून, कौतुकानें )—हाच तो बरें.

**राम**—वत्सा, तूं असाच सदैव आनंदांत अस.

३ **सीता**—असेंच होवो.

**राम**—नाचतांना जेव्हां जेव्हां तूं गिरकी घेत असस तेव्हां तेव्हां ती आपले डोळेही मंडलाकार फिरवीत असे, व त्या वेळीं मार्मिकपणें वरचेवर वरखालीं केल्या जाणाऱ्या भुवयांमुळें तिच्या डोळ्यांस विलक्षण शोभा येई. अशा प्रकारें लडिवाळपणानें आपल्या हातानें ताल धरून ती तुला [ लहानपणीं ] नाचावयास शिकवीत असे, त्या वेळची, पुत्रका, तुझी मूर्ति माझ्या प्रेममय अंतःकरणापुढें अजून उभी आहे.[1] २० §

काय चमत्कार ! पशुपक्षी सुद्धां एकदां झालेला परिचय विसरत नाहींत.

प्रियतमेनें [ पाणी वगैरे घालून ] वाढविलेला हाच तो कदंबवृक्ष; त्या वेळीं याला कोठें तुरळक तुरळक फुलें दिसूं लागलीं होतीं;

* नवे दीसती चित्र ज्याचे पिसारे
तुरा मस्तकीं शोभतो हा कसा रे ॥
कदंबावरी तो प्रियेच्या समोर
पहा नाचतो होउनी मत्त मोर ॥ २५ ॥

§ जशी भ्रुकुटि चाळवी नयनगोल ही हालवी
तसा फिरसि तूं तुला स्वकरपल्लवें पालवी ॥
धरून करताल ती प्रियसखी तुला नाचवी
सुतापरि तुला मनीं समजुनी सुखा सांचवी ॥ २६ ॥

१. हें शब्दचित्र किती हृदयंगम आहे ! या मोराच्या व पुढील श्लोकांत वर्णिलेल्या कदंबवृक्षाच्या स्थित्यंतरावरून मध्यंतरींच्या बारा वर्षांच्या अवधीची जाणीव होते हें पूर्वीं सांगितलेंच आहे. पृष्ठ १२५ पहा.

**सीता**—( पाहून, डोळ्यांत अश्रु आणून )—आर्यपुत्रांनीं बरोबर ओळखिलें.

**राम**—या जंगली मोराला [ अजूनही ] देवीची आठवण होत असावी आणि म्हणूनच या कदंबवृक्षाचे ठिकाणीं याला आपलेपणा वाटून हा त्यावर आनंद पावत आहे. २१

**वासंती**—महाराजांनीं येथें क्षणभर बसावयाचें होतें.
कर्दळीवनाच्या मध्यभागीं असलेलें हेंच तें [ विस्तीर्ण ] शिलातल जेथें पत्नीसमवेत आपण शयन करीत असा. येथें बसून सीता यां हरिणांना वरचेवर चारा देत असे व म्हणून तीं येथून केव्हांही हलत नसत.[1] २२

**राम**—याचें दर्शन घेणें तर केवळ अशक्य. ( एकीकडे बसून शोक करितो. )

३ **सीता**—सखि वासंती ! आर्यपुत्रांना व मला हें दाखवून तुला काय बरें लाभ झाला ? हाय हाय ! तेच हे आर्यपुत्र, तेंच हें पंचवटीवन, तीच ही प्रियसखी वासंती; तेच हे गोदावरीकांठचे वनप्रदेश जे
६ आम्हांमधील अनेकविध प्रेमप्रसंगांस साक्षी असत, व तेच हे मृग, पक्षी, आणि वृक्ष ज्यांवर आमचें पुत्रवत् प्रेम असे. पण या कपाळकरंटीला हें सर्व डोळ्यांसमोर असून नसल्यासारखें झालें आहे. या
९ संसारांत विचित्र उलटापालटी होत असतात म्हणतात तें असें !

**वासंती**—सखि सीते, रामाची ही काय अवस्था झाली आहे हें तुला दिसतें ना[2] ?

१. भावार्थ असा कीं राम व सीता एकांतात असतांना देखील तीं हरणें, अत्यंत संवयीमुळें, तेथून जा म्हटलें तरी हलत नसत व त्यामुळें एका परीनें जरी उभयतांच्या एकांतात व्यत्यय येई, तरी दुसऱ्या दृष्टीनें त्यांना त्यांचें कौतुकच वाटत असे.

२. वासंती मुद्दाम होऊन सीतात्यागासंबंधीं वेड पांघरीत आहे. सीता अयोध्येंतच असती व जर राम हल्लींप्रमाणें रोड व निस्तेज झालेला दृष्टीस पडता

पूर्वीं [पंचवटींत असतांना] ज्या या तुझ्या रामाचें नीलकमलाप्रमाणें तुकतुकीत असें शरीर नेहमीं वाटेल तेव्हां तुला पाहतां येण्याजोगें असून सुद्धां प्रत्येक खेपेस तें पाहून तुझ्या नेत्रांस नवीन नवीन आल्हाद होत असे, तो हा तुझा राम आज शोका-मुळें दुर्बल, निस्तेज, व कलाहीन असा झाला आहे; व त्याचें दर्शन आल्हाददायक नाहीं असें जरी नाहीं तरी तोच हा असें ओळखावयास सुद्धां आज कठीण पडत आहे ! २३

**सीता**—सखि [ वासंती ], पहात्यें बरें मी हें—पाहत्यें.[१]

**तमसा**—बाळे, तुला [ असेंच सदैव ] प्रियदर्शन होवो.[२]

३ **सीता**—हायरे दैवा ! माझ्याशिवाय हे व यांच्याशिवाय मी [राहूं शकूं] असें कुणाला तरी खरें वाटलें असतें कां ? आतां हें त्यांचें झालेलें

( बाकी वास्तविक ही गोष्ट अशक्यच ) तर आश्चर्य वाटून वासंती ज्या प्रकारानें सीतेस उद्देशून बोलती तशाच प्रकारानें हें तिचें बोलणें आहे. उद्देश हा कीं, राम आपण होऊनच सीतेसंबंधीं बोलणें काढील. पण रामही खमंगच होता. त्यानें शेवटपर्यंत दाद दिली नाहीं.

१. दूरच्या सीतेस उद्देशून म्हटलेले वासंतीचे शब्द सीता अदृश्यरूपानें तेथेंच असल्यानें तिच्या कानीं पडले व त्यांस हें तिचें उत्तर आहे. तें अर्थात् तमसेशिवाय कोणासही ऐकूं येत नाहीं. पण उत्तरास प्रत्युत्तर दिलें तेव्हां कदाचित् प्रेक्षकांचा गैरसमज होईल म्हणूनच कीं काय सीतेनें पुढल्याच भाषणांत वस्तुस्थिति काय आहे हें दाखविलें आहे. व यानंतर पुढेंही जेव्हां जेव्हां संभाषणाच्या ओघामुळें सीता अदृश्य आहे या गोष्टीचा प्रेक्ष-कांस विसर पडेल असा संभव आहे तेव्हां तेव्हां अशीच कांहीं तरी युक्ति योजून कवीनें प्रेक्षकांचें चित्त वस्तुस्थितीकडे खेंचण्याचा मुद्दाम प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ ३·१५[१६], ३·२९[२], ३·४३ वगैरे प्रसंग पहावेत.

२. हा आशीर्वाद श्लेषगर्भ आहे. प्रियदर्शन=प्रियपतीचें दर्शन, अथवा प्रिय-वस्तूचें दर्शन वा लाभ. पृष्ठ १४५ टीप ४ पहा.

दर्शन म्हणजे माझा पुनर्जन्म होऊनच झाल्यासारखें आहे.[१] तर मी
६ ही प्रेममय मूर्ति, क्षणभरच कां होईना, अश्रुप्रवाहांतून पहातां
येईल तेवढीच पाहून घेत्यें. ( त्याजकडे पहात राहते. )

**तमसा** ( स्नेहानें कुरवाळून, सखेद होऊन )—

आनंदामुळें व तसेंच शोकामुळें गाळल्या जाणाऱ्या
बाष्पांच्या ह्या महापूरानें अत्यंत थबथबलेली,
उत्कंठेनें दीर्घ व विस्तृत झालेली, आणि प्रेमानें
ओथंबिलेली ही तुझी दृष्टि एकाद्या शुभ्र[२] आणि
विपुल दुधानें भरलेल्या प्रसन्न महानदीप्रमाणें—
तुझ्या जीवितेश्वरास जणूं काय स्नानच घालीत
आहे! २४

**वासंती**—मधुर रसांनीं भरलेल्या फळांनीं व तसेंच
फुलांनीं हे सर्व तरू [रामाप्रत] अर्घ्य देवोत; विक-
सित कमलांच्या सुगंधानें दरवळलेले वारे वनां-
तून संचरोत; ज्यांना कंठ फुटले आहेत असे
पक्षी आपल्या अस्पष्ट व मधुर अशा आवाजांनीं
एकसारखे गान करोत;—कारण आज श्रीराम-
प्रभु पुनरपि आपण होऊन या वनांत आले
आहेत.[३] २५

१. रामाचें व माझें हल्लींचे नातें पूर्वींच्या नात्याहून इतकें भिन्न आहे कीं पुन-
र्जन्म झाल्याशिवाय इतका फरक पडणें सहसा संभवनीयच नाहीं.

२. टीकाकार म्हणतात, विरहावस्थेंत नेत्रांत अंजन न घातल्यामुळें शुभ्र.

३. वासंती वनदेवता होती तेव्हां वनांतील पशु, पक्षी, वृक्ष, वारे इत्यादि तिच्या
आज्ञेंत होते हें उघडच आहे. दुसऱ्या अंकाच्या आरंभीं तिनें आत्रेयीस
प्रत्यक्ष अर्घ्य दिला; पण येथें स्वागताची तयारी अधिक मोठ्या प्रमाणानें
करण्यांत आली आहे; परंतु हें स्वागत थोडेंसें उशीरां होत आहे असें
वाटतें. इतकेंच नव्हे तर ३.२१[१] नंतर ह्या श्लोकाच्या अखेरपर्यंत जो नाट-
काचा भाग आहे त्याचें विशेष कांहीं कार्य असेलसें वाटत नाहीं. अगो-
दरच तिसऱ्या अंकांत शोकाचा भाग बराच आहे तेव्हां प्रयोगदृष्ट्या हा

**राम**—ये, सखि वासंती, तूंही येथें बैस.

**वासंती** ( बसून, डोळ्यांत आंसवें आणून )—महाराज! कुमार
३ लक्ष्मणाचें कुशल आहे ना?

**राम**—( न ऐकल्यासारखें करून )—

ज्या या वृक्षांस, पक्ष्यांस व हरिणांस मैथिली
स्वतः आपल्या गोंडस हातांनीं [अनुक्रमें] पाणी,
नीवार, व तृण देऊन पोसत असे त्यांचें आज
दर्शन होतांच, जसा एकादा कठिण शिलेसही
दुभंगून टाकूं शकणारा [अंतर्गत] पाझर असावा
तद्वत् माझ्या हृदयांत एक विलक्षण विकार
उद्भूत होऊं पहात आहे.[१] २६

**वासंती**—महाराज! मी विचारीत होत्यें कीं कुमार लक्ष्मणाचें कुशल आहे ना?

३ **राम** (स्वगत)—अरे! हिनें मला 'महाराज' या स्नेहशून्य नांवानें संबोधिलें,[२] व इचा खुशालीचा प्रश्न एकट्या लक्ष्मणासच अनुलक्षून होता व तो उच्चारितांना गळा दाटून अडखळत अडखळत तिचे
६ शब्द बाहेर पडले यावरून इला सीतेचा वृत्तांत कळला असावासें

सर्व भाग, म्हणजे ४ संपूर्ण श्लोक व सुमारें २० ओळी गद्य, गाळून टाकिल्यास प्रयोगास विशेष आटोपशीर व परिणामकारक रूप येणें शक्य आहे; व या नाटकाचा प्रयोग होत असतांना हा भाग गाळला जात असे असें म्हणण्यास आधार आहे. चित्रमयजगतचा जानेवारी १९१५ चा खास अंक, पृष्ठें १३–१५ पहा.

१. हृदयास शिलेची यथार्थ उपमा दिली व हृदयांत उद्भूत होणाऱ्या विकारास पाझराची उपमा दिली. मोठमोठे प्रस्तर पाझरामुळें कसे उकलतात तें भूगर्भशास्त्रवेत्त्यांस अवगत आहेच.

२. मागें पृष्ठ १११ टीप १ पहा. अंकारंभापासूनच वासंती रामास दूरच्या नांवानें संबोधीत आहे; पण ती गोष्ट आतां रामाच्या लक्षांत येते. पुढें ३·३९[१४] येथेंच प्रथम 'महाराजाचा' 'रामभद्र' झाला आहे.

वाटतें.[1] ( उघड. ) मी विसरलोंच. होय. लक्ष्मण खुशाल आहे. ( अश्रु गाळितो.)

९ **वासंती**—राजा, राजा! तूं इतका निर्दय कां बरें झालास[2]?

**सीता**—सखि वासंती, असें तुझ्याच्यानें बोलवतें तेव्हां तूं तरी [निर्दय नाहींस तर] कोण आहेस? सर्वांचें आर्यपुत्रांशीं वर्तन प्रेम-

१२ळच असावयास नको का? आणि त्यांतून **माझ्या** प्रियसखीचें तर **असलेंच पाहिजे.**[3]

१. रामाची समजूत अशी कीं अयोध्येपासून शेंकडों योजनें दूर असलेल्या वासंतीस खरा प्रकार कळला नसावा. दुसऱ्या अंकाच्या विष्कंभकांत आत्रेयीची व तिची गांठ न पडती तर रामाची समजूत खरी ठरती. भ्रमाचा भोपळा याप्रमाणें फुटल्यानंतर आतां पूर्वीं ( ३·२२[1] ) प्रमाणें एकीकडे शोक न करितां राम उघडपणें अश्रू गाळितो.

२. मागें पृष्ठ १४२ टीप १ व पृष्ठ १४८ टीप २ पहा. वासंतीनें शिकस्त करून पाहिली पण रामानें आपण होऊन सीतेचा उल्लेख भाषणांत आणिला नाहीं असें पाहून शेवटीं तिच्यानें रहावेना व ती आतां छन्नी भाषणें सोडून सरळ प्रश्न विचारीत आहे. येथें एकदम लक्षांत न येण्यासारखी एक खुबी आहे ती अशी कीं वासंती आतांपर्यंत आपल्याकडून आपणास सीतेबद्दल बातमी नाहीं असें दाखविण्याचा प्रयत्न करीत होती तरी तिच्या चर्येवरून व आवाजावरून तिची अंतःस्थिति, राम जर नेहमींप्रमाणें समतोल स्थितींत असता तर, त्याला कळल्यावांचून रहातेना. वासंतीच्या मनाची चलबिचल झाली होती हें दाखविण्यास ३·२५ हा एकच श्लोक पुरे आहे. या श्लोकानें वासंती रामाचें फारा दिवसांनीं तो भेटला म्हणून स्वागत करीत आहे. पण श्लोकाकरितां हरिणी या शोकपूर्ण वृत्ताची योजना झाली आहे. मागें पृष्ठ ८३ टीप २ पहा.

३. निष्कारण परित्यागाबद्दल सीतेचा रामावर रोष होता व तो आतांपावेतोंच्या तिच्या भाषणामध्यें मधून मधून दृग्गोचर होत होताच. पण आतां वासंती या तिसऱ्या मनुष्यानें आपल्या नवऱ्यास दोष देण्याचा उपक्रम करितांच स्त्रीस्वभावानुरूप ती आतां आपल्या नवऱ्याची कड घेऊन तिच्याबरोबर भांडत आहे व असें करण्यामध्यें तिच्या स्वतःच्या मनाची तेढ हळूं हळूं कमी होत आहे. सीतेच्या मनःस्थितीचे होणारे फेरपालट अंकाच्या शेवटीं एका टीपेंत ओळीनें एकत्र करून सांगितले आहेत ते पहावेत.

**वासंती**—तूं माझें जीवित आहेस, तूं माझें दुसरें हृद-
यच आहेस; तूं माझ्या नेत्रांना चंद्रिका आहेस;
व शरीरास अमृत आहेस; [एक ना दोन] अशा
शेंकडों प्रिय भाषणांनीं एके कालीं तूं तिचें बावळें
मन रंजवीत असस; आणि आज तिलाच—
हाय ! आतां पुढें म्हणूं तरी काय ? २७*

( मूर्छित होते. )

**तमसा**—वाक्य पुरें न करितांच तिनें मूर्छित व्हावें हें साहजिक आहे.

३ **राम**—सखि, सावध हो सावध हो.

**वासंती** ( सावध होऊन )—मग महाराजांनीं काय समजून हें अकार्य केलें ?

६ **सीता**—सखि वासंती, पुरे आतां, नको असें बोलूं.

**राम**—लोकांस खपेना म्हणून.

**वासंती**—तें कां बरें !

९ **राम**—त्यांनाच ठाऊक असेल कां म्हणून तें.

**वासंती**—अरे निर्दया ! तूं म्हणशील मला अब्रूची चाड
आहे; पण सांग मला आतां याहूनही असह्य
बेअब्रू ती कोणती राहिली आहे ? त्या अर-
ण्यांत त्या हरिणाक्षीचें काय बरें झालें असेल ?
[प्रजेचा] पालक ना तूं ? मग [गप्प कां ?] सांग
बरें या बाबतींत तुला वाटतें तरी काय ? २८ §

* तूं जीव तूं हृदय तूं मजला विसावा
तूं चंद्रिकाच नयना शरिरा सुधा वा ॥
मोहीं जिला वदुनि यापरि गुंतवावें
तीतेंच—हाय तुज काय पुढें म्हणावें ॥३६॥

§ कठिण हृदय रामा आवडे कीर्ति तूतें
तरि वद अपकीर्ती याहुनी काय मातें ॥
वनिं गति अबलेची काय झाली असेल
तव हृदयिं नरेंद्रा वाटतें काय बोल ॥ ३७ ॥

**तमसा**—हा टोमणा [ योग्य आहे पण ] फार उशीरां आला.

**सीता**—तूंच बरें, सखि वासंती, तूंच निर्दय आणि कठोर, जी तूं
३ पोळलेल्याला पुनः पोळीत आहेस.

**तमसा**—तुझी प्रीति तुजकडून हें वदवितें—प्रीति आणि शोक.

**राम**—सखि, या बाबतींत दुसरें काय वाटावयाचें आहे ?

> भीतीनें गांगरून गेलेल्या व ज्याला जन्मून पुरतें
> एक वर्ष झालें असेल नसेल अशा एकाद्या हरि-
> णाच्या पाडसाप्रमाणें जिचें नेत्र चंचल असत
> आणि स्फुरण पावणाऱ्या गर्भाच्या ओझ्यानें जी
> अगदीं भारावली होती त्या [ माझ्या सीतेची ]
> ती अंगलतिका—कीं जिला मृदु आणि मनोहर
> अशा कमलिनीची उपमा कदाचित् शोभेल अथवा
> जी चंद्रकिरणांनींच जणूं काय बनविली होती
> असें म्हणतां येईल—ती निःसंशय क्रूर राक्ष-
> सांनीं [अथवा वन्य पशूंनीं] गडप केली असेल! २९*

**सीता**—आर्यपुत्रा, ही मी अजून जिवंत आहें—खरेंच आहें !

**राम**—हाय, प्रिये जानकी ! तूं आहेस तरी कोठें¹ ?

३ **सीता**—हाय हाय ! आर्यपुत्रांवर सुद्धां धाय मोकलण्याचा प्रसंग यावा ना ?

**तमसा**—बाळे, हें असें होणें साहजिकच आहे. दुःखी जनांनीं
६ दुःखाचा अशा रीतीनें ओसर पाडिलाच पाहिजे. कारण—

> तडागामध्यें जळ तुंबलें म्हणजे त्याला पाट फोडून
> देणें हाच उपाय आहे; त्याचप्रमाणें हृदयांत शोक

* भ्याल्या मृगापरि जिची सुविलोल दृष्टी
जी पूर्ण गर्भ धरितां बहु होय कष्टी ॥
तीची शरीरलतिका कुसुमें स्तवावी
रानांत हिंसक जनीं गिळिली असावी ॥ ३८ ॥

१. मागें पृष्ठ १४९ टीप १ पहा.

अनावर झाला म्हणजे त्याला रोदनानेंच स्थिरता
आणितां येते. ३०*

विशेषतः आमच्या रामभद्राला हा जीवलोकींचा संसार [ आतां ]
अत्यंत कष्टमय झाला आहे.

एकीकडे या [ सर्व ] विश्वाचें विधिपूर्वक आणि
एकाग्र चित्तानें त्याला पालन करणें भाग आहे,
आणि दुसरीकडे पाहिलें तर उन्हाळ्यामध्यें जसें
फूल कोमेजून जातें तसें याचें जीवित प्रियेच्या
शोकामुळें कोमेजत चाललें आहे. बरें, स्वतःच
त्यानें [ तुझा ] त्याग केला असल्यामुळें [ उघड-
पणें ] विलाप करून जो दुःखास थोडाबहुत
ओसर पडला असता तोही शक्य नाहीं. अशा
स्थितींतही रामभद्र जीव धरून राहिला आहे.
तेव्हां तो आतां विलाप करीत आहे हा एका
दृष्टीनें फायदाच नव्हे काय ? ३१

**राम**—छे ! किती सोसावें आतां हें ?—

अंतर्यामींच्या तीव्र शोकामुळें हें हृदय उकलून
जातेंसें वाटतें, पण त्याचीं एकदम दोन शकलें
कां होत नाहींत ! हें शरीर वरचेवर मूर्छनांनीं
जर्जर होत आहे पण एकदांच त्यास प्राण सोडून
जाते तरी बरें ! शोकाग्नि अंगाची आंतून लाही
लाही करीत आहे पण त्याची एकच होळी मात्र
करीत नाहीं ! विधि मर्मावर [ वारंवार ] प्रहार
करून राहिला आहे पण जीव घेण्यास मात्र अजून

* जळ तुंबतां तडागीं फोडावा लागतो जसा पाट ॥
शोकक्षोभीं रोदन हृदयस्थैर्या नसे दुजी वाट ॥२९॥

कांकू करीत आहे ! ३२*

**सीता**—माझीही हीच स्थिति झाली आहे.

**राम**—अहो सन्मान्य पौरजनहो !

देवीनें गृहामध्यें वास करावा हें तुम्हांस रुचेना असें जेव्हां मला कळलें तेव्हां तृणवत् मीं तिला त्या शून्य अरण्यांत टाकून दिली, एवढेंच नव्हे तर तिजविषयीं शोक सुद्धां करणें सोडिलें. आज फारां दिवसांनीं ह्या पूर्वपरिचित वस्तू माझ्या पाहण्यांत आल्यानें केवळ नाइलाज म्हणून मी हा शोक करीत आहें. याबद्दल मला क्षमा असूं द्या. ३३

**तमसा**—शोकसागरामध्यें [ होणाऱ्या तुफानाचा सूचकच असा ] हा केवढा हलकल्होळ उठला आहे !

३ **वासंती**—महाराज, गोष्ट होऊन चुकली; आतां धैर्याचीच कांस धरिली पाहिजे.

**राम**—काय म्हटलेंस, सखि वासंति, धैर्य ?

देवी नष्ट झाल्यास आज [एक नाहीं दोन नाहीं] बारा वर्षें लोटलीं; तिचें नांव सुद्धां कोठें ऐकूं येत नाहीं, पण हा राम मात्र अजून जिवंत राहिला आहे ! ३४

**सीता**—आर्यपुत्रांचे हे शब्द मला मोहित करितात.

**तमसा**—बाळे, असेंच खरें.

[ अंतर्यामींच्या ] स्नेहामुळें द्रव आणणारे पण शोकामुळें असह्य वाटणारे असे हे शब्द तुला सर्वस्वीं सुखकारकच वाटतात असें नाहीं; विष-

* हृदय उलतें शोकें माझें नव्हे द्विविधा तरी
विकल करिते मूर्छा काया न जीवित संहरी ॥
अंतुनि तनुशी भाजी ज्वाळा न भस्म करीतसे
विधि जरि करी मर्मोद्भेदा न जीव हरीतसे ॥ ४२ ॥

मिश्रित मधाच्या ह्या धाराच [ शब्दरूपानें ]
तुजवर वर्षत आहेत. ३५

**राम**—अग वासंती, [ तूं धैर्याच्या गोष्टी सांगतेस, पण ] म्यां—
जसें एकादें लाल तापलेलें शल्य तिरकस घुसून
आंत जळत जावें, अथवा जसा एकादा विषारी
दांत लागावा, त्याप्रमाणें हा शोकरूपी अणकुचीदार
खिळा माझ्या हृदयांत शिरून मर्मे विदारित
असतां सहन केला नाहीं काय ? ३६

**सीता**—अशी ही मी कपाळकरंटी कीं जी दुसऱ्यांदा[1] आर्यपुत्रांना त्रास देण्यास कारण झाल्यें आहें.

३ **राम**[2]—नेहमीं जरी मीं याप्रमाणें मन आंवरून [ दगडाप्रमाणें ] घट्ट केलेलें असतें तरी आज या अनेक पूर्वपरिचित प्रिय वस्तूंच्या दर्शनानें माझा शोकावेग अगदीं अनिवार झाला आहे. कारण,—

या माझ्या क्षुब्ध व बेताल झालेल्या अंतःकरणास
भडकूं न देण्याचा जो जो प्रयत्न मी मोठ्या
मुष्किलीनें करितों तो तो प्रयत्न हाणून पाडिला
जाऊन, ज्याप्रमाणें सोंसाट्यानें वाहणाऱ्या पाण्या-
चा प्रचंड लोंढा एकाद्या वाळूच्या बांधास फोडून
पुढें चालता होतो त्याप्रमाणें, एक विलक्षण मनो-
विकार अंतर्यामीं उद्भवून चहूंकडे प्रसार पावत
आहे. ३७

**सीता**—ज्याचा प्रारंभच इतका वेगवान् व दारुण आहे अशा या आर्यपुत्रांच्या दुःखक्षोभानें माझ्याही दुःखास स्फुरण येऊन त्यामुळें
३ माझें हृदय कंपित होत आहे.

१. 'पहिल्यांदा' म्हणजे अर्थात् रावणानें हरण केलें तेव्हां.
२. रामाचीं हीं तीन्हीं भाषणें एकदम घेऊन त्यांचा अर्थ करावयाचा आहे. तूं म्हणशील 'शोक नेहमीं सहन करितोस तर आजच काय झालें ?' तर सांगतों.

**वासंती** ( स्वगत )—महाराजांची प्रकृति बरीच बेताल झाली आहे, तर यांचें मन दुसरीकडे लावावें. ( उघड ) महाराजांनीं आतां
६ हे फारां दिवसांचें सोबती—हे जनस्थानांतील वनप्रदेश—पहावयाचे होते.

**राम**—बरें, तसें कां होईना. ( उठून इकडे तिकडे फिरतो. )
९ **सीता**—ज्यांमुळें दुःखास जास्त ऊत येण्याचा संभव असेच उपाय ही प्रियसखी दुःख ओसरावे म्हणून योजीत आहे.[1]

**वासंती** ( करुणायुक्त होऊन )—महाराज, महाराज !

याच त्या लतागृहामध्यें तिच्या वाटेकडे डोळे लावून आपण बसलां होतां. गोदावरीच्या वाळवंटांत [ क्रीडा करणाऱ्या ] हंसांचें तिला कौतुक वाटून ती कोठें उशिरां आली. येतांना आपलें मन किंचित् नाराज झाल्यासारखें तिनें [ दुरून ] पाहिलें आणि लगेच कंपित होऊन कमलाची कलिकाच अशी एक मनोहर प्रणामांजलि आपणांस अर्पण केली ! ३८*

**सीता**—निर्दय अगदीं निर्दय आहेस तूं, वासंती ! अगदीं काळजांत खोल मर्मस्थानीं घुसलेलें शल्य हलवून घट्ट करावें तशी ही तुझी
३ कृति आहे; व त्यामुळें आर्यपुत्रांना ह्या मंदभागिनीची वरचेवर आठवण मात्र करीत आहेस.

* या कुंजांतचि वाट पाहत तिची होतास, ती गोमटी
होती हंसविलास देखत उभी गोदावरीच्या तटीं ॥
येतां खिन्न तुला विलोकुनि तिच्या शंका मनीं वाटली
भीतीनें तुज हात जोडुनि तिनें केला प्रणामांजली ॥४८॥

१. असें करणें ही एक कविसमयसिद्धच गोष्ट होऊन बसली आहे. पुढील श्लोकावरून वासंती अद्याप रामाचा पिच्छा पुरवीतच आहे असें दिसून येतें. श्लोकांतील प्रसंग फारच सुंदर आलेला आहे.

**राम**—चंडी जानकी, तुझें अस्तित्व चहूंकडे भासमान होतें,[1] पण
६ दया करून [ तूं मला प्रत्यक्ष दर्शन कां देत नाहींस ] ?

हाय हाय, देवी ! हें माझें हृदय दुभंगू लागलें,
शरीर सांवरेनासें झालें; जग सारें शून्य भासूं
लागलें, व अंतरीं दुःखाग्नीच्या ज्वाला एकसारख्या
भडाडूं लागल्या; माझे प्राण विकल होऊन निबिड
अंधकारामध्यें गडप होऊं पहात आहेत; चहूं-
कडून मोहानें मला पूर्ण वेढून टाकिलें, आतां म्यां
मंदभाग्यानें करावें तरी काय ? ३९*

( मूर्छित होतो.)

**सीता**—हाय हाय ! आर्यपुत्रांना पुनरपि मूर्छा आली !
३ **वासंती**—महाराज, सावध व्हा, सावध व्हा.
**सीता**—हा आर्यपुत्रा ! या मंदभाग्येसाठीं निखिल जीवलोकाचा मंगलमय आधार असें तुमचें जीवित वरचेवर अशा भयंकर रीतीनें
६ संशयांत पडून तुमच्या एकंदर आयुष्याची अशी दशा दशा व्हावी यापेक्षां माझें दुर्भाग्य तें कोणतें ? ( मूर्छित होते. )
**तमसा**—वत्से, सावध हो, सावध हो. तुझा हस्तस्पर्श हाच पुनरपि
९ रामभद्र सावध होण्याचा उपाय आहे.
**वासंती**—हें काय ? अजून सावध होत नाहीं ! हा प्रियसखी सीते !
११ तूं आहेस तरी कोठें ? ये आणि तुझ्या जीवितेश्वरास सावध कर.

( सीता घाबऱ्यां घाबऱ्यां रामाजवळ जाऊन त्याच्या
हृदयास व कपाळास स्पर्श करिते. )

* हाहा देवी हृदय फुटतें देह माझा गळाला
बाटे शून्य त्रिभुवन मला अंतरात्मा जळाला ॥
या आत्म्यानें किति तरी सदा दुःखभारा धरावें
मोह व्यापी फिरफिरुनि म्यां काय आतां करावें ॥ ४९ ॥

१. संकल्पनिर्मित सीतेस उद्देशून हे शब्द असूं शकतील; अथवा चिरपरिचित वस्तूंच्या सांनिध्यानें साहजिकच रामास तसा भास होत असेल. मागें २·६ व पृष्ठ १३४ पहा.

**वासंती**—मोठें भाग्य कीं रामभद्र पुनरपि सावध झाला !

**राम**—आंतून व बाहेरून शरीराच्या प्रत्येक धातूस
अमृताचें उटणें लावूनच जणूं काय माझ्या जिवांत
पुनरपि जीव आणणारा हा स्पर्श अकस्मात् माझ्या-
मध्यें आनंदाच्याही पलीकडचा असा एक विल-
क्षण मोह उत्पन्न करीत आहे.[१] ४०

(आनंदानें डोळे तसेच मिटून,) सखि वासंती! मोठ्या आनंदाची गोष्ट!

**वासंती**—तें कसें काय ?

३ **राम**—दुसरें काय ? जानकी पुनः परत आली !

**वासंती**—महाराज—माझ्या रामभद्रा[२]—अरे कुठें ?

**राम** ( स्पर्शसुखाचा अनुभव घेऊन )—ही पाहत नाहींस कां ? समो-
६ रच आहे.

**वासंती**—अरे, असे नकोरे मर्मच्छेद करणारे हे दारुण प्रलाप करून
प्रियसखीच्या दुःखानें आधींच पोळलेल्या ह्या मंदभागिनीच्या हृदया-
९ वर पुनः आणखी डाग देऊं !

**सीता**—येथून जावेंसें वाटतें; पण अढळ प्रीतीमुळें सौम्य व शीतळ
अशा ह्या आर्यपुत्रांच्या स्पर्शानें माझा इतक्या दिवसांचा दारुण
१२ संताप शांत होऊन जणूं काय वज्रलेपानेंच खिळून गेलेला हा माझा
घामानें आर्द्र[३] व शिथिल झालेला हात परस्वाधीन होऊन एक-
सारखा कंप पावत आहे !

१५ **राम**—काय, सखी, तूं हे सर्व प्रलाप समजतेस ? छे!
ज्या कंकणभूषित हस्तानें मागें विवाहसमयीं मीं
ग्रहण केलें होतें व [ तदनंतर ] अमृताप्रमाणें
शीतल असा ज्याचा स्पर्श, चिरकाल व वाटेल

१. मागें १·३५;३·११,१२, वगैरे प्रसंग पहा. तसेंच पृष्ठ १३८ टीप १ पहा.
२. आतांच कायतो प्रथम 'महाराजाचा' रामभद्र' झाला.
३. प्रणयी जनांचा हात स्पर्शसमयीं घामानें आर्द्र होणें हें सात्विक प्रीतीचें लक्षण
मानिलें जातें.

तेव्हां अनुभविण्यास सांपडल्यामुळें, माझ्या पूर्ण
परिचयाचा आहे;—

**सीता**—आर्यपुत्रा, आतां मात्र आपण माझे आर्यपुत्र खरे !

**राम**—तोच हा हात जो लवलीलतेच्या नालाप्रमाणें मनो-
हर असे—अथवा ज्याला तिच्या दुसऱ्या हाता-
चीच योग्य उपमा देतां येईल—तो हा मला
सांपडला. ४१

( तिचा हात धरितो. )

**सीता**—अग बाई ! आर्यपुत्रांच्या स्पर्शानें मोहित झाल्यानें मजकडून
३ प्रमाद घडला.

**राम**—सखि वासंती, आनंदानें माझीं सर्व इंद्रियें जड झालीं आहेत
व त्यांना कंप सुटल्यामुळें तीं माझ्या स्वाधीन नाहींत. तर तूंच
६ इला धरून ठेव.

**वासंती**—हाय ! हा केवळ उन्माद आहे.[1]

(सीता घाईनें हात सोडवून घेऊन बाजूस होते.)

९ **राम**—हाय हाय, घात झाला !
जड असा जो मी त्या माझ्या, घामानें आर्द्र
झालेल्या व कंप पावणाऱ्या हस्तांतून तो तिचा
घामानें आर्द्र झालेला व कंप पावणारा करपल्लव
एकाएकीं निसटून गेला ! ४२

**सीता**—अग बाई, हें काय ! यांचें नेत्र केव्हां स्तब्ध तर केव्हां
एकसारखे गरगर फिरत आहेत, व अजूनही हे देहभानावर येत
३ नाहींत हें काय ?

**तमसा** ( स्नेहानें सीतेस न्याहाळून )—
जसें एकादें कळ्यांनीं फुललेलें कदंबाचें रोप
वाऱ्यानें कंपित होऊन त्यावर नूतन [मेघांतील]
पाण्याचें सिंचन व्हावें त्याप्रमाणें प्रियाच्या स्पर्शा-

१. मागें पृष्ठ १४९ टीप १ पहा.

मुळें बाळेचें अंग घामानें आर्द्र आणि रोमांचित
होऊन त्यास कंप सुटला आहे.[1] ४३

**सीता** (स्वगत)—अग बाई ! मी स्वतः इतकी परस्वाधीन झाल्यें म्हणून भगवती तमसेनें मला लाजविलें. काय बरें ही मनांत म्हणत ३ असेल? 'तशा रीतीनें तुला टाकिलें तें काय, आणि तुझी अजून त्याजवर आसक्ति आहे तरी काय?'

**राम** ( सगळीकडे पाहून )—काय ! खरेंच ती नाहीं एकूण ! हे ६ अकरुणे वैदेही* !

**सीता**—अशी ही तुमची दशा पाहूनही मी अजून जीवंतच राहिल्यें आहें तेव्हां मी खरोखरच 'अकरुण'.

९ **राम**—देवी, कोठें आहेस तूं? मजवर प्रसन्न हो. असें मला टाकून जाणें तुला शोभत नाहीं.

**सीता**—आर्यपुत्रा, हें उलटें बोलणें होतें[2]—नव्हे कां?

१२ **वासंती**—महाराज, कृपा करा, कृपा करा, आणि आपणच, आपल्या लोकोत्तर धैर्याच्या योगानें, आपलें मन आंवरून धरा. आपली ही फार मोठी फसवणूक झाली. माझी प्रियसखी येथें १५ कोठून बरें येणार?

* येथें परशुरामपंतांनीं किंचित् अप्रासंगिक असें एक पद घातलें आहे. पुष्कळांच्या तें पूर्ण माहितीचें असल्यामुळें येथें दिलें आहे.

पद ५८

गे सखि लोभ तुझा हा लटिका ॥ ध्रुवपद ॥
स्पर्श करुनि मज गेलिस कोठें । लावुनि हृदया चटका ॥ गे० ॥१॥
तुज कोठें मी पाहूं आतां । जाते युगसम घटिका ॥ २ ॥
विरहाग्नीनें अंतरिं जळतों । दे वचनामृत घुटका ॥ ३ ॥
मायानरतनु राम तयाला । दिधला मोहें झटका ॥ ४ ॥

१. अंगास कदंबयष्टीची, घामास मेघजलाची, रोमांचास कळ्यांची, व कंपास वाऱ्यानें हलण्याची उपमा दिली आहे.

२. कारण मीं तुम्हांला टाकिलें नाहीं, तुम्हीं मला टाकिलेंत.

**राम**—खरेंच नाहीं ! नाहींतर वासंतीला तरी ती दिसल्याशिवाय कशी राहती ? तर मग हें सर्व स्वप्नच समजावयाचें कीं काय ? मी १८तर कांहीं निजलों नव्हतों—आणि रामाची आतां झोंपेशीं फारकतच झाली आहे म्हटलें तरी चालेल.[1] एकूण निःसंशय तिजविषयींच्या माझ्या अनेकविध संकल्पांमुळें उद्भवणारा—व एका दृष्टीनें माझें २१कल्याणच करणारा[2]--हा विप्रलंभ असावा व त्यामुळें माझी अशी वरचेवर फसगत होत आहे.

**सीता**—एकूण म्यांच निर्दयेनें आर्यपुत्रांस फसविलें !

२४**वासंती**—हें–हें पहा महाराज—

> पौलस्त्य [रावणाचा] जटायूनें मोडून टाकलेला हा पहा पोलादाचा रथ, आणि हे पहा त्याच्या पुढेंच त्याला जुंपलेले पिशाचवदन खर ज्यांचे आतां अस्थीच अवशिष्ट आहेत. या बाजूला खड्गानें तोडलेले जटायूचे हे पहा ओळीनें पडलेले पंख; याच बाजूनें [क्रोधानें] लाल झालेल्या सीतेस—जसा एकादा मेघ आंत चमकणाऱ्या चंचल विद्युल्लतेस घेऊन संचार करितो त्याप्रमाणें—उचलून घेऊन अरीनें आकाशीं उड्डाण केलें. ४४

**सीता** ( भीतीनें )—आर्यपुत्रा ! तात [जटायूंना] मारिलें आणि मलाही हरण करून नेलें ! धांवा, सोडवा !

३ **राम** ( वेगानें उठून )—अरे दुष्टा, तातांच्या प्राणांवर घाला घालणाऱ्या ! कुठें चाललास ?

**वासंती**—महाराज राक्षसकुलाची आपल्या प्रतापाग्नींत आहुति ६ नाहीं कां पडली ? अजून तुमच्या कोपाला विषय शिल्लकच आहे ?

१. विरहांत झोंप न येणें, स्वप्नसमागम दुर्लभ होणें, ही कविसमयसिद्धच गोष्ट आहे.
२. मूळांत 'भगवान्' असा शब्द आहे.

**सीता**—अम्मो ! मी अगदीं उन्मत्त झाल्यें !

**राम**—माझी ही सर्व बडबड अगदीं यथार्थ आहे.

पूर्वीं जेव्हां माझा व मुग्धाक्षी [सीतेचा] वियोग झाला तेव्हां उपाय तरी योजितां आले, व म्हणून वीरांच्या पराक्रमामुळें, तो [त्यांना व मलाही] सतत कांहींना कांहीं तरी उद्योगानें वेळ घालविण्यास कारण झाला होता; व त्यामुळें जगतांत अद्भुत रस निर्माण झाला. असा तो पूर्वींचा वियोग शत्रूच्या मृत्यूनें संपला गेला, पण आतांचा हा वियोग उपायांना अगोचर आहे, निमूटपणेंच सोसावयाचा आहे, व त्याला कोणती अवधिही नाहीं ! ४५*

**सीता**—'अवधिही नाहीं' ! तर मग माझें पुरेंच नशीब ओढवलें !

**राम**—हायरे दैवा !

* कैसा दुःखातें साहूं । कोठें सितेला पाहूं ॥ ध्रु० ॥
पूर्वीं दैवें मजला झाला स्त्रीचा वियोग जेव्हां ॥
होते भेटावयास तीतें शतशः उपाय तेव्हां ॥ ६३ ॥
पुढच्या आशेवर म्यां बहुधा कालक्रमणा केली ॥
आतां तीच्या भेटीचीही आशा नाहीं उरली ॥ ६४ ॥
मेळविलें म्यां वानरबळ तैं सेतु सागरीं रचिला ।
आतां कोणा सहाय घेऊं धीरचि माझा खचला ॥ ६५ ॥
तेव्हां शत्रूशीं म्यां दारुण युद्धप्रसंग केला ॥
आतां कोणाशीं मी भांडूं न सुचे उपाय मजला ॥ ६६ ॥
प्राणसखीचा म्यां दुर्भाग्यें बुध्द्या केला त्याग ॥
लावूं कोणा दोष अतां मी हें माझें अत्याग ॥ ६६ ॥
सीतामुक्तीकरितां रामें दशवदनाशीं केलें ॥
घोर युद्ध हें सर्व जनाला गाया कौतुक झालें ॥ ६८॥
पहिला वियोग रिपुघातावधि होता उघडाचि लोकीं ॥
आतांचा हा निरवधि आहे घालिल दुःसह शोकीं ॥६९॥

जेथें कपिश्रेष्ठ [सुग्रीवाचें] सख्य व्यर्थ—जेथें
कपींचें वीर्यही निरुपयोगी, आणि जांबवंताची[१]
बुद्धिही पण तशीच—ज्या ठिकाणीं वायुपुत्र
[हनूमंताची] गति नाहीं—जेथें विश्वकर्म्याचा
पुत्र नळ[२] हाही मार्ग बांधण्यास समर्थ नाहीं—
व प्रत्यक्ष सौमित्राचे[३] [लक्ष्मणाचे] बाणही जेथें
कुंठित होतात, अशा कोणत्या ठिकाणीं तरी,
प्रिये, तूं आहेस ? ४६*

**सीता**—एकूण पूर्वीचा वियोग बरा म्हणण्याची पाळी आली !

**राम**—सखि वासंती, रामाचें दर्शन इतउत्तर त्याच्या मित्रांच्या
३ दुःखासच कारण होणारें आहे. तुला मी किती वेळ उगीच रडवूं ?
मला आतां जाण्यास अनुज्ञा दे.

**सीता** (दुःखाचा अनिवार उमाळा येऊन व तमसेच्या गळीं पडून)—
६ भगवति तमसे ! आर्यपुत्र जाणार !

**तमसा**—बाळे, असा अगदींच धीर सोडूं नको. आम्हांलाही चिरं-
जीव कुशलवांच्या वाढदिवसाचें मंगल कृत्य करण्याकरितां भागी-
९ रथीच्या चरणांजवळ जावयाचें नाहीं का ? चल तर.

* व्यर्थ जेथें सुग्रीवसख्य व्हावें ॥
वानरांचेंही वीर्य वृथा जावें ॥ ७० ॥
जाबवंता न स्फुरे बुद्धि कांहीं ॥
वायुपुत्राची गती जेथ नाहीं ॥ ७१ ॥
विश्वकर्म्याचा पुत्र नळ त्याची ॥
मार्ग करण्याला शक्ति नाहिं साची ॥ ७२ ॥
लक्ष्मणाचे शर जेथ जाति वायां ॥
प्रिये असशी कोणत्या अशा ठायां ॥ ७४ ॥

१. सीताशुद्धीच्या वेळीं हनूमंतास प्रोत्साहन देऊन व युद्धांत रामलक्ष्मणादि सर्व सैन्य मूर्छित पडलें असतां संजीवनी वनस्पतीचा त्यास पत्ता सांगून यानें पुष्कळ साहाय्य केलें.

२. यानें सेतु बांधिला.

३. शालीनतेमुळें राम स्वतःचें नांव घेत नाहीं.

**सीता**—भगवति, कृपा करा. एक क्षणभर तरी या दुर्लभ जनास डोळे भरून पाहून घेऊं द्या.

१२**राम**—शिवाय आतां माझी अश्वमेधाकरितां केलेली सहधर्मचारिणी,–

**सीता** ( कांपऱ्या स्वरानें )—आर्यपुत्रा ! ती कोण ?

**राम**—म्हणजे सीतेची सुवर्णप्रतिमा,—तिकडे आहेच;—

१९**सीता**—आतां मात्र तुम्ही माझे खरे—खरे आर्यपुत्र ! अहाहा ! परित्यागरूपी[१] लज्जेचें शल्य [आजवर माझ्या मनांत सलत होतें तें] आतां मात्र आर्यपुत्रांनीं समूळ नाहींसें केलें.

१८**राम**—तेथें जाऊन अश्रूंनीं भरलेल्या नेत्रांनींच तिजकडे [पाहतां येईल तसें] पाहून मी मनाची करमणूक करून घेईन म्हणतों.

**सीता**—धन्य ती [सुवर्णप्रतिमा] जिचेविषयीं आर्यपुत्रांना एवढा २१बहुमान आहे व आर्यपुत्रांना विनोदवून जी या जीवलोकाच्या आशांचें एक केंद्र होऊन बसली आहे !

**तमसा** ( सखेद हंसून व स्नेहानें तिला कुरवाळून )—बाळे, ही २४आत्मस्तुतिच नव्हे कां ?

**सीता** ( लाजेनें मान खालीं घालून, स्वगत )—मीं स्वतःस भगवतींच्या उपहासास पात्र करून घेतलें !

२७**वासंती**—आपली भेट झाली हा आम्हांवर मोठा प्रसाद झाला. आतां जाण्यासंबंधानें म्हणाल तर ज्या रीतीनें आपल्या कार्यास व्यत्यय येणार नाहीं तसें करावें.

३०**सीता**—आज बरीक वासंती माझ्या मनाविरुद्ध वागत आहे.[२]

**तमसा**—चल, बाळे, आपणही जाऊं.

**सीता** ( कष्टानें )—बरें—जाऊं या.

३३**तमसा**—पण तूं कसची येणार ? जोपर्यंत तुझी—

१. आतां सीता 'निष्कारण' परित्यागाचें शल्य असें म्हणत नाहीं. अंकाचा मूळ उद्देश म्हणजे सीतेच्या मनांतील किंतु दूर करणें तो येथें पूर्ण झाला.

२. तिनें रामास आग्रहानें ठेऊन घ्यावयाचें होतें.

पतीकडे एकसारखी लागून राहिलेली—जणूं तेथें
रोंविलेली—व तृष्णेमुळें विशाल झालेली दृष्टि
तेथून मोठ्या प्रयासानें–आंतड्यांस पीळ पाडून–
तूं ओढून काढून घेतली नाहींस [ तोंपर्यंत जाणें
कसचें होतें ? ] ४७

**सीता**—अपूर्व पुण्याईमुळेंच ज्यांचें दर्शन फिरून लाभलें त्या आर्य-पुत्रांच्या चरणकमलांस नमन असो. ( मूर्छित होते. )

३ **तमसा**—बाळे, धीर धर, सावध हो.

**सीता** ( सावध होऊन )—अथवा पूर्णचंद्राचें अभ्रपटलामधून दर्शन झालेंच तर तें असें किती वेळ टिकूं शकेल[1] ?

६ **तमसा**—हें संविधानक किती रम्य[2] !

येथून तेथून एकच करुणरस यांत भरला आहे,
पण कारणपरत्वें निरनिराळ्या ठिकाणीं तो निर-
निराळ्या स्वरूपांमध्यें विभक्त झाला आहे. जसें
पाण्याचे भोंवरा, बुडबुडे, लाटा इत्यादि अनेक
विकार होतात पण मुळाशीं सर्व पाणी एक-
रूपच असतें.[3] ४८

१. अर्थात् अगदीं थोडा वेळ. तसेंच मला जो हा भेटीचा अल्पस्वल्प लाभ झाला तेवढ्यानेंच मी संतुष्ट असल्यें पाहिजे.

२. थोड्या वेळापूर्वी भवभूतीनें आत्मस्तुतीबद्दल सीतेची थट्टा केली. पण आतां तमसेच्या तोंडून भवभूतिही तेंच करीत आहे. किंबहुना भवभूतीस अशी संवयच आहे. मालतीमाधव १·४५[११], महावीरचरित ५·५८[१८], वगैरे स्थळें पहा. शेक्सपीयरमध्यें सुद्धां हा प्रकार अगदींच नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ Twelfth Night iii. 4. 140–1 पहा. संविधानक याचा दुसरा अर्थ 'योगायोग' असा करितां येईल.

३. हा दृष्टांत वेदांतशास्त्रांत नेहमीं येतो. तमसा ही नदीदेवता असल्यानें तिच्या भाषणांत आलेल्या उपमा सर्व पाण्याच्या असाव्यात हें साहजिक आहे. उदाहरणार्थ ३·१३च, ३·२४, ३·३०, ३·३५द्वि, ३·४३पू, इत्यादि स्थळें पहा.

**राम**—विमानश्रेष्ठा पुष्पका ! इकडे, इकडे.

( सर्व उठतात. )

३ **तमसा** व **वासंती** ( अनुक्रमें[1] सीता व राम यांस )—
अवनि, अमरसिंधु [ भागीरथी ], व आमच्या
सारख्या [ इतर देवता ]; कुलपति [ वाल्मीकि ]
ज्यानें छंदोमय वाणी प्रथम [ व्यवहारांत ] प्रचा-
रांत आणिली; तसेंच अरुंधतीसहवर्तमान ऋषि
वसिष्ठ;—हे सर्व तुजवर अनुग्रह करून तुझें
अनंत मंगल करोत ! ४९

( सर्व निघून जातात. )

## महाकविश्रीभवभूतिप्रणीत उत्तररामचरित नाटकाचा छाया नामक अंक तिसरा[2] समाप्त.

१. दोन पात्रांनीं एकच भाषण करणें—व विशेषतः प्रस्तुतसारखें एकादें लांबलचक भाषण करणें—अस्वाभाविक आहे. पण असे प्रसंग भवभूतीनें अनेक स्थळीं आणिले आहेत. उदाहरणार्थ पुढें ५·१६,१८,१९ पहा. जेथें असे श्लोक दोघांनीं मिळून म्हणावयाचे असतात तेथें मुख्य म्हणणारा एक व दुसरा त्यास सूर देतो असें होणें शक्य आहे. व त्यामुळें ही अस्वाभाविकता किंचित् कमी होईल एवढेंच.—राम निघाला तेव्हां तमसा व वासंती या उभयतांनीं त्यास आशीर्वाद देणें जरूर होतें. पण ' अनुक्रमें सीता व राम यांस ' हे शब्द चुकीचे दिसतात. तमसा व सीता मिळूनच भागीरथीकडे जाणार होत्या तेव्हां तमसेस आतांच सीतेला आशीर्वाद देण्याचें प्रयोजन काय ? माझ्या मतें हे शब्द प्राक्षिप्त असावेत, पण मला हे शब्द गाळून टाकण्यास आधार सांपडला नाहीं.

२. येथें नाटकाचा दुसरा व सर्वांत महत्वाचा भाग संपला. राम व सीता यांच्या मनाची बिघडलेली घडी फिरून नीट बसली. आतां उभयतांचें प्रत्यक्ष मीलन होणें एवढेंच कायतें राहिलें व तें कार्य उरलेल्या चार अंकांनीं घडून येणार आहे.

तिसऱ्या अंकाचा सर्व रोख अंतःसृष्टीकडे असल्यानें—सीतेच्या मनाचे होणारे सूक्ष्म फरक, लंबकाप्रमाणें होणारें तिच्या चित्तवृत्तीचें आंदोलन, मार्मिकपणें प्रेक्षकांसमोर मांडण्याचें कठिण काम कवीस करावयाचें असल्यामुळें—ज्यांचें मन आरंभापासून या मुख्य गोष्टीकडे वेधलें नसेल त्यांना या अंकांत येथून तेथून रडारड व मूर्छना याशिवाय दुसरें कांहींच दिसावयाचें नाहीं; व ते उत्तररामचरित हें श्राव्य काव्य आहे दृश्य नाहीं, व प्रयोगरूपानें तें प्रेक्षकांसमोर आणावयाचें झाल्यास त्यांत—व विशेषतः तिसऱ्या अंकांत—बरीच छाटाछाटी केली पाहिजे असें प्रतिपादन करीत असतात. कांहीं अंशीं हा आक्षेप बरोबर आहे व तो मागें पृष्ठ १५० टीप ३ यामध्यें सांगितल्याप्रमाणें कवीनेंही मान्य केला होता हें आपण पाहिलेंच. तथापि अंकाचें मुख्य ध्येय विचारांत घेतल्यास ( हा एक अपवाद खेरीज करून ) या अंकांत अन्यत्र कोठें विशेष छाटाछाटी करितां येईल असें मला वाटत नाहीं. कवीनें अमुक एक प्रश्न नाटकरूपानें सोडविण्यास कां घेतला हा सवाल करणें हें निराळें; व प्रश्न कोणता कां त्यानें निवडिला असेना कवि तो सोडविण्यामध्यें नाट्यकौशल्य कसें दाखवितो—मानवी विकारांचें त्यानें रेखाटलेलें प्रतिबिंब वस्तुस्थितीस विसंगत आहे कीं काय—याचा ऊहापोह करणें हें निराळें. शेक्सपीयरचीं बरींच नाटकें—प्रत्यक्ष Hamlet सुद्धां—अशा मनोविकारांच्या गुंतागुंतीस सर्वस्वीं वाहलेलीं आहेत ही गोष्ट महशूरच आहे.

आपण पंचवटींत जात आहों व तेथें आपणास रामाची गांठ पडणार आहे हें जिच्या स्वप्नीं सुद्धां नव्हतें ( पृष्ठ १३३ ) अशी सीता एकदम पंचवटींत येऊन दाखल होतांच तिच्या मनोवृत्ती उचंबळाव्या व आपण पुत्राप्रमाणें पोसलेल्या हत्तीच्या छाव्यावर संकट आलें आहे असें समजतांच तिचें भान हरपून तिनें रामास ‘ धांवा ’ म्हणून हांक मारावी ( ३·६[२] ) हें अगदीं साहजिक आहे; व त्यामुळें तमसा मुरला यांनीं ३·४ व ३·५ येथें वर्णिलेल्या विरहातुर व पतिपरायण सीतेच्या वस्तुस्थितीची साक्ष पटते. तथापि कपटानें केलेल्या निष्कारण परित्यागामुळें सीतेचें मन इतकें दुखविलें होतें कीं तिनें पंचवटींत रामाचा शब्द जेव्हां प्रथम ऐकिला (३·६[८]) तेव्हां, आपण ज्याप्रमाणें त्याचें, त्याप्रमाणें तोही आपलें चिंतन करीत उरलेले आयुष्याचे दिवस कसे तरी कष्टानें कंठीत असेल अशी कल्पनाही तिला झाली नाहीं; व म्हणून पुढें ती रामास आर्यपुत्र असें सुद्धां न म्हणतां ‘ राजा ’ या स्नेहशून्य नांवानें उल्लेखिते ( ३·७[५] टीप पहा ). येथून या अंकांत घडून येणाऱ्या सीतेच्या मानसिक फेरपालटीस सुरुवात होते.

पण रामाविषयींचा हा दुजाभाव पूर्वीं ( १.५१[६–७] ) एके प्रसंगीं सीतेनें भविष्य केल्याप्रमाणेंच त्याची व तिची दृष्टादृष्ट होतांच पार मावळून जातो. रामाचें इतक्या वर्षांनीं होणारें प्रथम दर्शन व त्याची त्या वेळची क्षीण, पांडुरवर्ण, व दुर्बल अशी मूर्ति पाहून ( ३·८[२] ) सीतेच्या अंतः-करणांत तिच्या सात्त्विक स्त्रीस्वभावास अनुरूप असा करुणायुक्त प्रेमाचा उमाळा उठला; व विशेषतः रामाचे शब्द ( ३·८ ) आपणासच उद्देशून आहेत—त्यास आपला अजून विसर पडला नाहीं—हें समजून येतांच ती आपलें दुःख सर्व विसरली; व राम मूर्छित झाला हें पाहतांच तम-सेच्या सांगण्यावरून ( ३.१० ) ती एकदम त्याच्या मदतीस धांवली ( ३·१०[२] ). आणि अशा वेळीं कोणती आर्यस्त्री होणारा प्रकार तटस्थ-पणें पहात उभी रहाती ?

राम सावध होऊन सीतेस आपल्या स्थितीचा विचार करावयास किंचित् संधि मिळतांच ती ' परवानगीवांचून आपण जवळ गेलों तर पति आपणावर रागावेल, आतां आपण परत जाऊं या ' असें आपण होऊनच तमसेस सुचविते ( ३·१२[८] ), यावरून तिच्या मनाचा कल आतां विरुद्ध दिशेस झुकूं लागला असें स्पष्ट होतें. तथापि ' अंतर्यामींच्या अगाध स्नेहाचें भांडार व्यक्त करणारे ' ( ३·१४[१] ) रामाचे शब्द पुनरपि तिच्या कानीं पडल्यामुळें या सर्व प्रकारचा ' मेळ कसा घालावयाचा ' ( ३·१२[१६] ) हेंच तिला समजेनासें होतें. या तिच्या विरुद्ध मनोविका-रांनीं ग्रासलेल्या हृदयाचें तमसेनें ३·१३ या श्लोकांत जें वर्णन केलें आहे तें अगदीं यथार्थ आहे.

इतक्यांत वासंती येते ( ३·१५[५] ) व रामास गोदावरींत क्रीडा करणाऱ्या हत्तीच्या छाव्यास पहाण्याकरितां घेऊन जाते. आतां सीता आपण होऊ-नच रामापाठीमागून जाण्याची गोष्ट काढीत आहे ( ३·१५[२२] ); पूर्वींप्रमाणें ( ३·१०[१] ) तमसेची आज्ञा लागत नाहीं ! तेथें गेल्यावर पुत्रवत् पाळिलेल्या हत्ती, मोर, कदंब, इत्यादिकांस पाहून सीतेच्या मनांत पुत्रप्रेम उत्पन्न होतें व साहजिकच तिला कुशलवांची आठवण होते ( ३·१७[२] ). आपल्या स्वतःच्या सुखाकरितां नव्हे तर आपल्या पुत्रांच्या भावि कल्याणाकरितां तरी आपण पतिगृहीं असावें असें पतीच्या प्रेमास पारखी झालेल्या स्त्रीस सुद्धां वाटत असतें, मग सीतेस तसें वाटेल यांत नवल काय ? ( ३·१७[१–१३], ३·१७[१५–१८], इत्यादि स्थळें पहा ). ३·१५[२४] पासून ३·२५[१] येथपावेतों सीतेच्या मनोविकारांत हा एकच फरक झाला आहे. एवढा फरक होण्यास इतका ग्रंथ नको

होता. पण पुढें नाटकाच्या सोयीसाठीं वगळला जाणारा सुमारें चार श्लोक व २० ओळी गद्य एवढा मोठा भाग याच ठिकाणीं आला आहे. ( पृष्ठ १५० टीप ३ पहा ).

यानंतर वासंती व राम यांचेमधील सीताविषयक संभाषणास प्रारंभ होतो (३·२५$^{२}$). कोणी एका विनोदी ग्रंथकारानें पतिपत्नी यांस कातरीच्या दोन पात्यांची उपमा दिली आहे. जेव्हां तीं दोघेंच असतात तेव्हां एकमेकांशींच त्यांचें भांडण होत असतें; पण जर कां त्या भांडणांत ( कागदासारखा ) कोणी तिसरा पडला तर उभयतां विरुद्ध दिशांनीं त्याजवर तुटून पडतात ! ह्या उपमेचा पूर्वार्ध अर्थात् सीताराम यांच्यामधील असलेल्या संबंधास लागू पडत नाहीं; पण उत्तरार्ध मात्र पृष्ठ १५२ टीप ३ येथें दाखविल्याप्रमाणें खरा पडतो. ( उदाहरणार्थ, ३·२६$^{१०-१३}$, ३·२८$^{२-३}$, वगैरे स्थळें पहा ). या संभाषणांमध्यें वासंतीच्या प्रश्नास राम जे जबाब देतो त्यावरून आपणास रामानें कां टाकिलें (३·२८$^{६}$, ३·३३), टाकिताना व त्यानंतरही रामाचें मन किती व्यथित होत होतें (३·३२,३६,३७), व त्याची आपल्यावरची प्रीति किती अढळ आहे हें सीतेस समजून येतें. व तमसाही रामाच्या वतीनें बोलून (३·३०–३१) सीतेच्या मनांत रामाविषयीं रागाच्या ऐवजीं दया व प्रेमयुक्त सहानुभूति उत्पन्न करण्याचा प्रयत्न करिते. याचा परिणाम असा होतो कीं पूर्वीं स्वतःच्या दैवास दोष देऊन (३·२२$^{७-९}$) हंवालदील झालेली सीता आतां झालेल्या गोष्टींत जणूं काय स्वतःचाच अपराध आहे असें मानून (३·३६$^{१}$, ३·३९$^{३}$) ती आपणालाच दोष देऊं लागते. मान, अपमान, न्याय, अन्याय इत्यादि सर्व कल्पना आतां सीतेनें टाकून दिल्या आहेत. आपण आर्यपुत्रांच्या दुःखास कारण झालों या एकच गोष्टीची जाणीव तिला असते. अन्य कोणतेही स्वार्थाचे विचार तिला स्पर्श करीत नाहींत. पतिव्रता साध्वीस सर्वांशीं भूषविणारा हा आत्मयज्ञ ३·४०$^{१०-१४}$ येथें अगदीं परमावधीस गेला आहे. तिचा अहंकार सर्व मावळून आतां त्या ठिकाणीं जवळ जवळ दास्यत्वाची कल्पना रूढ होऊं पहात आहे. पण सीतेच्या प्रेमळ पण मानी, सहनशील पण करारी स्वभावास असें होणें हेंही उचित नव्हतें (३·४१$^{२}$). तमसेचें किंचित् थट्टेचें भाषण (३·४३) तिला वेळींच जागी करितें ( पहा ३·४३$^{१-४}$ ). सीतेच्या मनाचा प्रवाह फिरून एकवार उलट दिशेस वाहूं लागला; मात्र त्याचा वेग पूर्वीं इतका (३·१२$^{८}$) प्रचंड नाहीं.

कारण आतां सर्व प्रश्न उघड उघड 'लोक काय म्हणतील ?' हा आहे. सीतेच्या मनाची खात्री व्हावयाची ती झाली ( ३·४३[२] ). पण लोकांच्या बोलण्यावरूनच आपणास टाकिलें, तेव्हां लोकांचें बोलणें काय न करूं शकेल ? हे व असल्या तऱ्हेचे विचार सीतेच्या मनांत घोळूं लागतात; व ३·४३[११], ३·४३[२३] हीं तिचीं वाक्यें याच विचाराचीं दर्शक आहेत. जनप्रवाद कायमचाच आहे तेव्हां हा वियोगही आमरण आपणांस भोगावा लागणार असें रामाच्याच तोंडून तिला कळतांच ( ३·४५[१] ) या जनप्रवादामुळें—लोकांच्या मर्जीखातर—राज्यास वारस पाहिजे म्हणून—आपला पति दुसरें लग्न तर करणार नाहींना असाही विचार क्षणैक तिच्या मनांत आला असावा ( ३·४६[१] ). पण तो येतो न येतो तोंच रामाचें जेव्हां तिला त्या संबंधांत आश्वासन मिळतें इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष रामाची कृतिही तशीच आहे हें जेव्हां तिला कळून येतें ( ३·४६[१५] ) तेव्हां आतां तिच्या मनांतील शंकाकुशंका सर्व दूर होतात; व 'परित्यागरूपी लज्जेचें शल्य आतां मात्र आर्यपुत्रांनीं समूळ नाहींसें केलें' असा ती कबुलीजबाब देते. पतीशीं प्रत्यक्ष समागम होवो न होवो. तो प्रश्न सीतेच्या मतें गौण होय. पतीचें आपणावर अखंड प्रेम असलें म्हणजे मग अन्य अपरिहार्य अडचणींमुळें अथवा दैवदुर्विपाकामुळें त्याची आपली ताटातूट झाली तरी चालेल. त्याला भिणारी सीता नव्हती ( १·१२[१] पहा ). सीतेच्या मनाची याप्रमाणें खात्री पटल्यावर पुढें राम अयोध्येस जाणार व आपणास अंतरणार या विचारानें जरी तिला दुःख झालें तरी ती लगेच त्याजबद्दल आपलें आपण समाधान करून घेत आहे (३·४७[४–५]).

अंकाचें कार्य याप्रमाणें पूर्ण झालें. या अंकांत कवीनें आपलें सर्व सामर्थ्य एकवटून सीता या प्रेमळ, मानी, निश्चयी, सहनशील व पतिपरायण साध्वीचें चित्र काढिलें आहे. व तें अप्रतिम व सर्वांगसुंदर असें साधलें आहे. काव्यांमध्यें नाटक, नाटकांत शाकुंतल व शाकुंतलांत चवथा अंक वगैरे जसें म्हटलें आहे त्याप्रमाणें काव्यांमध्यें नाटक, नाटकांत उत्तररामचरित व उत्तररामचरितांत तिसरा अंक अशा रीतीनें वर्णन केलें असतां शोभेल इतक्या दर्जाचा हा अंक आहे. आपलें सर्व लक्ष या अंकांत सीतेकडे इतक्या एकतानतेनें लागलें असतें कीं या अंकांतील पशुपक्ष्यांचीं वगैरे जीं प्रतिभायुक्त व रसभरित वर्णनें आहेत तिकडे आपलें लक्षच जात नाहीं, पण त्यांकडे म्हणजे कवीनें आपलें कौशल्य कमी खर्च केलें आहे असें नाहीं. अंकांतील कविताही प्रसादपूर्ण आहेत; त्यांमध्यें व अन्यत्रही

क्लिष्टता अगदीं क्वचितच आहे—नाहींच म्हटलें तरी चालेल. एक दोन किरकोळ दोष आहेत (पृष्ठ १६७ टीप २ वगैरे) पण जमेस धरण्याजोगे नाहींत. करुणरसाची तर या अंकांत अगदीं सीमा झाली आहे. 'कारुण्यं भवभूतिरेव तनुते '—करुणरस असा भवभूतीनेंच साधावा; अथवा गोवर्धन सप्तशतीमध्यें उत्तररामचरित १·२८ या श्लोकाच्या ४ थ्या चरणास अनुलक्षून म्हटल्याप्रमाणें—भवभूतेः संबंधाद्भूधरभूरेव भारती भाति। एतत्कृतकारुण्ये किमन्यथा रोदिति ग्रावा ॥ (भवभूतिसंबंधानें पहातां सरस्वती ही पर्वताची कन्या म्हणजे पार्वतीच असावी असें वाटतें. कारण एरवीं त्याच्या करुणरसानें पाषाण कसा रडावयास लागेल ? )—असेंच खरें असें म्हणावें लागतें. शाकुंतलाच्या चवथ्या अंकाच्या त्याप्रमाणें उत्तररामचरिताच्या तिसऱ्या अंकाच्या पानांवर ज्याच्या डोळ्यांतून टिपें गळलीं नाहींत असा सहृदय वाचक विरळा.

आतां यापुढें प्रस्तुत नाटकाच्या तिसऱ्या व शेवटच्या भागाकडे वळावयाचें. नाटकास पहिल्या अंकानें जोरदार व कार्यक्षम प्रारंभ करून देण्यामध्यें भवभूतीनें जें असाधारण नैपुण्य दाखविलें आहे, व मध्यें तिसऱ्या अंकांतील ऐन आणिबाणीच्या प्रसंगीं जी त्याची अलोट सहृदयता व मार्मिकता आपल्या प्रचीतीस नुकतीच आली आहे, त्यांवर विरजण न पडेल अशा तऱ्हेनें जर नाट्यवस्तूचा ( ह्याला इंग्रजींत plot म्हणतात ) कवीनें समारोप केला—विशेषतः ज्यांमध्यें मनाच्या विकृतींपेक्षां हाताच्या कृतींचाच जास्त अंश आहे व असला पाहिजे अशा शेवटच्या चार अंकांतील कार्य कवीनें योग्य प्रकारें पार पाडलें—तरच उत्तररामचरित हें नाटक सर्वांगसुंदर आहे असें म्हणतां येईल. या अखेरच्या कसोटीस भवभूति कसा काय उतरतो तें आतां आपण पाहूं या.

# अंक चौथा

( तदनंतर दोन तापसकुमार प्रवेश करितात. )

**पहिला**—सौधातके, आज हे [एकदम] अनेक अतिथी प्राप्त झाले
३ आहेत त्यांच्या बरदास्तीची विशेष तयारी चालल्यानें भगवान् वाल्मीकींच्या या आश्रमपदास कशी अपूर्व शोभा आली आहे हें पाहिलेंस कां ?—

सांव्याच्या भाताची ऊन ऊन व स्वादिष्ट पेज
नुकत्याच प्रसविलेल्या मृगीपुढें ठेविली आहे, व
तिनें पिऊन उरलेली[1] हा तपोवनांतील मृग यथेच्छ
पीत आहे. कर्कंधूचीं[2] फळें घालून केलेल्या भाज्या
शिजत असतांना जो घमघमाट सुटला आहे
त्यांतच तूप टाकून शिजविलेल्या भाताच्या चोहोंकडे पसरणाऱ्या वासाची थोडी भर पडून त्या-
मुळें सर्व आश्रम दरवळून गेला आहे. १

**सौधातकि**[3]—ह्या पिकलेल्या दाढीमिशावाल्यांमुळेंच आज आमचा अनध्याय पडला, तेव्हां यांना स्वागतम् [ सुस्वागतम् ].

३ **पहिला** ( हंसून )—वा: सौधातके, [ स्वागत म्हणून ] हा जो गुरुजनांचा बहुमान केलास त्यांतील हेतु थोडासा अपूर्व दिसतो !

**सौधातकि**—पण भांडायना, मी असें विचारितों ह्या म्हाताऱ्याकोताऱ्यांच्या लांबलचक तांड्याचा हा म्होरक्या म्हणून जो अतिथि आला आहे त्याचें नांव काय ?

१. व्याघ्रादिक क्रूर पशूंमध्यें सुद्धां अशा वेळीं स्त्रीप्रेम उद्भवतें; मग हा तर मृग आणि त्यांतून तपोवनांतला.

२. बदर अथवा बोरकूट. इसलामपुरकर याला कांकडी म्हणतात.

३. हा द्वाड असून खेळाडू होता व वयानें लहान होता. ह्याला अद्याप शुद्ध वर्णोच्चार करितां येत नाहीं म्हणून हा संस्कृत न बोलतां प्राकृत ऊर्फ बालभाषा वापरितो.

**भांडायन**—धिक्कार असो तुझ्या थट्टेला ! अरे, अरुंधतीसहवर्तमान,
९ आणि दशरथ महाराजांच्या स्त्रियांना बरोबर घेऊन, ऋष्यशृंगाच्या आश्रमाहून आलेला हा भगवान् वसिष्ठ; आणि अशी बडबड काय चालविली आहेस ?

१२ **सौधातकि**—हं ! वसिष्ठ ?

**भांडायन**—हो तर.

**सौधातकि**—मला आपलें वाटलें हा कोणीतरी वाघोबा नाहींतर
१५ लांडगोबा असेल.

**भांडायन**—आँ ! काय, काय म्हटलेंस ?

**सौधातकि**—नाहीं तर काय ? येतांक्षणींच त्यानें ती आमची
१८ बिचारी कालवड मटकावून टाकली !

**भांडायन**—'मांसमिश्र मधुपर्क असावा' ह्या वेदवचनाचा मान ठेविण्यासाठीं गृहस्थाश्रमी लोक वेदनिष्ठ अतिथीकारणें एकादी काल-
२१ वड अथवा गोऱ्हा अथवा बोकड मारून त्याचें मांस अर्पण करितात. आणि ह्या धर्मास धर्मसूत्रकारांची सुद्धां संमति आहे.[1]

**सौधातकि**—मग राजेश्री आपणाला मीं पकडलें.[2]

२४ **भांडायन**—तें कसें काय ?

**सौधातकि**—कारण वसिष्ठादिक मंडळी आली तेव्हां कालवड मारिली; पण आजच त्यानंतर राजर्षि जनक आला असतां भगवान्

१. नुसतें वेदवचन आहे एवढें म्हणून भागत नाहीं. तें वचन विधिपर आहे किंवा अर्थवादपर आहे; प्रकरणसंगति पाहिली असतां त्या वचनाचा आपाततः दिसतो तोच अर्थ घ्यावयाचा, किंवा दुसरा लाक्षणिक अर्थ विवक्षित आहे हें ठरविलें पाहिजे. धर्मसूत्रकारांनीं मीमांसेच्या नियमांस अनुसरून एकदां अर्थ निश्चित करून टाकिला म्हणजे प्रश्नच संपला. आपण केलेल्या विधानास कोणी हरकत घेऊं नये एवढ्याच करितां भांडायनानें धर्मशास्त्राचा हवाला दिला.

२. न्यायशास्त्राच्या परिभाषेप्रमाणें म्हणावयाचें म्हणजे भांडायनाच्या विधानांत 'निग्रहस्थान' आहे. न्यायसूत्र ५·२[1] पहा. मूळांत णिगिहिदो=निगृहीतः हाच शब्द आहे.

२७वाल्मीकींनीं सुद्धां मध आणि दहीं यांनींच मधुपर्क उरकिला. कालवड वगळिली.[1] हें कसें ?

**भांडायन**—मीं सांगितलेला विधि ज्यांनीं मांस वर्ज्य केलें नसेल ३०त्यांचेकरितांच करावा असें ऋषींचें मत आहे. आणि परमपूज्य जनकानें तर मांस वर्ज्य केलें आहे.

**सौधातकि**—तें कां म्हणून ?

३३**भांडायन**—देवी सीतेचा दुर्दैवानें तशा प्रकारचा परिणाम झालेला ऐकून त्यानें तत्क्षणींच वैखानस वृत्ति[2] धारण केली व आज किती-

१. सौधातकीच्या प्रत्येक शब्दांत एकेक खोंच आहे. जनक 'आजच' आला; काल किंवा उद्यां असता तर कदाचित् 'तो नियम बदलला' असें म्हणतां आलें असतें. बरें आज सुद्धां वसिष्ठाच्या 'नंतर'; अगोदर असता तर पहिल्या खेपेस विसरून राहिलें असें म्हणतां आलें असतें. वेदवचनाप्रमाणें वेदानिष्ठ अतिथीकारणें समांस मधुपर्क गृहस्थांनीं द्यावयाचा आहे. जनक 'राजर्षि' आहे तेव्हां त्याच्या पात्रतेबद्दल प्रश्न नाहीं; व प्रत्यक्ष 'भगवान्' वाल्मीकींच्या घरीं पाहुणे आलेले तेव्हां गृहस्थाश्रमींचा आचार त्यांस अवगत नव्हता असें म्हणतां येणार नाहीं. एवढ्यानेंही सौधातकिचें समाधान होत नाहीं. द्यावयाला कालवड वगैरे नव्हती तेव्हां मध व दहीं यांनीं तूर्त कार्य उरकून घेऊन कालवडीचा संकल्प सोडिला असेल तर तसेंही नाहीं. कालवड अजिबात 'वगळिली'. येथें मूळांत विसज्जिदा=विसर्जिता=सोडिली असें आहे व कित्येक याचा अर्थ कालवडीची पूजा करून तिला मोकळी सोडून दिली असा करितात; पण आम्हांस पहिलाच अर्थ विवक्षित दिसतो. 'निग्रहस्थाना'पासून ज्या ज्या युक्तींनीं सुटका झाली असती त्या सर्व युक्त्या ध्यानांत आणून सौधातकीनें आपल्यामतें भांडायनास चांगलें पेचांत आणिलें. पण भांडायनानें निराळ्याच रीतीनें आपली सुटका करून घेतली.

२. वानप्रस्थासारखाच हा एक प्रकार आहे व त्यांत ब्रह्मचर्य पाळावें लागतें. शाकुंतल नाटकांतील १·२७ 'वैखानसं किमनया व्रतमाप्रदानाद्व्यापाररोधि मदनस्य निषेवितव्यम् ।' हा श्लोक प्रसिद्धच आहे. वाल्मीकिरामायण आश्रमांतील शिष्यवर्गास ठाऊक होतें. तेव्हां सीतेबद्दलची माहिती मुलांस असणें अस्वाभाविक नाहीं. शिवाय वाल्मीकीचा आश्रम तमसातीरीं आणि अयोध्येपासून फारसा दूर नव्हता. मागें २·४^६ पहा.

तरी वर्षें तो चंद्रद्वीप नामक तपोवनांत राहून तपश्चर्या करीत आहे.

३६ **सौधातकि**—मग तेथून येथें कशाला आला[1]?

**भांडायन**—फार दिवसांचा प्रिय मित्र वरुणपुत्र [ वाल्मीकि ] यास भेटण्याकरितां.

३९ **सौधातकि**—मग विहिणींची [ दशरथाच्या स्त्रियांची ] व त्याची आज गांठबीठ पडली कीं नाहीं[1] ?

**भांडायन**—भगवान् वसिष्ठांनीं नुकतेंच भगवती अरुंधतीला कौसल्या

४२ देवीकडे—'स्वत: जाऊन विदेहराज [जनकास] भेटावें'—असा निरोप घेऊन पाठविलें आहे.

**सौधातकि**—तर मग हे बुढ्ढे बुढ्ढे लोक जसे एकेठिकाणीं होणार

४५ आहेत तसे आपणही सर्व पोरांना जमवून, आज अनध्यायाचा आनंदाचा दिवस आहे, तेव्हां [ निरनिराळे मौजेचे ] खेळ खेळूं या.

( उभयतां इकडे तिकडे फिरतात. )

४८ **भांडायन**—[ चला. ] आणि हा पहा तो पुरातन ब्रह्मवेत्ता, राजर्षि जनक, वाल्मीकीची व वसिष्ठाची भेट घेऊन आतां हा आश्रमाबाहेरच्या या झाडाच्या बुंध्याजवळ [ सावलींत ] बसला आहे. हा

५१ [ राजर्षि ]—

जसा एकादा जुना [ वठलेला ] वृक्ष ढोलींत धुम-
सणाऱ्या अग्नीमुळें करपून जावा, तद्वत् हृदयामध्यें
सदोदित जागृत असलेल्या सीताविषयक शोका-
ग्नीनें पोळून गेला आहे. २

( उभयतां जातात. )

## विष्कंभक[2]

१. हे प्रश्न वादांत आपला पराभव झाला म्हणून किंचित् चिडून विचारिलेले व वकिली धोरणाचे आहेत. पण सौधातकीचा राग खेळापुढें कांहीं फार वेळ टिकत नाहीं.

२. हा विष्कंभक भवभूतीनें लिहिलेल्या सर्व विष्कंभकांत अत्यंत सरस आहे. तिसऱ्या अंकांत सर्वत्र करुणरस पसरला होता व प्रेक्षकांच्या मनोवृत्ती त्या

खालीं बऱ्याच दडपून गेल्या होत्या. त्यांना आतां विश्रांति देणें जरूर होतें व खरी विश्रांति म्हणजे आपण ज्या प्रकारचें काम करीत होतों त्याच्याविरुद्ध ( म्हणजे ज्या अवयवांना अथवा मनोवृत्तींना पूर्वीं वाव मिळाला नाहीं त्यांना वाव देणारें, व वाव मिळाला त्यांना स्वस्थ पडूं देणारें ) काम करणें हीच होय. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे जनस्थानांतल्या भयाण महारण्याच्या ऐवजीं वाल्मीकिमहर्षींचें सौम्य तपोवन ( ज्यामधील पशू सुद्धां मनुष्यधर्म पाळितात ४·१ च ) आणि वृद्ध व शोकानें आणि काळजीनें चूर झालेल्या मनुष्यांच्या ऐवजीं लहान लहान, गोजिरवाणे, आनंदी, व उत्साहपूर्ण बालक, तसेंच रडण्याच्या ऐवजीं हंसणें व शोकाच्या ऐवजीं विनोद हा फेरफार एकंदरींत चांगला व सकारण झाला आहे.

विष्कंभाचे द्वारा नाटकांत जे कार्य करून घ्यावयाचें तेंही येथें उत्कृष्ट रीतीनें—अगदीं सहजासहजीं—उरकून घेतलें आहे. नाटकाचे उरलेले सर्व अंक आतां वाल्मीकीच्या आश्रमाजवळच घडून यावयाचे आहेत (सातवा अंक गंगातटाकीं आहे, पण वाल्मीकीच्या आश्रमापासून गंगा फारशी लांब नव्हती ) तेव्हां त्या आश्रमाची प्रथम ओळख करून दिली. व ज्या पात्रांचें पुढें कार्य आहे त्यांच्या आगमनाचीही सूचना देऊन ठेविली. नवीन पाहुणे आले व त्यांच्याकरितां सुट्टी मिळून शिवाय मेजवानीची वगैरे विशेष तयारी चालली आहे; याहून लहान मुलांना संभाषणास अधिक योग्य विषय तो कोणता ? पण त्यांतल्या त्यांत अरुंधती, वसिष्ठ, कौसल्या इत्यादिकांचें आगमन ज्या तऱ्हेनें सुचविलें आहे त्यापेक्षां त्याच दिवशीं अवचित प्राप्त झालेल्या जनकाचें आगमन सुचविण्याची तऱ्हा ( ४·१[२५–२८] ) विशेष रम्य आहे. तिजमुळें दुसरेंही एक कार्य साधलें आहे. भांडायन व सौधातकि या चाणाक्ष व चौकस जोडीच्या द्वारा, ज्या एका कालीं भरतखंडामध्यें अनेक वादविवादनिपुण आचार्य व उपदेष्टे होऊन गेले व ज्यांच्या कृतीबद्दल आम्हांस अजूनही सादर कौतुक वाटतें ( शंकराचार्यांचा काल भवभूतीच्या कालापासून फारसा लांब नव्हता ) त्या कालच्या आमच्या प्राचीन विद्यापीठांतून कोणत्या दर्जाचे विद्यार्थी तयार होत होते हें भवभूतीनें आपणांपुढें स्पष्ट मांडिलें आहे. पुस्तकी ज्ञान त्यांच्या कृतींत कसें पावलोपावलीं उतरत आहे याचें वर पृष्ठ १७५ व १७६ यांतील टीपांत दिग्दर्शन केलें आहेच. सौधातकीपेक्षां भांडायन वयानें व बुद्धिमत्तेनें थोडासा अधिक आहे. त्याला सर्व आल्यागेल्यांची व आश्रमांत काय होतें सवरतें त्याची जी माहिती आहे ( पुढें ६ व्या

( तदनंतर जनक प्रवेश करितो. )

**जनक**—माझ्या कन्येवर दुर्दैवाचा जो हा असा प्रचंड, काळजास घरें पाडण्यासारखा तीव्र घाला आला आहे त्यामुळें अंतरीं ज्या व्यथा होत आहेत व त्याबरोबरच संतापातिशयानें अंगाचा जो आज कितीतरी वर्षें एकसारखा भडका होत आहे त्याचा वेग नवेपणीं होता तितकाच अजून भासत आहे व करवताप्रमाणें तो माझ्या मर्मस्थानास कांपित आहे—अद्यापि त्याची शांति म्हणून होत नाहीं ! ३

हाय हाय, कोण कष्ट हे ! हें माझें शरीर जरेनें व दुःसह दुःखानें ग्रासिलेलें तर आहेच; शिवाय पराक,[1] सांतपन,[2] इत्यादि अनेक

अंकांत भरताश्रमाहून परत आलेला कुश खरा प्रकार कळण्याकरितां याच भांडायनासच प्रश्न विचारित आहे हें लक्षांत घ्यावें) त्यावरून तो वाल्मीकीच्या प्रिय शिष्यांपैकीं एक—आश्रमाचा व्यवस्थापक किंवा असल्याच एकाद्या कामावर नेमिलेला—विद्यार्थि असावा असें अनुमान होतें.

हा विष्कंभक लहान, सर्वांगसुंदर व कार्यक्षम आहेच; पण यांत एक दोष आहेसा वाटतो. जनकराजा याच वेळीं आश्रमांत आला याचें कारण म्हणून जें सांगितलें आहे ( ४·१[३७]) तें इतकेंसें समाधानकारक नाहीं. याहून अधिक सयुक्तिक कारण संभवतें तें असें कीं, पुढें काय होणार ह्याची आगाऊच तरतुद करणाऱ्या त्रिकालज्ञ वाल्मीकिमुनींनीं जनकास कदाचित् मुद्दाम पाचारण केलें असेल. पण वस्तुस्थिति तशी असली तरी भांडायनास त्याची माहिती असणें शक्य नव्हतें.

या विष्कंभकांत कुशलवांचा उल्लेख नाहीं तो पाहिजे होता हा दुसरा एक दोष कित्येक दाखवितील; पण आमच्या मतें तो दोष नसून गुणच आहे. कुशलव वाल्मीकीच्या आश्रमांत आहेत हें प्रेक्षकांस दुसऱ्या अंकाच्या आरंभींच कळून चुकलें आहे. ती आठवण पुनः करून देण्यापेक्षां कौशल्याजनकांप्रमाणेंच प्रेक्षकांनाही लव रंगभूमीवर प्रत्यक्ष येतो त्यावेळीं थोडें बुचकळ्यांत पाडल्यासारखें करणें नाट्यदृष्ट्या विशेष चांगलें. असो.

१. लागोपाट बारा दिवसांचा उपवास.

२. दूध, दहीं, तूप, इत्यादि गाईपासून प्राप्त झालेले पदार्थच केवळ खाऊन राहणें.

३ प्रकारच्या तपश्चरणांनीं त्यांतील सर्व रस व धातु शुष्क झाले आहेत; त्यास आधार म्हणून कसला राहिला नाहीं; तरी तें अद्यापि पतन पावत नाहीं, याला काय म्हणावें ! [ बरें, बळेंच देहत्याग करावा
६ तर ] सूर्यरहित[1] व काळ्या कुट्ट अंधकारानें व्याप्त असे जे लोक आहेत त्या लोकांमध्यें आत्मघातक्यांना गति मिळते, असें ऋषींनीं सांगितलें आहे. आज इतकीं वर्षें लोटलीं तरी माझ्या दुःखाचा हा
९ दारुण वेग नवेपणीं होता तितकाच राहिला आहे व क्षणोक्षणीं त्याच [ दुःखाचें ] चिंतन होत गेल्यानें तो अधिक अधिक जाणवत मात्र आहे. बाळे ! यज्ञस्थंडिलांतून उत्पन्न झालेले बाई सीते ! तुझा दैव-
१२दुर्विपाक असा कां जुळून यावा कीं, मला लोकलज्जेस्तव धाय मोकलून रडण्याची सुद्धां चोरी असावी ! हाय हाय, लाडके !—

लहानपणचें तुझें तें गोजिरवाणें मुखकमल—
ज्याच्यावर केव्हां रोदन दिसेल व केव्हां हास्य
दिसेल याचा मुळीं धरबंधच नव्हता—लहान
लहान कोंवळ्या दातांच्या अणकुचीदार कळ्यांनीं
जें सदोदित प्रफुल्ल असे—व कांहीं तरी अडख-
ळत अडखळत बोलतांना जें [ अत्यंत ] रम्य
दिसत असे;—अजून तें माझ्या डोळ्यांसमोरून
दूर होत नाहीं ! ४*

* बाइ माझे लाडके सिताबाई ॥
बाळपणचें कौतूक सांगु काई ॥ ५ ॥
बाळपणीं पाहतां तुझें मूख ॥
होय मजला तें काय वदूं सूख ॥६॥
विनाकारण रोदन हास्य यावें ॥
तिहीं वदनातें फार शोभवावें ॥ ७ ॥

१. 'असूर्य' हें लोकाचें विशेषनाम. असूर्य=सूर्यरहित हाच अर्थ येथें विवक्षित आहे. इतरत्र असूर्य=असूर=Assyrians असाही अर्थ होऊं शकतो. ह्या श्लोकामध्यें 'असूर्या नाम ते लोका अन्धेन तमसा वृत्ताः' इत्यादि वैदिक मंत्राची छाया आहे. किंबहुना जनकाचें सर्व भाषणच आर्षसंस्कारानें युक्त आहे.

हे भगवति वसुंधरे, तुझें हृदय खरोखरीच [दगडासारखें] कठिण !—

तूं म्हण किंवा अग्नि म्हण किंवा महर्षी,
वसिष्ठपत्नी [ अरुंधती ], अथवा भागीरथी म्हण;
फार काय सांगावें ? प्रत्यक्ष रघुकुलगुरु भगवान्
सविता—या सर्वांना जिचें थोर शील अवगत होतें;
वाणीनें जसा विद्येस जन्म द्यावा तद्वत् तूं स्वत:
जिला जन्म दिलास, व विद्येप्रमाणेंच जी दैवतस्व-
रूपी मानिली जावी;—त्या तुझ्या कन्येची तशा-
प्रकारची ती घोर विपत्ति, हे कठोरे, तुझ्यानें सहन
करविली तरी कशी ? ५

**पडद्यांत**—असें इकडून भगवति—इकडून यावें महाराणीसरकार.

**जनक** ( पाहून )—अरे, हा गृष्टि[1] भगवती अरुंधतींना इकडे घेऊन
३ येत आहे. (उठून[2]) पण ' महाराणीसरकार ' या नांवानें कोणास
संबोधित आहे ? (न्याहाळून) काय ! दशरथमहाराजांची धर्मपत्नी—
माझी प्रिय सखी—ही कौसल्याच काय ? तीच ही, हें खरें तरी
६ कोणास वाटेल कां ?—

दशरथाच्या घरामध्यें ही लक्ष्मीसारखी वाव-
रत असे—अथवा 'सारखी' कशाला ? ही
प्रत्यक्ष लक्ष्मीच मूर्तिमंत होती. पण हाय हाय !
आज दैवाच्या फेऱ्यांत सांपडल्यानें हा प्राणी
निराळाच—प्रत्यक्ष दु:खाचा पुतळाच—बनला

थोडथोड्या कोंवळ्या दंतपंक्ती ॥
जयामाजीं उगवल्या शुभ्रकांती ॥८॥
जयापासून बोबडे बोल गोड ॥
निघुनि माझें पुरविती सर्व कोड ॥९॥

१. हें कंचुकीचें नांव.
२. जनक अरुंधतीस पाहतांच तिच्या सन्मानार्थ उठून उभा रहातो.

आहे. काय हें स्थित्यंतर ! ६*

हें एक दुसरें दारुण स्थित्यंतर—

जो प्राणी एके कालीं मला साक्षात् महोत्सवा-
प्रमाणें [प्रिय] होता त्याचेंच दर्शन आज मला
क्षतांत पडलेल्या क्षाराप्रमाणें असह्य झालें आहे ! ७

( तदनंतर अरुंधती, कौसल्या व कंचुकी प्रवेश करितात. )

**अरुंधती**—पण मी म्हणत्यें ‘ स्वतः जाऊन विदेहराज [ जनकास ]
३ भेटावें ’ अशी कुलगुरूंची[1] आज्ञा आहे; आणि म्हणूनच मला पाठ-
विली; तर मग पावलागणिक असें अडखळावें काय बरें ?

**कंचुकी**—राणीसरकार, मन स्थिर करून भगवान् वसिष्ठांच्या आज्ञे-
६ प्रमाणें वागावें अशी मी आपणास विनंति करितों.

**कौसल्या**—अशा या वेळीं मिथिलेश्वर [ जनकाची ] भेट घ्याव-
याची या [ विचारानेंच ] एकदम सर्व दुःखें कशीं उभीं रहातात;
९ हृदय समूळ उमळून पडतेंसें वाटतें; माझ्यानें तें सांवरून धरवत नाहीं.

**अरुंधती**—बरोबर; तूं म्हणतेस तें अगदीं साहजिक आहे.—

प्रिय जनांच्या [ आत्यंतिक ] विरहामुळें[2] उत्पन्न
झालेलें दुःख जरी नेहमींचेंच असलें तरी एकाद्या
मायेच्या माणसाची गांठ पडली म्हणजे त्याला
उमाळा येऊन जणूं काय तें हजार वाटांनीं एक-
दम वाहूं लागतें. ८

**कौसल्या**—तसेंच आमच्या प्रियतम सूनबाईची अशी अवस्था

* घरीं दशरथाचिया वसत होति लक्ष्मीपरी
कशास उपमा तिची उघड हीच लक्ष्मी खरी ॥
परंतु परकी जशी तशिच भासते ही मला
दशा कशि दिली पहा कठिण दैवयोगें हिला ॥१२॥

१. म्हणजे वसिष्ठाची. अरुंधती अर्थात् नवऱ्याचें नांव घेत नाहीं. पण कोणास शंका राहील म्हणून कंचुकी स्पष्ट सांगतो.
२. म्हणजे दशरथाच्या मृत्यूमुळें.

झाली तेव्हां याउपर त्या राजर्षीचें [ तिच्या पित्याचें ] तोंड तरी
३ कसें पहावें ?

**अरुंधती**—हा तो आपला परमपूज्य व्याही—जनक-
कुलाचा अग्रणी—ज्याप्रत याज्ञवल्क्यऋषीनें ब्रह्म-
विद्येचा उपदेश केला. ९

**कौसल्या**—महाराजांच्या हृदयाला आनंदाचें भरतें आणणारा तोच हा राजर्षि [ जनक ]—आमच्या लाडक्या सूनबाईचा पिता. हाय
३ हाय ! ज्या एका काळीं असा एकही दिवस लोटला नाहीं कीं ज्या दिवशीं आनंदोत्सवाला कांहीं तरी कारण झालें नाहीं अशा समयाची मला आज आठवण होते. हा दैवा ! तें सारें आज नाहींसें
६ झालें ना ?

**जनक** ( पुढें होऊन )—भगवति अरुंधति, हा वैदेह सीरध्वज[1] नमस्कार करीत आहे.

स्वतः पवित्र तेजाचा निधि असून सुद्धां जिच्या-
मुळें तो सर्व प्राचीन गुरूंचाही आद्यगुरु—तुझा
पति—आपणांस अधिक पावन समजतो; व जी
तूं, देवी उषेप्रमाणें, त्रैलोक्याचा परमपूज्य मंगला-
धार आहेस; त्या तुला, हे भगवति, हा मी
अवनितलावर मस्तक ठेवून लीन झालों आहें. १०

**अरुंधती**—परब्रह्मरूप ज्योति तुला स्वयंप्रकाशित होवो. रजोरूप अंधकाराचें दमन करणारा हा देव सविता तुला पावन करो.
३ **जनक**—आर्य गृष्टे, त्या प्रजापालकाच्या मातेचें कुशल आहे ना ?

**कंचुकी** ( स्वगत )—निःसंशय यानें आम्हांला हा निर्दय टोमणा

१. म्हणजे ज्याच्या निशाणावर नांगराचें चिन्ह आहे. यज्ञार्थ नांगरानें जमीन तयार करीत असतांनाच जनकास सीता सांपडली. जनक व अरुंधती उभयतां वेदनिष्ठ व ब्रह्मवेत्ते होते. म्हणून जनकानें योजिलेली उषेची वैदिक उपमा व अरुंधतीचा आशीर्वाद दोन्हीही अत्यंत उचित अशींच आहेत.

दिला. ( उघड ) राजर्षे, याच रागामुळें जिनें [ प्रिय ] रामचंद्राच्या
६ मुखचंद्राचें दर्शन आज इतके दिवस वर्ज्य केलें आहे त्या अगोदरच
दुःखीकष्टी असलेल्या महाराज्ञीला असें घालून पाडून बोलणें तुला
शोभत नाहीं. रामभद्राचा सुद्धां हा एक विलक्षण दैवदुर्विपाक म्हणा-
९ वयाचा कीं प्रजाजनांनीं ती भयंकर दुर्वार्ता चोहोंकडे फैलावून ठेवावी,
व त्या कुत्सित लोकांची अग्निशुद्धीवर सुद्धां श्रद्धा नसावी. म्हणूनच
त्याला तें दारुण कृत्य करावें लागलें.

१२ **जनक**—आमच्या संततीला शुद्ध करूं पाहणारा असा हा अग्नि
तरी कोण एवढा ? हाय हाय ! रामभद्रानें आमचा उपमर्द केलेला
आहेच आणि आतां हे लोक सुद्धां असें बोलून अपमानावर शिखर
१५ चढवीत आहेत !

**अरुंधती** ( उसासा टाकून )—असेंच खरें. आमच्या बाळेपुढें अग्नीचें
नांव घेणें हें अगदींच [ अप्रयोजक व ] कमीपणा आणणारें आहे.
१८ 'सीता'[1] असें म्हटलें म्हणजे त्यांतच सर्व कांहीं आलें. हाय वत्से !—

तूं मला कन्येप्रमाणें होतीस—माझी शिष्यीण
होतीस—तें सर्व नातें तूर्त राहूं द्या; तुझ्या परम-
पवित्र शीलामुळें माझी तुझे ठिकाणीं भक्ति जडत
आहे. तूं जातीनें स्त्री, तशांतून पोरवय; तरी
सुद्धां सर्व जगास तूं वंद्य आहेस. गुणी असतात
ते गुणांचाच गौरव करितात; तेथें लिंगाची किंवा
वयाची चाड नाहीं. ११

**कौसल्या**—अम्मो ! एकाएकीं वेदनांनीं उचल खाल्ली—(मूर्छित होते.)

१. भवभूतीची नाटकमंडळी उत्तरहिंदुस्थानांतली असेल व अरुंधतीची भूमिका घेणारा नट शषस यांमध्यें भेद करीत नसेल तर 'सीता' ह्या शब्दाचा 'शीता' असा उच्चार होईल; पण ही कल्पना केलीच पाहिजे असें नाहीं. तथापि उत्तररामचरिताच्या अत्यंत जुन्या हस्तलिखित पोथीमध्यें 'शषस'ची पुष्कळ गल्लत झालेली आहे हें जातां जातां नमूद केलें पाहिजे.

**जनक**—अरे ! हें काय ?

३ **अरुंधती**—दुसरें काय राजर्षे ?—

तो राजा [दशरथ], तें सौख्य, तीं लहान लहान
मुलें, ते दिवस,—तें सर्व तुझ्यासारख्या जिव्हा-
ळ्याच्या माणसाची गांठ पडल्यानें तिला आठवलें;
व या दुर्धर विपत्तीमुळें ही तुझी प्रिय मैत्रीण
मूर्छित झाली हें तूं पहात नाहींस काय ? म्हटलें
आहे, स्त्रियांचें अंतःकरण फुलासारखें कोमल
असतें. १२*

**जनक**—अरेरे ! मी कितीतरी हा निर्दय ! फारां दिवसांनीं भेट-
लेल्या प्रिय मित्राच्या या प्रिय पत्नीकडे मीं स्नेहदृष्टीनें पाहत नाहीं.

३ [ धिक्कार असो मला. ]

[ राजा दशरथ, ] फार उत्तम सोयरा—माझ्या
हृदयाचा कलिजा—माझें दुसरें हृदय—आनं-
दाचा मूर्तिमंत पुतळा—माझें अवघें जीवित-
सर्वस्व—माझें शरीर, माझे प्राण, अथवा प्राणा-
हूनही प्रिय जें काय असूं शकेल तें तो होता;
वैभवशाली दशरथमहाराज माझे काय काय होते
म्हणून सांगूं ? १३

आणि हाय ! हीच ती कौसल्या—

इच्याकडून अथवा इच्या पतीकडून एकांतामध्यें
सुद्धां जर एकादें राग आणण्यासारखें वर्तन घडलें
तर त्याबद्दल उभयतां पतिपत्नींनीं आपआपल्या-
परी मजकडे गाऱ्हाणें आणावें ! आणि नंतर घड-
लेल्या अपराधाबद्दल दंड करावयाचा कीं क्षमा

* तो राजा सौख्य ही तें सुखद दिवस ते तीं मुलें तींहि बाळें
आलें सारें स्मृतीतें प्रियसुहृदजना पाहतां दीर्घकाळें ॥
ऐशा दुःखांत तूझ्या सहजाचि सखिचें नष्टलें सर्व भान
प्राया चित्त स्त्रियांचें मृदुलाचि असतें जातिपुष्पासमान ॥१९॥

करावयाची त्याचीं सर्व सूत्रें माझ्या हातीं असत.
पण नको. ज्यांची स्मृति हृदयावर घांव घालून
त्यास पोळून टाकते असे ते विचारसुद्धां नकोत. १४

**अरुंधती**—हाय हाय ! श्वास कोंडल्यानें इचें शरीर किती निश्चल झालें आहे !

३ **जनक**—हाय ग माझे प्रिय सखी ! ( कमंडलूंतल्या जलानें सेचन करितो. )

**कंचुकी**—अगोदर सुखदात्या मित्राप्रमाणें ज्या विधीनें
एकजात अनुकूलता दाखविली तोच विधि एका-
एकीं अशा निष्ठुरपणें उलटला व [ पूर्वीं चांगले
दिवस पाहिल्यानें] आतां तो मनाची आधि दुणा-
वण्यास मात्र कारण होत आहे. १५

**कौसल्या** ( सावध होऊन )—हा वत्से जानकी ! तूं कोठें गेलीस ? विवाहकालीन मंगल संस्कारांमुळें ज्यावर अपूर्व शोभा दिसत आहे—
३ शुभ्र हास्यामुळें जें विकासित झालें आहे—असें तें तुझें मनोरम मुख-कमल अजून माझ्या नेत्रांसमोरून जात नाहीं. बाळे, ये. चंद्रम्याच्या विमल किरणांप्रमाणें आल्हाददायक अशा तुझ्या त्या शरीराचा
६ [ स्पर्श करून ] माझी मांडी सोज्वळ कर. महाराजांचें नेहमीं म्हणणें असें कीं रघुकुलाग्रणींची ही सून आहे हें खरें, पण जनकाचें व आमचें नातें असेंच आहे कीं [ सीता ] ही आमची [ पोटच्या ]
९ कन्येसारखी आहे.

**कंचुकी**—असेंच खरें राणीसरकार.[1]
महाराजांना पांच अपत्यें होतीं पण सुबाहुशत्रु[2]
[ राम ] हाच सर्वांत अधिक प्रिय होता. त्याच-

१. हा कंचुकी वरच्या दर्जाचीं माणसें—आपले धनी—जें जें बोलतात त्याचा निराळ्या शब्दांनीं अनुवाद करणाऱ्यांपैकीं दिसतो. वर ४·७ ५–६, व पुढें ४·१९ १ पहा.

२. ताटकावधाच्या वेळीं रामानें सुबाहूस मारिलें होतें. रामाचे पुढचे पराक्रम पहावयास दशरथ जगला नाहीं.

प्रमाणें चारी सुनांपैकीं सीता ही, जशी शांता तशीच,
एक प्रिय दुहिता होती. १६

**जनक**—हाय रे माझ्या जिवलगा महाराजा दशरथा ! सर्व तऱ्हांनीं तूं असा आमच्या हृदयास चटका लाविला होतास. तुझें
३ आम्हांस विस्मरण होईल तरी कसें ?

जनरीत म्हणजे मुलींच्या पित्यानें जांवयाच्या
आप्तेष्टांची संभावना करावयाची; पण आमचा
संबंधच कांहीं वेगळ्या तऱ्हेचा होता. कारण
तूं माझी बरदास्त ठेवीत असस.[१] असा तूं सुशील,
पण तुला सुद्धां काळानें हिरावून नेलें; व जिच्या-
मुळें आमचा संबंध जडला तिचीही तीच दशा
झाली. तरी देखील या जीवलोकींच्या दुर्धर
नरकयातना सोसण्यास मी मागें जीवंत राहि-
लोंच आहें ! धिक्कार असो मला ! १७*

**कौसल्या**—बाळे जानकि, मी तरी काय करूं ? जणूं काय वज्राच्या दृढ लेपानें जखडल्याप्रमाणें माझे हे प्राण [शरीरांत] खिळून राहिले
३ आहेत. या मंदभाग्येला ते मेले सोडीतच नाहींत !

**अरुंधती**—हे राजकन्ये [ कौसल्ये ], असा धीर खचूं देऊं नको. नेत्रांतल्या अश्रूंना तरी मधून मधून विसावा दिला पाहिजे ना ?
६ शिवाय ऋष्यशृंगाश्रमीं कुलगुरूंनीं[२] जें सांगितलें तें तूं विसरलीस

* कन्येचे गुरु पूजितात विनयें त्या जांवयाच्या जना
तें झालें उलटें तयीं करिशि तूं माझ्याच आराधना ॥
काळानें तुज ओढिलें विघडला संबंध हेतू तसा
या घोरीं मज जीवलोकनरकीं धिक् वांचलों मी कसा ॥ २५॥

१. दशरथ व जनक यांच्यामधील हा सोयरेसंबंध फार वरच्या पायरीचा असून त्याचें मनोरम चित्र भवभूतीनें आजकालच्या पिढीकरितांच मुद्दाम रेखल्यासारखें दिसतें.

२. मागें पृष्ठ १८२ टीप १ पहा. अरुंधतीचा आपल्या नवऱ्याच्या तपःसामर्थ्याविषयींचा विश्वास ध्यानांत घेण्यासारखा आहे.

कां ? [ते म्हणाले होते,] असें होणार हें आम्हांस आधींच समजलें होतें. पण शेवट गोड होईल.[1]

९ **कौसल्या**—आतां मनोरथ करावयास वाव राहिला नाहीं.

**अरुंधती**—मग काय राजकन्ये, तूं तें असत्य भाषण समजतेस ? हे सुक्षत्रिये, तूं अशी विपरीत कल्पनाही मनांत आणूं नकोस. तें १२तसें होणारच.

[ब्रह्म-] तेजाचा ज्यांना साक्षात्कार झाला आहे
अशा ब्राह्मणांच्या वचनासंबंधी कधींही संशय
धरूं नये; कारण त्यांच्या जिव्हाग्रीं शुभप्रद
लक्ष्मी सदैव वसते. असत्य अथवा धरसोडीचें
भाषण त्यांच्या तोंडून केव्हांही निघत नसतें.[1] १८*

(पडद्यांत गलबला होतो. सर्व ऐकतात.)

**जनक**—आश्रमांत पाहुणे आल्यामुळें मुलांना सुटी मिळाली तेव्हां ३ [आनंदानें] खेळत असणाऱ्या विद्यार्थ्यांचा हा गोंगाट असावा.

**कौसल्या**—लहानपणीं आनंदाला थोडें सुद्धां कारण पुरतें. [निरखून पाहून] अगबाई ! हा कोण बरें यांच्यामध्यें, ज्याची अंगकांति ६ आमच्या रामभद्रासारखीच शोभिवंत आहे व ज्याच्या ऐटदार,

* ज्यांचें मोठें तेज त्या ब्राह्मणांच्या
उक्ती होती संशयावीण साच्या ॥
वाचा त्यांची होय कल्याणखाणी
कधीं ते नोच्चारिती व्यर्थवाणी ॥ २६ ॥

१. मागें १·१० व १·१०[८] वरील आमची टीप पहा. अरुंधतीनें वसिष्ठाचें भाषण मिथ्या होणार नाहीं असें म्हणावयाला आणि लवादिक विद्यार्थ्यांचा गलबला ऐकूं येऊन तद्द्वारा त्या भाषणाची प्रचीति यावयास आरंभ होण्याला एकच गांठ पडली. कवीनें हा योग मुद्दाम जुळवून आणिला आहे.

गोंडस व मनोहर शरीराकडे पाहून आमच्या सारख्यांचे[1] सुद्धां नेत्र निवतात ?

९ **अरुंधती** ( एकीकडे, व डोळ्यांत आनंदाश्रु आणून )—जी अमृता-सारखी [ आनंददायक] गोष्ट गुप्त[2] म्हणून भागीरथीनें माझ्या कानांत सांगितली होती ती हीच खरें. पण चिरंजीव कुशलवांपैकीं हा कोण
१२ हें मात्र आम्हांस ठाऊक नाहीं.

**जनक**—नील कमलाप्रमाणें स्निग्ध आणि शामवर्ण व
[क्षत्रिय कुमारास उचित अशीं] वर्तुळाकार झुलुपें
असलेला आणि आपल्या पावन कांतीनें साक्षात्
लक्ष्मीप्रमाणें या विद्यार्थीमंडळास शोभा आण-
णारा,—जणूं काय प्रत्यक्ष आमचा मुलगा, रघु-
नंदन [ राम ], पुनः शिशु होऊन आला आहे
असें भासविणारा—हा आमच्या नेत्रांस एकदम
अमृतांजनाप्रमाणें [ सुखविणारा ] कोण बरें असा
असावा ? १९

**कंचुकी**—मला वाटतें निःसंशय हा मुलगा क्षत्रिय ब्रह्मचारी असावा.

**जनक**—असेंच खरें. कारण याच्या—
पाठीवर डाव्या व उजव्या दोन्ही बाजूंला (अभितः)
एकेक तूणीर[3] आहे व त्यांच्या बाहेर आलेले
कंक पक्ष्याचे पंख लावून केलेले बाण याच्या
शिखेचें चुंबन करीत आहेत; पवित्र भस्माचे रुंद
पट्टे असलेल्या या वक्षःस्थलावर यानें रुरु नामक

१. आम्ही दुःखांत इतके चूर असतांना देखील.
२. हें 'गुप्त' बायकांच्या नेहमींच्या गुपितासारखेंच दिसतें. तमसेला ही गोष्ट ठाऊक होती ( अंक ३, विष्कंभक ), तिनें मुरलेला सांगितली, मुरलेनें लोपामुद्रेला. तथापि एवढें खरें कीं ज्यांना ती गोष्ट कळावयाला नको होती त्यांना ती कळली नव्हती.
३. बाणांचा भाता.

हरिणाचें चर्म परिधान केलें आहे; नेसलेलें वस्त्र
मंजिष्ठेच्या रसांत रंगविलेलें आहे व तें मूर्वा नामक
तृणाच्या रज्जूनें [ कमरेवर ] आंवळलेलें आहे;
हातांत धनुष्य व रुद्राक्षांचीं वलयें आणि त्याच-
प्रमाणें हा दुसरा अश्वत्थाचा दंड.[1] २०

भगवति अरुंधति, तुमचा काय तर्क आहे ? हा कुठला कोण ?

**अरुंधती**—आम्ही आजच आलों.[2]

३ **जनक**—आर्य गृष्ट.[3] मला फारच जिज्ञासा झाली आहे. तर भग-
वान् वाल्मीकींनाच जाऊन विचार. तसेंच ह्या मुलाला सांग कीं कोणी
वृद्ध गृहस्थ तुला पाहूं इच्छितात.

६ **कंचुकी**—जशी आज्ञा. ( जातो. )

**कौसल्या**—तुम्हांला वाटतें कां कीं या निरोपानें तो येईल ?

**अरुंधती**—याचें शील याच्या सुंदर आकृतीला बाध आणणारें
९ असेल कसें ?

**कौसल्या** ( पाहून )—खरेंच ! गृष्टीचा निरोप नम्रतेनें ऐकून घेऊन
हा मुलगा [ बरोबरीच्या ] ऋषिकुमारांना सोडून आमच्या इकडे
१२ येण्यास निघालाच कीं !

१. ह्याच श्लोकानें महावीरचरितामध्यें (१·१८) कुशध्वज रामाचें वर्णन करीत आहे. सामान्यतः एका नाटकांतील श्लोक अक्षरशः दुसऱ्या नाटकांत घेणें अनुचितच, तथापि महावीरचरितांतील राम व उत्तररामचरितांतील लव समान आकृतीचे व समान परिस्थितींत असल्यानें उभयतांचें वर्णन एकच प्रकारें केलें जावें यांत औचित्यही आहे.

२. येथें प्रत्यक्ष शब्दानें अरुंधती असत्य बोलली नाहीं तरी तिचा हेतु तसा होता. जनकाच्या प्रश्नाचें उत्तर तिला ठाऊक होतें; पण सरळ उत्तर न देतां ती असे शब्द वापरते कीं ज्यांपासून ऐकणाऱ्याचा तिला कांहीं ठाऊक नाहीं असा ग्रह व्हावा. मालतीमाधवामध्यें भूरिवसूनेंही नंदनाच्या मागणीस असेंच उत्तर दिलें आहे ( मालतीमाधव ४·४[१२–१७]) व कामंदकी तसें करण्यांत दोष नव्हता असें प्रतिपादित आहे.

३. कंचुकी ब्राह्मण असून वयोवृद्ध, म्हणून जनक त्यास 'आर्य' असें बहुमानानें संबोधित आहे.

**जनक** ( बराच वेळ त्याच्याकडे निरखून पाहून )—
असें हें विलक्षण कां बरें होत असेल ? विनीत-
पणा, बालभाव आणि मुग्धता [ या तीहींच्या
मिश्रणानें ] हृद्यंगम वाटणारा हा याच्या अंगीं
[ दृग्गोचर होणारा ] लोकोत्तर प्रताप—जो
तज्ज्ञांनाच उमगणें शक्य आहे, इतरांस नाहीं—
लहानसा लोहचुंबकाचा तुकडा ज्याप्रमाणें लोह
धातूस तद्वत् [ हा प्रताप ] बलात्कारानें माझ्या
सहसा अशा रीतीनें मोहित न होणाऱ्या मनास
देखील आकर्षून घेत आहे. २१

**लव** (प्रवेश करून)—हे सर्व वंदनीय आहेत, पण यांचीं नांवें, अधिकार, अथवा पौर्वापर्यक्रम मला अवगत नाहीं तेव्हां यांचें अभि-
३ वंदन कोणत्या प्रकारें करावें ? (विचार करून) हां. वाडवडील सांग-तात कीं [अशा वेळीं] अशा प्रकारें[1] [वंदन] करावें. (नम्रतेनें पुढें होऊन) हा लव तुम्हां सर्वांस शिरसा प्रणाम करीत आहे.

६ **अरुंधती व जनक**—आयुष्यमान् भव. तुझें कल्याण होवो.

**कौसल्या**—बाळा, तुला उदंड आयुष्य असो.

**अरुंधती**—ये, मुला. (लवास मांडीवर घेऊन, एकीकडे) सुदैवानें
९ आज इतक्या दिवसांनीं ही माझी मांडीच नव्हे तर माझा मनोरथही पूर्ण झाला.

**कौसल्या**—बाळा, इकडेही अंमळ ये.(मांडीवर घेऊन) अहाहा ! किंचित्
१२ उमललेल्या नील कमलाप्रमाणें श्यामवर्ण आणि तुकतुकीत अशी ही अंगलट, आणि कमलांतील केसर खाल्ल्यामुळें ज्याचा आवाज [किं-चित्] घोगरा झाला आहे अशा कलहंसाच्या स्वनाप्रमाणें उच्च,
१५ घोषवंत, व खणखणित कंठस्वर, या दोन गोष्टींतच हा मुलगा राम-भद्राचें अनुकरण करीत आहे एवढेंच नव्हे; तर, पाहिलें कां, याच्या

१. म्हणजे सर्वांस मिळून एकदांच; व्यक्तिशः प्रत्येकास नव्हे. कारण मग आधीं कोणास वंदन करावयाचें आणि नंतर कोणास ह्याची पंचाईत पडणार.

शरीराचा हा कमलगर्भाप्रमाणें मृदुल स्पर्शही त्यासारखाच आहे.
१८बाळा तुझें मला तोंड पाहूं दे. (हनुवटी वर करून त्याला न्याहाळून व डोळ्यांत आंसवें आणून आणि मनांत कांहीं कल्पना योजून) राजर्षे, हें पाहिलें कां ? सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां याचा तोंडावळा
२१आमच्या मुलीच्या [सीतेच्या] तोंडावळ्याशींही बराचसा जुळतो.

**जनक**—पाहिलें मीं, प्रियसखि; माझ्याही तेंच मनांत येत आहे.

**कौसल्या**—अम्मो ! कांहीं तरी तर्क मनांत आणून भ्रमिष्टाप्रमाणें
२४माझें हृदय हेलकावे खात आहे.

**जनक**—माझ्या कन्येची व रामभद्राची तीच यच्चावत्
आकृति व कांति या मुलामध्यें संपूर्ण प्रतिबिंबित
झालेली स्पष्ट दिसत आहे. तीच वाणी, तोच
नैसर्गिक विनय, आणि त्याचसारखा पावन
अनुभव ! हायरे दैवा ! माझें मन या वेळीं भल-
त्याच दिशेनें सैरोवैरां कां बरें धावूं लागावें ? २२

**कौसल्या**—बाळा, तुझी आई आहे कांरे ? बापाची आठवण तुला आहे ?

३ **लव**—नाहीं.

**कौसल्या**—मग कुणाचा तूं ?

**लव**—भगवान् वाल्मीकींचा.

६ **कौसल्या**—अरे बाळा, साजेल तें तरी बोलत जा.[१]

**लव**—मला एवढेंच माहित आहे.

**पडद्यांत**—अहो सैनिक हो ! हे कुमार चंद्रकेतु अशी आज्ञा करीत
९ आहेत कीं आश्रमाजवळच्या भागांत कोणीही जाऊन [ उपद्रव करूं ] नये.

**अरुंधती व जनक**—वा: ! एकूण यज्ञीय अश्वाचें रक्षण करीत
१२करीत वत्स चंद्रकेतु येथें आला आहे, आणि तो आम्हांला आज दिसणार ! मोठा भाग्याचा दिवस हा.

१. वाल्मीकि नैष्ठिक ब्रह्मचारी असल्यानें त्यास मुलगा असणें अगदीं असंभवनीय.

**कौसल्या**—वत्सलक्ष्मणाचा मुलगा आज्ञा करितो हीं अमृतबिंदूप्र-
१९माणें सुंदर अक्षरें आज कानावर येत आहेत !

**लव**—महाराज, चंद्रकेतु हा कोण ?

**जनक**—तुला रामलक्ष्मण ठाऊक आहेत, दशरथाचे मुलगे ?

१८**लव**—तेच ना रामायणकथेचे नायक ?

**जनक**—हो तेच.

**लव**—मग मला ठाउक नाहींत असें कसें होईल ?

२१**जनक**—त्या लक्ष्मणाचा चंद्रकेतु हा मुलगा.

**लव**—अस्सं. तर मग तो ऊर्मिलेचा मुलगा, आणि मिथिलेश्वर राजर्षि जनकाचा नातु.

२४**अरुंधती**(हंसून)—रामायणकथा आपणास कशी मुखोद्गत आहे तें हा मुलगा आतां दाखवीत आहे.

**जनक**—तुला जर ती कथा इतकी चांगली अवगत आहे तर
२७आम्हीं कांहीं प्रश्न करितों. सांग पाहू त्या दशरथपुत्रांना कोणत्या पत्नीपासून [किती मुलें झालीं व] त्यांचीं नांवें काय आहेत ?

**लव**—हा कथाभाग आम्हींच नव्हे तर दुसऱ्या कोणींही[1] आजपा-
३०वेतों ऐकलेला नाहीं.

**जनक**—म्हणजे कवीनें तो रचिलाच नाहीं काय ?

**लव**—रचिला आहे पण प्रसिद्ध केला नाहीं.[2] त्याचाच एक सरस भाग

१. पण ज्याअर्थीं तो भाग भरतमुनीकडे पूर्वींच पाठविला होता, व कदाचित् अप्सरांना त्याची तालीम देण्यासही सुरवात झाली असणें शक्य आहे हें लवास माहीत होतें त्याअर्थीं ' मला ठाऊक नाहीं असा रामायणाचा भाग दुसऱ्यास कसा अवगत असणार ' या कल्पनेनें उच्चारलेले हे शब्द म्हणजे लवाची बालभावास शोभणारी ही एक पोकळ घमेंड झाली असें म्हणणें भाग आहे. तसेंच ४·२२[20] पहा.

२. वाल्मीकिच्या रामायणाचें उत्तरकांड कोणीं रचिलें—वाल्मीकीनें कीं दुसऱ्या कोणीं—हा एक प्रश्न आहे. युद्धकांडाच्या शेवटीं रीतीप्रमाणें ग्रंथ समाप्त करून ग्रंथश्रवणफलही आलें आहे; तेव्हां उत्तरकांड मागाहून रचिलें हें स्पष्ट आहे. रामायण रचल्यावर कुश व लव यांनीं तें रामास म्हणून दाख-

३३ रंगभूमीवर आणण्याच्या उद्देशानें—त्यास एका निराळ्या प्रबंधाचें रूप देऊन—त्यांनीं तयार केला आहे, व तो भगवंतांनीं स्वहस्तानें लिहून काढून भरतमुनि—नाट्यशास्त्राचे सूत्रकार[1]—यांजकडे रवाना ३६ केला आहे.

विलें हें जर खरें म्हणावें तर या म्हणून दाखविलेल्या रामायणांत फार झालें तर सीतात्यागापर्यंतचा मजकूर येऊं शकेल ( उत्तररामचरित ४·२२[५२–५६] पहा ), तदनंतरचा येणार नाहीं. पद्मपुराणांत एके ठिकाणीं ( पातालखंड अध्याय ६६, श्लोक १६४–१८४ ) पुरातन रामायण असेंच होतें असें स्पष्ट विधानच केलें आहे. इतर अंतस्थ पुराव्यावरूनही उत्तरकांड प्राक्षिप्त नसलें तरी मागाहून रचिलें गेलें हेंच सिद्ध करितां येतें. महाभारतांतर्गत रामोपाख्यानांतही ( वनपर्व अध्याय २७३ व पुढचे अध्याय) युद्धकांडअखेरच कथा आली आहे.—तथापि उत्तरकांड वाल्मीकीचें मुळींच नव्हे असें एवढ्यावरून सिद्ध होत नाहीं. भवभूति उत्तरकांड वाल्मीकीचेंच असें पर्यायानें म्हणत आहे (उत्तररामचरित ४·२२[३२]). पद्मपुराणांत वर सांगितलेल्या स्थळीं पुरातन रामायणांतही उत्तरकांड म्हणून होतेंच असें विधान आहे. वनपर्वांत मार्कंडेय धर्मराजाला ' तुझ्या सारखेच दुःखी राजे पूर्वीं होऊन गेले व कालांतरानें त्यांना त्यांचें ऐश्वर्य परत मिळालें ' असें सांगण्याकरितां नलाचें व तसेंच रामाचें आख्यान सांगत आहे. तेव्हां उत्तरकांडांतील विषय मार्कंडेयास ठाऊक असता तरी अप्रस्तुत म्हणून त्याला तो धर्मराजास सांगण्याची जरूर नव्हती. तेव्हां उत्तरकांड वाल्मीकीनेंच मागाहून रचिलें असेल. परंतु तें सध्यांप्रमाणें दुःखपर्यवसायी होतें असें मात्र म्हणवत नाहीं. महाभारतामध्यें ( ७·५९ ) लंकेहून परत आल्यावर रामानें सीतेसह अनेक संवत्सरें सुखानें राज्य केलें व शेवटीं तो कालवश झाला असें म्हटलें आहे. या विषयाचें आणखी विवेचन उपोद्घात §२१ क मध्यें केलें आहे तें पहा.

१. भरतमुनिकृत नाट्यशास्त्र काव्यमालेंत प्रसिद्ध झालें आहे. पण तें सूत्ररूपानें नाहीं. पाणिनीस कुणाची तरी नटसूत्रें ठाऊक होतीं हें 'पाराशर्यशिलालिभ्यां भिक्षुनटसूत्रयोः' (४·३[११०]) या सूत्रावरून सिद्ध होतें. तेव्हां सध्यांच्या नाट्यशास्त्रास आधारभूत असलेलें एकादें भरतमुनिकृत सूत्रात्मक पुस्तक भवभूतीस ठाऊक असावें व कामंदकीयनीतिशास्त्राचा कौटिलीय अर्थशास्त्राशीं जो संबंध होता तोच आमच्या ' नाट्यशास्त्रा 'चा पूर्वीच्या सूत्रग्रंथाशीं असावा असें अनुमान

**जनक**—तें कशाकरितां ?

**लव**—भगवान् भरत म्हणे अप्सरांकडून त्याचा प्रयोग करविणार ३९आहेत.

**जनक**—या सर्व गोष्टींनीं आमची जिज्ञासा मात्र उत्कट झाली.

**लव**—भगवान् वाल्मीकींची या प्रबंधावर मोठी भिस्त आहे. कारण ४२ज्या विद्यार्थ्यांच्या हस्तें तें पुस्तक भरताश्रमीं पाठविलें आहे त्यांच्या समवेत, आणि वाटेंत एकादें संकट आल्यास तें दूर करण्याकरितां म्हणून, गुरुजींनीं आमच्या भावास धनुष्यबाण घेऊन जावयास ४५सांगितलें.[१]

**कौसल्या**—म्हणजे तुला भाऊही आहे ?

**लव**—आहे; आर्य कुश म्हणून.

४८**कौसल्या**—यावरून[२] तो तुझ्याहून वडील आहे ?

**लव**—होय. प्रसूतिक्रमाप्रमाणें[३] त्याच्याकडे ज्येष्ठत्व येतें.

निघतें. भवभूतीच्या वेळीं हा ग्रंथ साक्षात् उपलब्ध असेलच असें म्हणवत नाहीं. कारण ११।१२ व्या शतकांतील आचार्य अभिनवगुप्ताची नाट्यशास्त्रावर जी टीका आहे ( इची एकच त्रुटित प्रत त्रिवेंद्रमचे. सुप्रसिद्ध संशोधक गणपतिशास्त्री यांस अलीकडे उपलब्ध झाली आहे व तिचा कांहीं भाग मजकरितां त्यांनीं देवनागरी लिपींत लिहवून घेऊन पाठविला आहे) त्यामध्यें प्रचलित नाट्यशास्त्रच मूळ ग्रंथ हीच समजूत आहे. असो. लवानें वाल्मीकींनीं आपल्या ग्रंथाची रंगभूमीवर आणण्याकरितां जी व्यवस्था लाविली म्हणून लव वर्णित आहे तीच व्यवस्था भवभूति आपल्या नाटकांची लावीत असे—म्हणजे नाटक तयार होतांच तें ओळखीच्या एका नाटकमंडळीकडे प्रयोग करण्याकरितां भवभूति पाठवीत असे— हें त्यानेंच स्वतः नमूद करून ठेविलें आहे. उपोद्घात §४ पहा.

१. लवाच्या बोलण्याचा अर्थ हा कीं, ज्या अर्थीं माझ्या भावासारख्या धनुर्धराची या कामीं योजना केली गेली त्या अर्थीं तें काम तसेंच महत्वाचें असलें पाहिजे.

२. तूं त्याला 'आर्य' कुश असें म्हटलेंस यावरून.

३. जुळ्या मुलांपैकीं प्रथम जो उपजतो तो धाकटा व मागाहून उपजतो तो मोठा असा नियम प्रसिद्धच आहे.

**जनक**—एकूण तुम्ही जुळीं मुलें आहांत ?

९१**लव**—हो, अर्थात्.[1]

**जनक**—सांग बरें, [प्रसिद्ध] कथाभाग कोठपर्यंत आला आहे ?

**लव**—पौरजनांच्या खोडसाळ प्रवादानें उद्वेग पावून राजा [रामानें]
९४टाकिलेल्या, देवांच्या यज्ञभूमीपासून उत्पन्न झालेल्या व सन्निध आलेल्या प्रसूति वेदनेमुळें [व्याकुल झालेल्या], देवी सीतेस अरण्यांत सोडून देऊन लक्ष्मण परत गेला—येथपर्यंत.

९७**कौसल्या**—हा वत्से ! मुग्धचंद्रमुखि[2] ! तुझ्या पुष्पासारख्या [सुकुमार] शरीरावर—तूं अगदीं असहाय असतांना—दुर्दैवाच्या खेळामुळें काय तरी हा प्रसंग येऊन गुदरला !

६०**जनक**—हा वत्से !

तो दुर्धर प्रसंग; तें भयाण अरण्य; व प्रसूति-
समयींच्या त्या [आत्यंतिक] वेदना; यांशीं तुझी
गांठ पडली तेव्हां—हिंस्रक पशु चोंहोंकडून
तुजसभोंवार घिरट्या घालीत असतां—गांगरून
जाऊन रक्षणार्थ तूं निःसंशय माझ्या नांवानें टाहो
फोडिला असशील ! २३

**लव** (अरुंधतीस)—आर्ये, हे दोघे कोण ?

**अरुंधती**—ही कौसल्या. हा जनक.

३ (लव किंचित् खिन्न होऊन कौतुकानें व बहुमानानें त्यांजकडे पाहतो.)

१. बुद्धिवान् चुरचुरित मुलांना आपल्या कल्पनेप्रमाणें अवघड असे प्रश्न अथवा कोडीं दुसऱ्यांस घालून त्यांस नडविण्याची मोठी हौस असते. लवाचें ४·२२[४९] मधील उत्तर याच प्रकारचें आहे.

२. मनोहर चंद्राप्रमाणें मुख आहे जीचें. पुष्कळ वेळेला समासयुक्त संस्कृत शब्दांचा आटोपशीरपणा विग्रह करून भाषांतरामध्यें आणणें अशक्य असतें. तसलेंच हें एक स्थळ आहे. परशुरामपंतांनीं या शब्दाचें भाषांतर बालचंद्रवदने या दुसऱ्या समासयुक्त पदानें केलें आहे. समासच ठेवावयाचा तर मूळचा काय वाईट आहे ?

**जनक**--काय हो या पौरजनांचा अमर्यादपणा ! आणि राजा रामानें तरी हें करण्यांत कोण घाई—कोण अविवेक—दाखविला !

आम्हांवर कोसळलेलें हें महासंकटरूपी घोर
वज्र—त्याचें मी वारंवार चिंतन करूं लागलों
म्हणजे [ वाटतें कीं ] माझा क्रोधाग्नि धक्किनें
भडकून मीं हातीं चाप धरावें अथवा शाप
उच्चारावा असा समय आला नाहीं का ? २४ पू.

**कौसल्या** ( भीतीनें )—भगवति, रक्षण कर; आमचें रक्षण कर. या कोपाविष्ट राजर्षीचें सांत्वन कर.

**अरुंधती**—महात्म्याचा अवमान घडला म्हणजे त्याचें
प्रायश्चित हेंच.—राजा ! राम तुला मुला-
प्रमाणें आहे; व दुबळ्या प्रजेचें रक्षण करणें हें
आपलें कर्तव्य आहे. २५*

**जनक**—अथवा रघुनंदनाविरुद्ध चाप व शाप दोन्हीही
वापरणें अनुचित; कारण कांहीं झालें तरी तो
मला प्रियपुत्रासमान आहे. आणि पौरजन म्हणजे
मुख्यत्वें द्विज, बाल, वृद्ध, पंगू व स्त्रिया यांचाच
समुदाय[१] ! २४ उ.

**गोंधळलेलीं मुलें** ( घाईनें प्रवेश करून )—कुमारा, अरे लवा ! अश्व, अश्व म्हणून कोणी एक प्राणिविशेष नागरिक लोकांत प्रसिद्ध
२ आहे. तो आज आम्हीं प्रत्यक्ष पाहिला !

* जे योगियांचा करितात मंतू
हा दंड त्यां योग्य असे परंतू ॥
आहे तुला राम अपत्यतुल्य
दीना प्रजा त्याहि तशाच पाल्य ॥ ३६ ॥

१. तेव्हां त्यांच्यावरही शस्त्र उगारितां येत नाहीं. जनकानें बालांचीं आठवण काढितांच रंगभूमीवर अनेक बालकें येतात हा योग कदाचित् मुद्दाम साधला असेल.

लव—अश्व हें नांव पशूंच्या यादीमध्यें आहे, आणि युद्धशास्त्रामध्येंही येतें. सांगा पाहूं कसला आहे तो.

६ मुलें—ऐक.

त्याच्या मागच्या बाजूला एक भलें लांबलचक
शेपुट आहे व तें तो एकसारखा हालवीत असतो;
मान लांबट आहे आणि त्याचे खूर–अं–चार,
चारच[१] आहेत. तो खातो गवत आणि आंब्या-
एवढे लेंड्यांचे गोळेच्या गोळे जेथें तेथें विखरून
ठेवितो;—उगीच व्याख्यान कशाला; चल; तो
दूर निघून चालला; चल, चल; आपण जाऊं. २६*

( जवळ जाऊन त्याचे हात व वस्त्र ओढूं लागतात. )

लव ( कौतुकानें, नम्रतेनें, व [ मुलांना ] उपरोध केल्यासारखें
३ दाखवून )—आर्यहो ! पहा पहा, यांनीं मला [बळेंच] ओढून नेलें.
( जलदीनें चालूं लागतो.[२] )

अरुंधती व जनक—बाळा, जा. तूं आपली जिज्ञासा पूर्ण कर.

६ कौसल्या—भगवति ! वाटतें हा डोळ्याआड झाला कीं माझें सर्वस्व हरपलें. चला, त्या तेथें जाऊन कुमार जातो आहे तें पाहूं या.

अरुंधती—चपळ तो. वेगानें पळून दूर गेला. आतां कसचा तो
९ दिसणार ?

* मोठें पुच्छ असे तया चवरिचें तो तें सदा हालवी
ग्रीवा दीर्घ जटाल चार खुरही वेगें तया चाळवी ॥
खातो बालतृणें फळासम सदा लेंड्यांस टाकीतसे
तूतें दाखवितों उठी लवकरी तो दूर गेला असे ॥ ३८ ॥

१. मूळांत ' चत्वार एव ' असें आहे या ' एव 'चा अर्थ असा घ्यावयाचा कीं मुलाचें या बाबतींत एकमत नव्हतें. त्यामुळें रंगभूमीवर बराच हास्यकारक अभिनय होत असेल व तो मनांत आणूनच भवभूतीनें 'एव' हा शब्द वापरला असावा.

२. मनांतून तर जावयाचें पण तसें विचारल्यास गुरुजनांचा अपमान होईल म्हणून लवानें ही युक्ति काढिली.

**कंचुकी** (प्रवेश करून)—भगवान् वाल्मीकि सांगतात कीं योग्य वेळीं तुम्हांस तें कळून येईल.

१२**जनक**—हें कांहीं तरी अत्यंत खोल रहस्य असावें. भगवति अरुंधति, सखि कौसल्ये, आर्य गृष्टे, चला आपण स्वतःच भगवान् वाल्मी-
१४कींस जाऊन भेटूं.

( सर्व वृद्ध लोक निघून जातात. )

**मुलें**[१]—कुमारा, आम्हीं तुला नवल म्हणून सांगितलें तें हें पहा.

**लव**—पाहिलें आणि समजलेंही. निःसंशय हा अश्वमेधाचा घोडा
१८असावा.

**मुलें**—कशावरून म्हणतोस ?

**लव**—अरे मूर्खांनो, तुम्ही सुद्धां त्या कांडाचें[२] पठण केलेलें आहे.
२१पहात नाहीं कां ? 'रक्षक लोक चिलखत घातलेले, दंड घेतलेले, व तूणीर धारण करणारे प्रत्येकीं शंभर शंभर.' हें सैन्य बहुधा तित-

१. येथें 'प्रवेश करून' असें म्हटलें नाहीं यावरून वर (४·२६[८]) मुलें पार गेलीं असें स्पष्ट म्हटलें असलें तरी तीं ४·२६[४] पासून आतांपर्यंत दूर रंगभूमीच्या कोपऱ्यांतच उभीं असावींत, व आतां पुढें आलीं असावींत. अथवा प्रत्यक्ष प्रयोगांत तीं प्रथम निघूनच जात असावींत व नंतर पुनः प्रवेश करीत असावींत; परंतु प्रत्येक पात्राच्या प्रवेशाची आगाऊ सूचना दिली पाहिजे या नाट्यशास्त्राच्या नियमास मान देण्याकरितां कवीनें नाटकांत तसे शब्द घातले नसावेत.

२. शतपथ ब्राह्मणामध्यें अश्वमेध कांड आहे; त्यासारखेंच एकादें कांड येथें विवाक्षित असावें. अवतरणांतर्गत वाक्य त्या कांडातलें असावें व तें लव पाठ म्हणून दाखवीत आहे. लवास पुस्तकी विद्या अवगत आहे एवढेंच नव्हे तर तिचा व्यवहारांत उपयोग करितां येतो. तथापि हा घोडा यज्ञीय आहे हें लवानें पूर्वीं ऐकलेलें होतें (वर ४·२२[११]). तेव्हां त्यानें हा कांहीं अगदीं नवीन शोध लाविला असेंच केवळ म्हणतां येत नाहीं. कदाचित् त्या वेळीं अरुंधतीजनकांचे ते शब्द त्यानें पूर्णपणें ऐकले नसतील. पण कांहीं झालें तरी ज्याअर्थीं लव आपल्या सोबत्यांचा अज्ञानाबद्दल उपहास करीत आहे त्या अर्थीं त्याचा स्वभाव किंचित् घमेंडखोरच खरा. मागें पृष्ठ १९३ व १९६ टीप १ पहा. पांचव्या अंकावरूनही तेंच निष्पन्न होतें,

केंच असावेंसें दिसतें. तुमचा विश्वास नसला तर जा विचारा.

२४मुलें—अहो कायहो ! या अश्वाला तुम्ही चहूं बाजूंनीं वेढिलें तर आहे आणि हा मोकळा तर हिंडतो आहे, याचा हेतु काय ?

लव ( सस्पृह होऊन, स्वगत )—विश्वास पादाक्रांत करण्याची हांव

२७बाळगणाऱ्या क्षत्रियांचा अश्वमेध हा इतर सर्व क्षत्रियांना तुच्छ लेखून आपला उत्कट पराक्रम दाखविण्याचा श्रेष्ठ प्रकारचा एक निकष ( कस लावून पाहण्याचा धोंडा ) आहे.

पडद्यांत—हा जो अश्व आहे ती एक पताका आहे;
अथवा रावणाच्या कुलाचा संहार करणारा व
सप्त लोकांतील अद्वितीय वीर [ जो महाराज
रामचंद्र ] त्याच्या नांवाची ही घोषणा (दवंडी)
आहे ! २७

लव ( व्यथित झाल्यासारखें करून )—हे शब्द अगदीं त्वेष आणणारे आहेत.

३ मुलें—तें काय सांगावें. कुमार बुद्धिमान् आहे; [ त्यानें बरोबर ताडिलें. ]

लव—काय हो ! तुम्ही अशी दवंडी पिटता तर या पृथ्वींत कां

६ क्षत्रिय नाहींच कीं काय ?

पडद्यांत—अरे महाराजापुढें असा कोणता क्षत्रिय आहे ?

लव—अरे, वाचाटांनो !
ते [ तुमचे महाराज तसे ] असतील तर असोत
बापडे; पण [ या दवंडीची ] ही [ पोकळ ]
भीति कशाला दाखवितां ? जास्त बोलण्यांत
काय अर्थ आहे ? हल्ला करून तुम्ही ज्याला
'पताका' म्हणतां [ तो तुमचा घोडाच ] हा मी
आतां हिरावून घेतों. २८

गड्यांनो, या घोड्याला घेरा चोहोंकडून, द्या ढेकळांचा मार, आणि परतवा त्याला. त्या बिचाऱ्याला हरिणांच्या संगतींत रवंथ करूं द्या.

३ क्रोधाविष्ट पुरुष ( प्रवेश करून, ताठ्यानें )—कायरे मूर्ख पोऱ्या !

जीभ फारशी लांब केलीस ? आमचे हे सशस्त्र सैनिक मोठे कडवे आणि तिखट आहेत. त्यांना पोराचें सुद्धां अमर्याद भाषण सहन
६ होत नाहीं. शत्रूचें मर्दन करणारा आमचा राजपुत्र चंद्रकेतु हें कधीं न पाहिलेलें सौम्य तपोवन कौतुकानें पाहण्यांत गुंतला आहे. तो येथें येऊन पोहोंचावयाच्या आंत एकदम या दाट झाडींतून पार
९ नाहींसे व्हा पाहूं.

**मुलें**––कुमारा, नको नको ह्या घोड्याची ब्याद. या शिपायांच्या रांगाच्या रांगा शस्त्रें सज्ज करून तुला दटावीत आहेत. आणि आ-
१२मचा आश्रम तर येथून दूर राहिला. तर चल. आपण हरिणासारख्या टण् टण् उड्या मारीत पळून जाऊं या.*

**लव** ( हंसून )––काय म्हणतां ? शस्त्रें सज्ज करीत आहेत ? तर मग
१५( धनुष्यास दोरी चढवीत )––

काठीचीं दोन अग्रें ह्याच ज्याच्या विक्राळ दाढा
आणि त्यांमध्यें ललत असलेली दोरी हीच
ज्याची जीभ व ज्यांतून घरघर असा घनघोर घोष
बाहेर पडत आहे असें, [ मोठ्यानें ] हंसत हंसत
घांसावर घांस घेणाऱ्या काळाच्या आ वांसलेल्या
जबड्याचें अनुकरण करणारें, हें माझें धनुष्यच

* या ठिकाणीं परशुरामपंतांनीं एक बऱ्यांपैकीं पद करून घातलें आहे—

चल जाउं अपुल्या घरा । कुमारा चल जाउं अपुल्या घरा ॥ ध्रु० ॥
कशास आम्हां अश्व पाहिजे । म्हणसी यातें धरा ॥ १ ॥
दाणा पाणी आणि खरारा । कोण करिल तोबरा ॥ २ ॥
गुरुजी आम्हां रागें भरातिल । विचार नाहीं बरा ॥ ३ ॥
आश्रमपदही दूर राहिलें । अतां करावी त्वरा ॥ ४ ॥

[ मला सज्ज करूं दे ].[1] २९

( यथोचित[2] इकडे तिकडे फिरून सर्व जातात. )

## महाकविश्रीभवभूतिप्रणीत उत्तररामचरित नाटकाचा कौसल्या व जनक नामक अंक चौथा[3] समाप्त.

१. ह्या पद्यांत मोठमोठे समास आहेत व त्यांत कठोर वर्णांचे अनुप्रास साधण्याचा प्रयत्न केला आहे. जेथें जेथें वीररस येतो तेथें तेथें भवभूति ह्याच 'रीती'चा अवलंब करितो. ह्याचें उत्कृष्ट उदाहरण ५·२६ हा श्लोक आहे. याच्या पूर्वार्धांत अगदीं साधी रचना आहे पण उत्तरार्धांत त्याच्या उलट आहे. भवभूतिकालीन कवींची ही एक समयसिद्ध बाबच बनून राहिली असली पाहिजे.

२. याचा अर्थ असा करावयाचा कीं मुलें घोड्यापाठीमागून कांहीं व त्यांतल्या त्यांत धीटशीं होतीं तीं लवाबरोबर त्याची पाठ राखण्याकरितां निघालीं. कोपाविष्ट सैनिक लवावर चाल करून गेला, पण लवानें बाणाचा वर्षाव करितांच तो जास्त कुमकेकरितां इतर सैनिकांकडे गेला, व लव त्याचा पाठलाग करीत गेला. यावरून रंगभूमीवर येथें एक छोटेखानी युद्धच होतें म्हटलें तरी चालेल. पण येथें हावभावानें सर्व काम होतें.खरोखरीचें युद्ध रंगभूमीवर दाखविणें नाट्यशास्त्राच्या नियमाविरुद्ध आहे. पुढें पांचव्या अंकाचा शेवट पहा.

३. जनक व कौसल्या हीं या अंकांतील प्रधान पात्रें होत. दोघांचीही भूमिका शोकरसपूर्णच आहे; परंतु रामाच्या करुणरसाशीं तुलना करितां जनकाचा व कौसल्येचाही करुणरस भिन्न आहे—तो त्याचा निराळा 'विवर्त' आहे ( उत्तररामचरित ३·४८ )—असें थोडा विचार केला असतां दिसून येईल. राम आपल्या पत्नीकरितां शोक करीत आहे, पण त्यामध्यें स्वतःचाच दोष असल्यानें त्यास, निदान लोकलज्जेस्तव, आपलें दुःख व्यक्त करून दाखवितां येत नाहीं. जनकाची अशी स्थिति नाहीं. त्याला दोष देण्याला जागा आहे; व म्हणून त्याच्या शोकामध्यें रागाची छटा दिसून येते. कौसल्येचें दुःख निराशामूलक आहे. तिचा सर्व जन्मच दुःखांत गेला आहे. प्रथम अनपत्यतेचें दुःख, नंतर पतिनिधन व पुत्रवियोग, व

शेवटीं आतां सीतेवर आलेला हा दुर्धर प्रसंग. तिच्या बाबतींत तरी 'सुख पहातां जवापाडें, दुःख पर्वताएवढें' हेंच खरें ठरतें व यावरून ४·१८[३] मधील ' लहानपणीं आनंदाला थोडें सुद्धां कारण पुरतें ' हे तिचे शब्द किती अर्थपूर्ण आहेत त्याची कल्पना होते.

तिसऱ्या अंकानें सीतेचें समाधान झालें; पण कौसल्याजनकादिकांचें समाधान झाल्याशिवाय सातव्या अंकांतील 'संमेलन' घडवून आणणें अशक्य होतें. प्रस्तुत अंकामध्यें या गुरुजनांचा राग कोणत्या पल्ल्यास गेला होता व त्यांचें समाधान करणें सुलभ आहे किंवा कसें याचें दिग्दर्शन केलें आहे. उत्तररामचरित ४·२४ च्या पूर्वार्धांत जनकास आलेला राग अरुंधतीनें दोन विवेकाच्या गोष्टी ( ४·२५ ) सांगून उत्तरार्धांत घालविला आहे हें लक्षांत घेतां गुरुजनांचें समाधान होणें दुरापास्त नव्हतें हें स्पष्ट होतें. कदाचित् हें असें स्पष्ट करणें हाच या प्रसंगाचा अंतस्थ हेतुही असूं शकेल.

या अंकाचें दुसरें कार्य म्हणजे प्रेक्षकांस लवाची ओळख करून देणें. लवाची रम्य मूर्ति रंगभूमीवर असे तों कौसल्येप्रमाणेंच प्रेक्षकांची वृत्ति सर्वस्वीं तदाकार होते; दृष्टि त्याजवरून ढळत नाहीं. याचें कारण भवभूतीनें लवामध्यें त्याच्या वयास सर्वथा उचित असे सर्व हृदयंगम गुण ठेविले आहेत हेंच होय ( वर पृष्ठ १९३ टीप १, पृष्ठ १९६ टीप १, पृष्ठ १९८ टीप ३, व पृष्ठ १९९ टीप २पहा). त्याच्या आंगचे इतर गुण पुढें पांचव्या व साहाव्या अंकांत जास्त व्यक्त होणार आहेतच. प्रेक्षकांस आतां पावेतों मिळालेल्या माहितीवरून लव हा रामाचाच मुलगा याबद्दल संशय राहणें शक्य नाहीं. तथापि अरुंधतीच्या ४·१८[९–१२] तील भाषणावरून सर्व संशयाची निवृत्ति होते. पितापुत्रांची ओळख पटण्याचें मुख्य साधन जीं जृंभकास्त्रें त्यांचा उल्लेख अद्याप व्हावयाचा आहे. तूर्त उभयतांच्या चेहऱ्याचा सारखेपणा हें एकच कारण पुढें आलें आहे. ॲरिस्टाटल् ह्या प्रसिद्ध तत्त्ववेत्यानें ग्रीक नाटकांवर टीका करितांना म्हटलें आहे कीं प्रत्यभिज्ञानास आकृतींचें सादृश्य हें नाटदृष्ट्या पुरेसें कारण होत नाहीं. हें तत्त्व भवभूतीसही कबूल आहे. तथापि इतर जास्त समर्पक साधनां-बरोबर ह्या साधनाचाही उपयोग करावयास हरकत नाहीं; व उपयोग करावयाचाच तर तें साधन जितकें समर्पक करितां येईल तितकें करावें. याचकरितां थोडी पुनरुक्ति होईल हा दोष मनांत न आणितां रामाशिवाय या अंकांत जनक व कौसल्या व पांचव्या अंकांत सुमंत्र या सर्वांस राम व लव यांचें आकृतिसादृश्य दिसून आलें व त्या सर्वांनीं त्याबद्दल एकच तर्क केला असें भवभूतीनें मुद्दाम दाखविलें आहे.

या अंकांतील इतर अवांतर बाबींचाही थोडक्यांत उल्लेख केला पाहिजे. विष्कंभाचें आम्हीं वर विस्तृत विवेचन केलेंच आहे. त्याशिवाय दुसरी लक्ष वेधण्यासारखी गोष्ट म्हणजे सोयरीक जमून आल्यानंतर जनक व दशरथ या व्याह्याव्याह्यांमध्यें दिसून येणारें प्रेम (उत्तररामचरित ४·१३, १४, १७ वगैरे). जनक व अरुंधती यांच्या तोंडीं त्यांच्या दर्जास व ज्ञानास साजेशी भाषा वापरली आहे हें आपण वर (पृष्ठ १८३ टीप १) पाहिलेंच आहे. लवांचें भाषणही असेंच आर्षसंस्कारानें युक्त आहे. उदाहरणार्थ, मूळांत ४·२६[17] मधील 'ह' हें अव्यय, ४·२८[1] मधील 'अपघ्नन्तः' हा शब्द, हीं वैदिक भाषेंत प्रायः आढळतात. या मुद्याचें विशेष विवेचन पुढें ५·३१[1–2] या ठिकाणीं आम्हीं करणारच आहोंत.

अंकाचा प्रारंभ अगदीं चटकदार व विनोदपूर्ण झाला. जनकाच्या प्रवेशानंतर त्यास थोडा गंभीरपणा आला व पुढें कौसल्या आल्यानंतर तर त्याजवर करुणरसाची दाट छाया पसरली. दुसऱ्या व तिसऱ्या अंकांतील रडारड ह्याही अंकांत पुनः अनुभवास येणार कीं काय अशी क्षणैक भीति उत्पन्न होते न होते तोंच अश्वाच्या अपूर्व दर्शनानें गोंधळून गेलेले लवाचे बाल सहाध्यायी एकदम येऊन सर्व काळजी, चिंता, चटसारी दूर करितात. हा प्रवेश नुसता वाचून त्याची योग्य पारख होणार नाहीं. तशी कल्पनाशक्ति असल्यास रंगभूमीवर हा प्रयोग कसा वठेल याचें चित्र डोळ्या पुढें आणावें—महाराष्ट्र रंगभूमीच्या दुर्दैवानें तें चित्र प्रत्यक्ष पाहणें सध्यां तरी अशक्य कोटींतलें झालें आहे—म्हणजे उत्तररामचरित हें नाटक नुसतें श्राव्यच आहे कीं काय त्याचा उलगडा होईल. या बाबतींत पृष्ठ १९८ वरील टीप २ पहा. भवभूतीच्या नाटकांमध्यें हास्यरस नाहींच; जो कांहीं आहे तो या नाटकांतच. हास्यरसाशिवाय—विदूषकाशिवाय—नाटकास रंग चढतच नाहीं अशी पुष्कळांची समजूत आहे व ती एकंदरींत खरीही आहे. पण प्रत्येक नियमाला अपवाद हे असतातच. उत्तररामचरिताच्या पहिल्या अंकांत (१·१८[3]) सीतेनें लक्ष्मणाची जी थोडी थट्टा केली आहे त्यानंतर या नाटकांत खरा हंसण्याजोगा प्रसंग प्रस्तुत अंकांतच कायतो आहे. तरी पण भवभूतीच्या विनोदाचा हा एकच मासला इतका सरस आहे कीं त्यामुळें हास्यरस म्हणजे कशाशीं खातात हें भवभूतीस ठाऊकच नव्हतें असें विधान कोणासही करितां येणार नाहीं. बाकी एकंदरींत भवभूतीचा स्वभाव गंभीर व हास्यविन्मुख खराच. उपोद्घात पृष्ठ ५८ पहा.

# अंक पांचवा

**पडद्यांतून**—अहो सैनिक हो ! आला—आला ! आमचा रक्षण-कर्ता आला !

सुमंत्र त्वरेनें ज्या रथाचे फुरफुरणारे व वेगवान्
घोडे पिटित आहे आणि मार्गांत थडक लागल्या-
मुळें ज्यावरील कोविदार[1] यष्टीचा ध्वज खालीं वर
होत आहे अशा रथावर आरूढ होऊन—आ-
मच्या युद्धाचें वर्तमान कळतांच—कुमार चंद्र-
केतु [ हा पहा ] इकडेच येत आहे. १*

( तदनंतर सुमंत्र सारथ्यासह हातांत धनुष्य घेऊन रथांत
बसलेला आणि किंचित् आश्चर्य, हर्ष व संभ्रम यांनीं
युक्त असा चंद्रकेतु प्रवेश करितो. )

४ **चंद्रकेतु**—आर्य[2] सुमंत्र, पहा पहा—

कोपामुळें ज्याची मुखकांति किंचित् आरक्तवर्ण
झाली आहे व [ उत्साहानें ] ज्याच्या मस्तका-
वरील पांचही झुलुपें कंप पावत आहेत असा हा
कोणीतरी वीराचा छावा रणांगणांत शिरोभागीं
उभा राहून, ज्याचीं अग्रें एकसारखीं गुणगुणत
आहेत अशा आपल्या धनुष्यांतून, आमच्या सेने-
वर बाणांचा चोहोंकडे वर्षाव करीत आहे ! २

* सुमंत्र पिटितो जया जवन अश्व ज्या जोडिले
पथीं थडक लागतां ध्वज विशाळ ज्याचा हले ॥
रथीं बसुनिया अशा त्वरित चंद्रकेतूच हा
रणीं निधन आमुचें परिसतांचि आला पहा ॥ १ ॥

१. 'कोविदार'—वृक्षविशेष.

२. कंचुकीप्रमाणेंच सारथि वृद्ध व राजकार्यकुशल असावा लागतो. पुढें ५·६[2], ५·१३, वगैरे पहा. म्हणून चंद्रकेतूनें त्यास 'आर्य' म्हणणें व सुमंत्रानें चंद्रकेतूस 'आयुष्मन्' अथवा 'वत्स' म्हणणें उचित आहे.

केवढी आश्चर्याची गोष्ट !—

हा मुनिपुत्र,[१] पण रघुवंशाचा एकादा अप्रसिद्ध
अंकुर असावा तद्वत् [ याची कामगिरी आहे. ]
हा एकटा असून आमच्या सर्व सैन्यावर चोहों-
कडून हजारों देदीप्यमान बाण सोडून हत्तींचीं
गांठीदार गंडस्थळें ठणादिशिं भेदून मोठें भयंकर
[ कृत्य करीत आहे ]. याचें मला [ फारच ]
कौतुक वाटतें. ३

**सुमंत्र**—आयुष्मन्,—

ज्याचा पराक्रम देवदैत्यांनाही भारी जाईल व जो
रूपानें [रामभद्र]तुल्य आहे अशा या कुमारास
पाहतांच कुशिकसुत [ विश्वामित्राच्या ] यज्ञांत
विघ्न आणणाऱ्या [ राक्षसांचें ] हातांत धनुष्य
घेऊन शासन करणाऱ्या रघुनंदनाचीच मला आठ-
वण होते. ४

**चंद्रकेतु**—या एकट्या विरुद्ध इतक्या जणांनीं झुंजावें याचीच माझ्या हृदयाला लाज वाटते.

कारण हा मुलगा एकटाच असून त्याला आमच्या
सैनिकांनीं, समराच्या शिरोभागीं, आपल्या क्रूर
व धिप्पाड हातांनीं धारण केलेल्या व एकसा-
रख्या लखलखणाऱ्या शस्त्रांच्या निबिड रागांनीं—
तसेंच रुणझुणणाऱ्या सुवर्णाच्या घागऱ्यामुळें
झणझण करणाऱ्या रथांनीं—आणि मदाचा विपुल
वर्षाव करणाऱ्या मेघांसारख्या गजांनीं—चोहों-
कडून घेरून टाकिलें आहे. ५

१. लवाच्या पराक्रमामुळें जरी तो रघुवंशातला असावा असें चंद्रकेतूस व पुढें (५·४) सुमंत्रास वाटलें—आणि लव जवळ आल्यानंतर त्याच्या आकृतीमुळें सुमंत्र जरी क्षणैक (५·२०) भ्रांतींत पडला—तरी ५·२९ मध्यें लव स्पष्ट सांगेपर्यंत तो मुनिकुमारच असावा असेंच त्यांना वाटलें.

**सुमंत्र**—वत्सा [ चंद्रकेतो ], हे सर्व एकवटून त्याजवर चाल करून गेले तरी त्याचें काय होणार? एक एकटे फुटून गेल्यास तर
३ बोलावयालाच नको.

**चंद्रकेतु**—आर्या, त्वरा करा त्वरा करा. यानें आमच्या आश्रित-जनांची अगदीं वाताहत करून सोडिली. कारण,—

याच्या प्रत्यंचेच्या टणत्कारांत [आमच्या सैन्यांतील ] दुंदुभींच्या प्रचंड दुमदुमाटांची भर पडून एकच हलकल्होळ माजला आहे व त्यामुळें दूर-दूरच्या गिरिगव्हरांत गुणगुणाऱ्या[1] गजांच्या कळपांमधून सुद्धां तीव्र मस्तकशूळ उठला असेल! या वीरानें तोडून पाडिलेल्या असंख्य मस्तकांच्या भीषण शकलांनीं आच्छादित झालेली ही भूमि तृप्त झालेल्या काळाच्या अक्राळ-विक्राळ मुखांतून वमन होऊन बाहेर आलेल्या घांसांनीं जणूं काय भरलेली दिसत आहे! ६

**सुमंत्र** ( स्वगत )—अशाशीं द्वंद्व खेळण्यास मीं चंद्रकेतूस कशी संमति द्यावी? ( विचार करून ) अथवा इक्ष्वाकूच्याच कुलामध्यें
३ आमचे काळ्याचे पांढरे झाले. न्यायानें जें प्राप्त झालें तें टाळतां कसें येईल?

**चंद्रकेतु** ( आश्चर्य, लज्जा, व संभ्रम यांनीं युक्त होऊन )—धिक्कार
६ असो. माझीं सर्व सैन्यें सर्व बाजूंनीं परत फिरलीं!

**सुमंत्र** ( रथास वेग दिलासें करून[2] )—आयुष्मन्, तो वीर हा

१. हत्तीच्या गर्जनेला गुणगुणणें ( आगुञ्जत् ) म्हणणें जरा अप्रयोजक आहे. पण कुञ्जकुञ्जर यांशीं अनुप्रास साधण्याकरितां भवभूतीनें हा शब्द वापरिला असावा. 'आगर्जत्' हें पाठान्तर अलीकडचें आहे.

२. यावरून खरोखरीचा रथ रंगभूमीवर आणिलेला नसावा. पण रथांतून खालीं उतरणें वगैरे क्रिया सर्व हावभावानेंच करणें बरेंच कठिण व कुशलतेचें काम आहे यांत संशय नाहीं. नाट्यशास्त्रामध्यें (अध्याय १२) भरतमुनीनें यासंबंधांत कांहीं सूचना केल्या आहेत, त्या अशा—

आतां तुझ्या शब्दाच्या टप्प्यांत आला.

९ चंद्रकेतु ( विसरल्यासारखें करून )—आर्य, बोलवावयास आलेल्या लोकांनीं त्याचें काय नांव सांगितलें ?

**सुमंत्र**—'लव' म्हणून.

**चंद्रकेतु**—हे महाबाहो लवा ! या सैनिकांशीं तुला काय करावयाचें आहे. हा मी येथें आहें. मजकडेच ये. तेजानेंच तेज शांत होवो. ७

**सुमंत्र**—कुमारा, पहा पहा.

हा बालवीर तुझ्या हांकेसरसा, सैन्यसंहाराचें काम टाकून, सिंहाचा मर्द छावा मेघगर्जना ऐकतांच हत्तींच्या कळपास चित करण्याचें सोडून जसा परत फिरतो तद्वत्, हा पहा परत फिरला. ८*

( तदनंतर त्वरित व आवेशानें पावलें टाकीत लव प्रवेश करितो. )

**लव**—शाबास, राजपुत्रा, शाबास. तूं खरा इक्ष्वाकुकुलांतला आहेस

३ तर हा मी येथें आलों आहें.

( पडद्यांत मोठा गलबला. )

**लव** ( त्वेषानें परत फिरून )—आः ! इतकी मीं यांची खोडकी

६ जिरविली तरी सुद्धां हे सैनिक मागें वळून पुनः युद्धाच्या लालसेनें मला वेढूं पाहतात काय ? धिक्कार असो या नीचांना !

" रथस्थस्यापि कर्तव्या गतिस्तूर्णपदैरथ ॥
समपादं तथा स्थानं कृत्वा रथगतिं व्रजेत् ॥७८॥
धनुर्गृहीत्वा चैकेन तथा ह्येकेन कूबरम् ॥
सूतश्चास्य भवेदेवं प्रतोदानग्रहाकुलः ॥ ७९ ॥ "

* हा बालवीर पृतनामथना त्यजून
हांके तुझ्या परतला झणि आयकून ॥
मेघध्वनी परिसतांच गजावमर्द
सोडून जेंवि फिरतो हरिशाव मर्द ॥ ७ ॥

पर्वतांच्या आघातानें[१] क्षुब्ध झालेल्या वडवाग्नीच्या मुखांनून निघालेल्या ज्वाळांप्रमाणें प्रचंड अशा माझ्या क्रोधाच्या ज्वाळांच्या लोटास, प्रळय-काळच्या पवनांनीं[२] उचंबळलेल्या समुद्राच्या लाटांप्रमाणें चोहोंकडे फांकणारा हा या अवाढव्य सैन्यांतून उठलेला मोठा हलकल्होळ, भक्ष्य-स्थानीं होऊं द्या. ९

( आवेशानें इकडे तिकडे फिरतो. )

**चंद्रकेतु**—हे बालवीरा !

तुझ्या अत्यंत आश्चर्योत्पादक गुणांनीं तूं मला प्रिय झाला आहेस, व म्हणून तूं माझा मित्र आहेस; अत एव जें माझें तें तुझेंच झालें. असें आहे तेव्हां या तुझ्याच परिजनावर उगाच राग कां काढितोस ? तुझ्या दर्पाचा कस पारखून घेण्यास हा चंद्रकेतुरूप निकष येथें उभा आहे—पहात नाहींस काय ? १०*

**लव** ( हर्षानें व संभ्रमानें परत फिरून )—अहो ! या सूर्यकुलोत्पन्न महानुभाव कुमारानें योजिलेली ही वीरोक्ति[३] किती प्रेमळ आणि

* त्वदीय गुण पाहतां गमसि सत्य माझा सखा
मदीय जन तो तुझा सकलही न तूं पारखा ॥
निजा परिजनावरी निकर मांडिशी हा कसा
प्रवीर तरि तूं खरा उतरशील माझ्या कसा ॥९॥

१. इंद्र आपल्या वज्रानें पर्वतांचा पक्षच्छेद करीत असतां त्यापैकीं कांहींनीं समुद्रांत उड्या घेतल्या व तेथें लपून राहिले.

२. प्रलयकालीं ४९ प्रकारचे पवन सुटतात.

३. वरील श्लोकाच्या पहिल्या दोन चरणांमध्यें चंद्रकेतूनें लवास जरी मित्र म्हटलें तरी दुसऱ्या चरणाचा अर्थ असा होतो कीं क्षुद्र परिजनांशीं लढून लवानें विजय मिळविला यांत कांहीं मोठेंसें कृत्य केलें नाहीं. अजून खरी पारख व्हावयाचीच आहे.

३ तशीच खोंचदार आहे ! असो. ह्यांच्याशीं मला काय करावयाचें आहे ? याचाच अगोदर समाचार घेऊं.

( पडद्यांत पुनः गलबला. )

६ **लव** ( क्रोधानें व तिरस्कारानें )—आः ! वीरावीरांच्या सामन्यांत विघ्न आणणाऱ्या या दुष्टांनीं मला अगदीं भंडावून सोडिलें ! ( सैनिकांवर चाल करून जातो.)

९ **चंद्रकेतु**—आर्या, पहा. ही पाहण्यासारखी गोष्ट आहे—

दर्पानें व कौतुकानें प्रेरित होऊन याचें सर्व लक्ष मजकडे वेधून राहिलें आहे, व मागून सैनिक [ चाल करून ] येत असल्यानें धनुष्य ओढून हा [ त्यांजकडे जात आहे ]. या वेळीं दोन [ विरुद्ध ] दिशांनीं उठलेल्या वाऱ्यांच्या मध्यभागीं सांपडलेल्या व इंद्रधनुष्य धारण करणाऱ्या मेघाप्रमाणें याची शोभा दिसत आहे ! ११

**सुमंत्र**—कुमाराला निदान त्याच्याकडे पाहवतें तरी; विस्मयानें परवश होऊन [ आम्हांला तेंही करितां येत नाहीं[1] ].

३ **चंद्रकेतु**—अहो राजे लोक[2] हो !

तुम्ही असंख्य, आणि हा येथें एकटा; तुम्ही गजांवर, अश्वांवर वा रथांत बसलेले, आणि हा पादचारी; तुमचीं शरीरें चिलखतानें मढविलेलीं, आणि [ हरिणाचें ] पवित्र चर्म हेंच याचें उत्तरीय; तुम्ही वयानें श्रेष्ठ, आणि अल्पवयी व सुंदरतनु असा हा;—याच्या बरोबर युद्ध करण्याकरितां ज्या तुम्हीं कंबर बांधिली त्या तुमचा—

१. चंद्रकेतूनें नाउमेद होऊं नये याकरितां सुमंत्र हें कांहीं तरी बोलत आहे.
२. अश्वरक्षक सैनिक राजकुलोत्पन्न असावेत असा नियम आहे.

व त्याबरोबर आमचाही—धिक्कार असो ! १२*

**लव** ( चिडून जाऊन )—काय ? माझी हा कींव करूं पाहणार ! ( विचार करून ) बरें. आतां [ सैनिकांशीं झुंझण्यांत जो] माझा वेळ ३ जाणार तो वांचविण्याकरितां जृंभकास्त्राचा प्रयोग करून सर्व सैन्य निश्चेष्ट करून सोडितों. ( ध्यान करीत राहतो. )

**सुमंत्र**—हें काय ? आमच्या सैन्यांतील गलबला एकाएकीं शांत ६ कसा झाला ?

**लव**--आतां याच्याशीं निःशंकपणें चार गोष्टी करूं या.

**सुमंत्र** ( गडबडीनें )—वत्सा, मला वाटतें या बालवीरानें जृंभका- ९ स्त्राचा प्रयोग केला असावा.

**चंद्रकेतु**—यांत काय संशय ?

भीषण अंधकार व विजेचा लोळ यांचा जसा
संयोग व्हावा तद्वत् [ हें अस्त्र ] आमच्या एकाग्र
दृष्टीस सुद्धां [क्षणैकच] पदार्थ दाखवून व पुनः तो
तिरोहित करून दृष्टीचें सामर्थ्य हिरावून घेत
आहे. तसेंच हें सर्व सैन्य चित्राप्रमाणें पापणीस
पापणी देखील न लावतां उभें राहिलें आहे,
तेव्हां निःसंशय अकुंठवीर्य जृंभकास्त्राचाच हा
प्रभाव होय. १३

* तो एकाकी अगणित तुम्ही वाहनीं भूमिसंगीं
अंगामध्यें कवच तुमच्या चर्म आहे तदंगीं ॥
तो हा बाल प्रवयस तुम्ही पाहता त्या तशातें
जिंकायाला विषम समरीं धिक् तुम्हांतें अम्हांतें ॥ ११ ॥

१. सहाव्या अंकांतील प्रत्यभिज्ञानाचें मुख्य साधन जीं जृंभकास्त्रें त्यांचा येथें फार कुशलतेनें उपयोग केला आहे. एकादी स्वतःस माहित झालेली गुप्त गोष्ट उघडकीस आणण्यास उतावीळ झालेल्या मुलाप्रमाणें भवभूत पहिल्या संधीलाच ( ५·८५ ) हीं जृंभकास्त्रें पुढें आणीत नाहीं. महावीरचरितांत माल्यवंताच्या भूमिकेसंबंधानें जें आत्मसंयमन करितां आलें नाहीं ( उपोद्घात § १६) तें आतां भवभूतीस करितां येतें हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

आश्चर्य, आश्चर्य !

> पातालाच्या उदरांत गुहांतून सांठलेल्या अंधकाराप्रमाणें काळया कुट्ट आणि तापून लाल झालेल्या पितळेप्रमाणें पिंगट वर्णाच्या ज्वालांनीं ज्यांची कांति लखलखत आहे अशा जृंभकास्त्रांनीं हें आकाश व्यापून राहिलें आहे; व त्यामुळें तीं— कल्पांतीं[१] होणाऱ्या प्रलयाच्या वेळीं वाहणाऱ्या वेगवान् व भयंकर [ झंझा–] वातांनीं उडवून दिलेल्या, व एकमेकांवर आदळणाऱ्या मेघांपासून उत्पन्न झालेल्या विद्युल्लतेनें ज्यांतील गुहा कपिल-वर्ण झाल्या आहेत अशा—विंध्याद्रिशिखरांप्रमाणें शोभत आहेत ! १४

**सुमंत्र**—पण याला जृंभकास्त्रें प्राप्त कोणापासून झालीं असावींत ?

**चंद्रकेतु**—आम्हांस[२] वाटतें भगवान् वरुणपुत्र [वाल्मीकि] पासून.

२ **सुमंत्र**—छे, वत्सा. अस्त्रांच्या बाबतींत—आणि विशेषतः जृंभकास्त्रांच्या बाबतींत—हें असें शक्य नाहीं. कारण,—

> हीं प्रथम कृशाश्वापासून उत्पन्न झालीं, व कृशाश्वापासून कुशिकसुत [ विश्वामित्रास ] प्राप्त झालीं आणि त्याजपासून संप्रदायपरंपरेनें तीं सध्यां रामभद्राजवळ राहिलीं आहेत.[३] १५

**चंद्रकेतु**—सात्त्विक तेजाचा उत्कर्ष झाला म्हणजे इतर 'मंत्रदृक्'

१. कल्प=४,३१८,२७२,००० मानवीं वर्षें.

२. 'आम्हांस' हा शब्द येथें मुद्दाम योजिल्यासारखा दिसतो; व त्यावरून लवास जृंभकास्त्रें अवगत होतीं तरी चंद्रकेतूचा आत्मविश्वास त्यानें तिळमात्र ढळला नाहीं हें व्यंजित होतें.

३. मागें १·१४[८–११] पहा. रामभद्राजवळ राहिलीं म्हणजे त्याजपासून दुसऱ्या कोणास मिळालीं नाहींत.

मुनीनांही[1] [ असलीं अस्त्रें ] स्वयं प्रकाशमान होणें शक्य आहे.

सुमंत्र—वत्सा, सावध रहा. तुझा प्रतिस्पर्धी वीर संनिध पातला.

**दोघे कुमार** ( एकमेकांस[2] )—हा कुमार किती प्रियदर्शन आहे ! ( स्नेहानें व प्रीतीनें निरखून )—

आमची ही आकस्मिक गांठ पडली म्हणून असो
वा याच्यामधील गुणांच्या अत्युत्कर्षामुळें असो,
अथवा आमचा पुरातन जन्मांतरींचा अगदीं निक-
टचा संबंध होता, किंवा [ याच जन्मींचें ] जव-
ळचेंच कांहीं तरी नातें असून दैवयोगानें तें
अज्ञात राहिलें आहे म्हणून असो; [ एवढें मात्र
खरें कीं ] हा दृष्टीस पडतांच माझें हृदय अगदीं
तल्लीन होऊन राहिलें आहे. १६

**सुमंत्र**—प्रायशः सचेतन प्राण्यांचा हा स्वभावधर्मच आहे कीं एका-द्याचें दुसऱ्या एकाद्यावर प्रेम जडावें. लोकांमध्यें अशा प्रेमाला गण-मैत्री अथवा [ प्रथम- ]दर्शनानुराग अशी संज्ञा आहे. व तें दुर्वि-ज्ञेय आहे, त्याचें कारण शोधूं पाहतां सांपडत नाहीं, असें ऋषि-वचन आहे.

एकाद्याकडे जर आपला निर्हेतुक ओढा दिसून
आला तर त्याला आळा घालणें शक्य नाहीं. तो
एक स्नेहात्मक धागा आहे, व त्यानें शरीरांतील
मर्मस्थानें घट्ट शिवलीं जातात. १७

१. अशाच रीतीनें वसिष्ठविश्वामित्रादिऋषींना वेदमंत्र प्रकट झाले अशी समजूत आहे. सुमंत्राला प्रथम लवास पाहतांच (५·४) जो संशय आला तो या जृंभकास्त्रज्ञानानें दृढ झाला. पण ही गोष्ट अशक्य. देवी सीता जगांतून नाहींशीच झाली असें पुढें लगेच (५·२०) तो आपलें समाधान करून घेतो. सीतेसंबंधानें सर्वांची हीच समजूत झाली होती. मागें ३·२९, ४·५ वगैरे पहा.

२. या व पुढें येणाऱ्या जोड भाषणांबद्दल मागें पृष्ठ १६८ टीप १ पहा.

**दोघे कुमार** ( एकमेकांस )—

उंची रेशमाप्रमाणें सतेज व सुकुमार अशा या शरीरावर शर कसे बरें सोडावेत ? ज्या या [शरीरा]चें दर्शन होतांच त्यास आलिंगन देण्याच्या इच्छेनें माझें अंग रोमांचरूप कळ्यांनीं फुलून गेलें आहे ! १८

परंतु ह्यानें [ क्षत्रियाची ] कठोर वृत्ति धारण केली आहे तेव्हां आतां शस्त्राशिवाय उपायच राहिला नाहीं; आणि याच्यासारखा विषय ज्या शस्त्राला लाधत नाहीं त्या शस्त्राचा तरी मग उपयोग काय ? शस्त्र तर उगारिलें; आतां मी युद्धविन्मुख झाल्यास हा तरी काय म्हणेल ? खरोखर, वीरपुरुषांचें व्रत दारुण; त्यामध्यें दयेमायेस थारा नाहीं. १९

**सुमंत्र** ( लवास निरखून, डोळ्यांत आंसवें आणून, स्वगत )— हृदया ! कां उगीच भलतीकडे सैरावैरां धांवतेंस ?

आमच्या मनोरथाचें जें बीज[1] तेंच अगोदर दैवानें हिरावून नेलें. लता मुळाशींच जर छेदिली तर तिजवर पुष्पांचा भर येईल कोठून ? २०*

**चंद्रकेतु**—आर्या सुमंत्रा, मी रथांतून उतरूं इच्छितों.

**सुमंत्र**—तें कां म्हणून ?

३ **चंद्रकेतु**—एक तर असें केल्यानें या वीर पुरुषाचा सन्मान केल्यासारखें होईल; शिवाय, आर्या, क्षात्रधर्माचेंही अनुसरण होईल. 'रथीनें पदातीशीं युद्ध करूं नये' असा युद्धशास्त्रवेत्त्यांचा नियम आहे.

* बीजचि मनोरथाचें दैवें नेलें हिरून दाटून ॥
होतां विच्छिन्न लता पुष्पफलाशा उरेल कोठून ॥ २२ ॥

१. अर्थात् सीता.

६ **सुमंत्र**—( स्वगत ) दुर्दैवानें मी मोठ्या पेंचांत सांपडलों.

या यथान्याय आचरणाचा माझ्यासारख्यानें निषेध
तरी कसा करावा? आणि जें कृत्य निव्वळ साहसाचें
आहे त्याला मी अनुमति तरी कशी देऊं ? २१*

**चंद्रकेतु**—आमचे परमपूज्य वडीलसुद्धां त्यांच्याही वडिलांचे प्रिय मित्र जे आपण त्या आपला सल्ला, धर्मार्थाच्या बाबतींत संदेह उत्पन्न
३ झाला असतां, घेतात; असें असून आर्यांना आतां कोडें कसलें पडलें आहे ?

**सुमंत्र**—आयुष्मन् ! तुझा विचार धर्मास अनुसरून आहे.

संग्रामांतील हा नियम आहे—सनातन धर्मही
असाच आहे—व रघुवंशांतील वीरसिंहांनीं याच
शुद्ध मार्गाचें अवलंबनही केलें आहे. २२

**चंद्रकेतु**—आर्यांचें भाषण यथायोग्य आहे.

इतिहास, पुराण, व धर्मशास्त्राचीं वचनें, त्याच-
प्रमाणें रघुकुलाचें वीरव्रत कसें आहे हें सर्व आप-
णांलाच अवगत आहे. २३

**सुमंत्र**—(स्नेहानें त्यास कवटाळून, व आंसवें आणून)—

तुझा पिता—इंद्राच्याही जेत्यास जिंकणारा
वत्स लक्ष्मण—त्याला जन्मून तरी, वत्सा, असे
कितीसे दिवस झाले आहेत ? त्या [ लक्ष्मणा ]चा
पुत्रही वीरव्रतच पाळीत आहे तेव्हां सुदैवानें दश-
रथाचा वंश सुप्रतिष्ठित झाला असें म्हटलें पाहिजे. २४

**चंद्रकेतु**—( दुःखानें )—

रघुकुलाची ज्येष्ठ शाखा सुप्रतिष्ठित झाली नाहीं,
तेव्हां आमचें कुल सुप्रतिष्ठित झालें असें कसें
म्हणतां येईल ? आणि याच दुःखानें आमचे इतर

* जें कर्म न्यायागत त्यातें आपण कसें निषेधावें ॥
किंवा अनुमोदन तरि साहस कर्मास मीं कसें द्यावें ॥२३॥

गुरुजन[1] कष्टी आहेत. २५

**सुमंत्र**—हाय हाय ! चंद्रकेतूचे हे शब्द हृदयास अगदीं घरें पाडतात !

**लव**—काय चमत्कार ! माझ्या मनोविकारांची कशी चलबिचल ३ होत आहे !

पूर्णेंदूचा उदय झाला ह्मणजे कमलिनीला जसा
आनंद होतो तद्वत् याला पाहतांच माझ्या दृष्टीला
होत आहे; पण, प्रत्यंचेच्या [ अखंड व ] भीषण
टणत्कारानें गुणगुणणाऱ्या धनुष्याचीच ज्याला
आवड आहे व ज्याच्या अग्रभागीं [ धनुष्याच्या
दोरीमुळें ] विकट व विक्राळ असा व्रण झाला
आहे असा हा माझा बाहु युद्ध करण्याकरितां
फुरफुरत आहे.[2] २६*

**चंद्रकेतु**—( रथांतून उतरल्यासारखें करून )—आर्या ! हा सवितृकुलोत्पन्न चंद्रकेतु आपणांस वंदन करीत आहे.

**सुमंत्र**—ककुत्स्थाचें[3] दुर्जय, पावन, आणि उत्कर्षशाली

* इंदूदयीं कुमुदिनी जशि हर्ष पावे
पाहून यास मग दृष्टि तशी सुखावे ॥
बाहू पुन्हा फुरफुरे कलहा कराया
घाईच फार करितो धनुतें धराया ॥ २८ ॥

१. शब्दशः ‘ आमचे उरलेले तिघे पिते ’ म्हणजे स्वपिता लक्ष्मण, व भरत व शत्रुघ्न हे पितृव्य. रामास शोक अंतरीं होत असला तरी तो बाहेर दाखवीत नसे. मागें ३·३३ पहा.

२. या श्लोकांत रसप्राधान्यानुरूप पूर्वार्धांत मंजुळ व उत्तरार्धांत कठोर वर्ण योजिले आहेत. मागें पृष्ठ २०२ वरील टीप १ पहा.

३. रघुवंशांतील एक प्रसिद्ध पूर्वज. भवभूतीच्या वेळीं व त्यापूर्वींही उत्तर हिंदुस्थानांतील बऱ्याच क्षत्रियांचें आदिवराह हें कुलदैवत होतेंसें दिसतें. उदाहरणार्थ, मुद्राराक्षस नाटकाचें भरतवाक्य पहा. प्रस्तुत श्लोकाच्या पाठभेदावरून उत्तररामचरिताच्या पाठपरंपरेसंबंधीं आम्हीं जीं अनुमानें काढिलीं आहेत त्यासंबंधांत चित्रमयजगतचा १९१५ चा जानेवारीचा खास अंक पृष्ठें १३-१५ पहा.

तेज तुजप्रत लाधो.तो सनातन आदिवराह [ सदैव]
तुझें कल्याण घडवून आणो. २७

त्याचप्रमाणें—

तुझ्या कुलाचा आदिपुरुष—भगवान् सविता—
संग्रामांत तुझी बाजू राखो; तुझ्या गुरूचाही गुरु
जो मैत्रावरुण [ वसिष्ठ ] तो तुला आनंद देवो;
इंद्राचें व विष्णूचें, तसेंच अग्नीचें व वायूचें, आणि
गरुडराजाचेंही तेज तुझ्यामध्यें उतरो; आणि
रामलक्ष्मणांच्या धनुष्याचा टणत्कार हाच कोणी
एक मंत्र तुजला सिद्धि देवो ! २८

**लव**—कुमारा, तूं रथावर आहेस तोच अत्युत्तम शोभतोस. पुरे, पुरे. हा अत्यादर झाला.

३ **चंद्रकेतु**—तर मग महाभागानेंही दुसरा एक रथ अलंकृत करावा.[1]

**लव**—आर्य [ सारथे ], राजपुत्राला परत रथावर घ्या.[1]

**सुमंत्र**—तूंही वत्स चंद्रकेतूच्या वचनास मान दे.

६ **लव**—जीं ज्याचीं स्वाभाविक उपकरणें आहेत [ तीं वापरलींच पाहिजेत; ] त्यांजबद्दल विचार कसचा ? परंतु आम्ही अरण्यांत रहाणारे. रथांत बसावयाची आम्हांस संवय नाहीं.

९ **सुमंत्र**—मुला, दर्प आणि सौजन्य या दोहोंसही न सोडतां कसें बोलावें हें तुला ठाऊक आहे.[2] जर कां असा हा तूं इक्ष्वाकुकुलोत्पन्न

१. युद्ध सुरू करण्यापूर्वी उभयपक्षांनीं एकमेकाशीं चार शब्द बोलावे, ओळख नसल्यास करून घ्यावी, या शिष्टाचारास अनुसरूनच चंद्रकेतूला रथांत बसण्यास सांगून लव सारथ्यालाही त्याला वर घेण्यास सांगत आहे. लवास आपला प्रतिस्पर्धी रघुकुलोत्पन्न आहे एवढेंच ठाऊक असेल अशा समजूतीनें प्रस्तुतची संधि घेऊन सुमंत्रही लवास चंद्रकेतूचें नांव कळवीत आहे. ( ५·२८[५] ).

२. मागें १·१८[१३], १·२१[१], वगैरे स्थळें, व उपोद्घात §२२ पृष्ठ ६८ पहा. तूं रथावर असलास तरी मला पर्वा नाहीं. रथाचे चोचले राजे लोकांनीं करावेत. आम्ही अरण्यवासी. आम्ही जमिनीवर असलों तरी रथ्यांचा

राजा रामाच्या दृष्टीस पडशील[1] तर त्याचें हृदय स्नेहानें अगदीं
१२द्रवून जाईल !

**लव**—तो राजर्षि सुजन आहे असें समजतें. (किंचित् लज्जेनें)—

आह्मीं सुद्धां अशा रीतीनें यज्ञकृत्यांत देखील
अडथळा आणणाऱ्यांपैकीं प्रायशः नव्हेंत. राजा
[ रामाला ] त्याच्या गुणांबद्दल बहुमान देणार
नाहीं असा कोण आहे ? तथापि त्या अश्वर-
क्षकांनीं जे उद्गार काढिले त्यांमध्यें सर्व क्षत्रियांचा[2]
उपमर्द करणारे भयंकर शब्द होते म्हणूनच
मला राग आला. २९

**चंद्रकेतु** ( किंचित् हंसून )—एकूण तात [रामां]चाही प्रतापोत्कर्ष
आपल्याला सहन होत नाहीं काय ?

३ **लव**—सहन न होवो वा होवो. पण मी असें विचारितों कीं रघु-
वीर राम मोठ्या शांत वृत्तीचा आहे असें आम्ही ऐकितों. तो म्हणे
स्वतः उद्धत नाहीं व त्याच्या प्रजेमध्येंही औद्धत्य नसतें. तर मग
६ त्याचेच सेवक अशी राक्षसी वाणी कशी उच्चारितात ?—

उन्मत्तांच्या अथवा गर्विष्ठांच्या वाणीस ऋषी रा-
क्षसी वाणी म्हणतात. सर्व कलह तिजमुळें उद्भ-

पाडाव करूं शकतों. इत्यादि दर्पयुक्त उद्गार लवानें नुसते ध्वनित केले
आहेत हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

१. पूर्वीं सुमंत्रास लवाबद्दल जी शंका आली ( पृष्ठ २०६ टीप १ ) ती लव
अरण्यांतच वाढला आहे हें समजतांच दृढ झाली; व याचा एकदां
निकाल करून घ्यावा ह्याच करितां सुमंत्रानें आपल्या बोलण्यांत रामाचा
उल्लेख आणिला. हेतु हा कीं लवाच्या उत्तरावरून त्याचें व रामाचें
कांहीं नातें आहे किंवा कसें याचा निर्णय होईल. लवाच्या उत्तरानें सुमं-
त्राची निराशा झाली एवढेंच नव्हे तर त्यानें भाषणांत आणिलेल्या रामा
च्या उल्लेखावरूनच शब्दानें शब्द वाढून उभय कुमारांचें युद्ध जुंपलें.

२. हा मुलगा क्षत्रियकुलोत्पन्न आहे हें (वेषावरून पूर्वीं कळलें असलें तरी) आतां
अगदीं स्पष्ट समजून येतें.

वतात. तीच लोकांस अधोगतीस नेते. ३०*

असल्या वाणीची अशी निंदा केली आहे. त्याहून भिन्न जी दुसरी वाणी तिची अशी स्तुति केली आहे—

ती मनोरथरूप दुग्ध देते; अलक्ष्मीचा नाश करिते; कीर्तीप्रत प्रसविते; व दुष्कृतांना लयास नेते. सर्व मंगलांची जननी अशी जी ही प्रिय आणि सत्य अशी वाणी तिला जाणते लोक धेनु[1] म्हणतात. ३१§

**सुमंत्र**—वरुणपुत्र [ वाल्मीकींचा ] शिष्य—हा बालवीर—अत्यंत शुद्ध वृत्तीचा आहे. याचें बोलणें मार्मिक असून त्यामध्यें वेदाध्य-
३ यनाचा संस्कार दृग्गोचर होत आहे.[2]

**लव**—तसेंच, चंद्रकेतो, तूं 'एकूण तात [ रामां ]चाही प्रतापोत्कर्ष आपल्याला सहन होत नाहीं काय ?' अशी जी पृच्छा केलीस त्या-
६ संबंधीं विचारितों कीं क्षात्रधर्म [ अमक्यांतच असावेत अमक्यांत असूं नयेत असा कांहीं ] विषयाचा नियम[3] बांधून ठेवलां आहे काय ?

* उन्मत्तगर्वितांच्या वाणीतें राक्षसी असें म्हणती ॥
ती कारण वैराला निरयालाही असें मुनी गणती ॥ ३२ ॥

§ प्रसवति बहुकामा घालवी दुर्दशेसी
उपजवुनि सुकीर्ती दुष्कृतातें विनाशी ॥
सतत सदय माता मंगलाचीच मानूं
सुकवि वदति वाचा सूनृता कामधेनू ॥३३॥

१. कोणत्याही गोष्टीला धेनु म्हणणें ही तिची सर्वांत श्रेष्ठ स्तुति झाली अशी एके काळीं आर्यांची भावना होती.

२. मागें पृष्ठ २०४ पहा. मूळांत ५·२९[3] मधील 'अनुशुश्रुम' व ५·३०[1] मधील 'ह' व 'अभिष्टुवन्ति,' हे प्रयोग तसेंच 'कामान् दुग्धे' इत्यादि (निरुक्त १·४[6]) वाक्यें आर्ष संस्काराचीं द्योतक आहेत.

३. सारांश रामांत क्षात्रगुण उत्कर्षानें असतील, आपल्या वेळेस तो अद्वितीय योद्धा असेल, पण तसलाच किंवा त्याहून वरचढ क्षत्रिय पुनः निर्माण होणें शक्य नाहीं काय ?

**सुमंत्र**—इक्ष्वाकुकुलोद्भव राजा [ राम ] कसा आहे तें तुला माहीत
९ नाहीं. तर आतां पुरे कर. मर्यादा सोडून बोलूं नकोस.

आमच्या सैनिकांवर विजय संपादून तूं आपला
पराक्रम निःसंशय दाखविला आहेस; पण प्रत्यक्ष
जामदग्न्याचें[1] दमन करणाऱ्या [ राजा रामा ]
बद्दल असें अमर्यादेनें बोलणें रास्त नाहीं. ३२

**लव** ( हंसून )—आर्या ! त्या तुमच्या राजानें जामदग्न्याचें दमन
केलें यांत फुशारकी ती कसली ?

ही गोष्ट सिद्धच आहे कीं ब्राह्मणाचें बळ काय
तें बोलण्यांत आहे; बाहूंचें बळ म्हणून जें आहे
तें क्षत्रियांनाच असतें.[2] जामदग्न्यानें शस्त्रें धारण
केलीं होतीं पण तो [जातीनें] ब्राह्मणच. त्याचें
दमन केलें म्हणून त्या राजाची प्रौढी ती
काय ? ३३

**चंद्रकेतु** ( किंचित् संतापानें )—आर्या, आर्या ! आतां जास्त उत्त-
रास प्रत्युत्तर करण्यांत अर्थ नाहीं.

मला वाटतें हा कोणीं एक वीररसाचा लोकोत्तर
अवतार आज नव्यानेंच पृथ्वीवर आला आहे, कीं
ज्याला प्रत्यक्ष भृगुनंदन [ जामदग्न्य ] सुद्धां
वीर वाटत नाहीं; आणि सप्त लोकांना ज्यांचे-
मुळें अभयरूप दक्षिणा मिळाली अशीं तातांचीं
पावन चरितेंही ज्याला अवगत नाहींत ! ३४

**लव**—रघुपतीचें चरित व महिमा अवगत नाहीं कोणास ? मला त्या

१. लवाचा मुनिकुमाराचा वेष पाहून सुमंत्रास जामदग्नीची आठवण झाली असावी; पण घोंगडें त्याच्याच गळ्यांत आलें.
२. या पूर्वार्धात ' ब्राह्मणोऽस्य मुखमासीद् बाहू राजन्यः कृतः ' या प्रसिद्ध वैदिक मंत्राची छाया आहे.

संबंधांत चार शब्द बोलतां आले असते, पण जाऊ द्या.

ते वृद्ध आहेत; त्यांच्या चरित्राचा काथ्याकूट
आम्हीं करूं नये. चालायचेंच. त्यांत विशेष
सांगावयाचें तें काय ? सुंदाच्या बायकोला [ताट-
केला ] मारिली तरी त्यांच्या यशाला खंड पडत
नाहीं; लोकांमध्यें माहात्म्यांत त्यांची गणना होते.
तसेंच खरराक्षसाच्या वधाच्या वेळीं कोणीकडे
तरी तोंड करून—[ मागें तोंड करून असें नाहीं
कांहीं मी म्हणत ]—जीं तीन पावलें घेतलीं[1]
अथवा इंद्रपुत्र वालीची हत्या करितांना[2] जें कांहीं
कौशल्य दाखविलें तें लोकांना माहीत नाहीं असें
नाहीं. ३५

**चंद्रकेतु**—आः निर्मर्यादा ! प्रत्यक्ष तातांना दोष देतोस ! तूं फारच बहकूं लागलास म्हणावयाचें !

**लव**—अरे, माझ्यावरच यानें भिंवई चढविली !

**सुमंत्र**—यांचा क्रोध धुमसूं लागला. कारण,—

क्रोधानें उत्पन्न झालेल्या कंपामुळें मस्तकावरील
शिखांचीं बंधनें ढिलीं पडूं लागलीं; जात्याच
रक्तोत्पलाच्या पाकळीसारखे असणारे यांचे नेत्र
किंचित् [ अधिक ] रक्तिमा धारण करूं लागले;
आणि यांचें मुख, भुवया एकदम वर खालीं होऊं

१. खर अंगाशीं येऊन भिडला तेव्हां धनुष्यास वाव सांपडण्याकारितां अथवा त्याच्या स्पर्शाचा आपणांस विटाळ होऊं नये म्हणून राम तीन पावलें मागें सरले अशी कथा आहे. 'कुतोमुखानि' हा मूलांतील पाठ व्याकरण-दृष्ट्या दुःसाध्य असेल पण पुरातन हस्तलिखित प्रतींत तो आढळला. 'कुतोमुखान्यपि'च्या ऐवजीं 'कुतोपिमुखानि' असतें तर बरें झालें असतें. पण निरंकुशाः कवयः।

२. वाली सुग्रीवाशीं युद्ध करीत असतां रामानें त्यास बाण मारिला, हें प्रसिद्धच आहे.

लागल्यानें, ज्यावरील डाग स्पष्ट दिसत आहे
अशा चंद्राची अथवा ज्यावर भोंगे गुंजारव
घालीत आहेत अशा कमलाची शोभा धारण
करीत आहे. ३६

**दोघे कुमार**—तर मग चला, युद्ध करण्यास योग्य अशा स्थळीं[1] आपण जाऊं या.

( सर्व निघून जातात. )

## महाकविश्रीभवभूतिप्रणीत उत्तररामचरित नाटकाचा कुमारपराक्रम नामक अंक पांचवा[2] समाप्त.

१. पण ज्या अर्थीं येथेंच लवाचें सैनिकांशीं युद्ध झालें होतें त्या अर्थीं येथून लव व चंद्रकेतु यांना दुसरीकडे जाऊन लढण्याचें कारण नव्हतें. तथापि रंगभूमीवर युद्ध दाखविण्यास नाट्यशास्त्राची हरकत असल्यानें व विशेषतः अंक संपवावयास सबब पाहिजे ह्मणून ही युक्ति योजिली आहे.

२. महावीरचरितांतील 'महावीर' व सात्विक शौर्याचें नमुनेदार उदाहरण ( ideal of chivalry ) असा जो राम त्याचीच वीरवृत्ति लवामध्यें तंतोतंत उतरली आहे हें दाखविण्याचा प्रस्तुत अंकांत कवीचा प्रयत्न आहे. लव हा बारा वर्षांचा मुलगा आहे; महावीरचरितांतील राम त्याहून ५।६ वर्षांनीं मोठा होता; व वयांतील या भेदाप्रमाणें लवाचा बालभावास साजणारा अहंकार व हूडपणा ( पृष्ठ २०३ वरील टीप व पांचव्या अंकांतील लवाचीं भाषणें पहा ) महावीरचरितांतील रामामध्यें दाखविला नाहीं ( महावीरचरित, १.३१[१], १.३२[१] वगैरे ). तथापि मागें उपोद्घातांत एके ठिकाणीं दर्शविल्याप्रमाणें ( § १५, टीप ) रामासारखेच लवामध्यें शौर्य, निर्मत्सरता ( उत्तररामचरित, ५.२९प्र ), आत्मविश्वास ( उत्तररामचरित, ५.३१[४-७] ); शत्रूपासून कसलीही सवलत न घेण्याचा निश्चय ( उत्तररामचरित, ५.१२[१], ५.२८[६-८] ), व पुढील सहाव्या अंकांत दिसून येणारें त्याचें सौजन्य व मित्राविषयीं ( उत्तररामचरित ६.१९[१५] ) आणि गुरुजनाविषयीं ( उत्तररामचरित ६.१३[१] ) आदरयुक्त प्रेम, इत्यादि गुण, कांहीं पूर्ण विकास पावलेले व कांहीं नुकतेच प्रादुर्भूत झालेले,

दाखविले आहेत. महावीरचरितांत ते ते निरनिराळे प्रसंग कसे आणिले आहेत व त्यांमध्यें जितका शब्दावडंबर तितकी स्वाभाविकता कशी नाहीं, व उत्तररामचरितांत तींच कार्यें थोडक्यांत पण तितक्याच विशदपणें आणि सहजगत्या कशीं घडवून आणिलीं आहेत याची तुलना करणें बोधप्रद होणार आहे. तथापि या प्रश्नाचा येथें नुसता उल्लेख करून दुसऱ्या एक दोन अधिक महत्वाच्या बाबीकडे आपण वळूं.

नेहमींच्या व्यवहारामध्यें तसेंच नाटकामध्यें संभाषण यशस्वी, म्हणजे स्वाभाविक व मनोवेधक, होण्यास एक तर शब्दांचा पाल्हाळ लावितां कामां नये आणि दुसरें एकापाठीमागून एक जीं उत्तर प्रत्युत्तरें होत असतात त्यांमध्यें कार्यकारणभावच केवळ असून उपयोगीं नाहीं, तर त्यांमध्यें अनपेक्षिता अथवा चमत्कृतिजनकत्व पाहिजे; त्यांमध्यें अनेक लहान मोठ्या मार्मिक खोंचा असल्या पाहिजेत; व विशेषतः सर्व संभाषणाचा जो अंतिम निष्कर्ष अथवा ध्येय त्याजवरून दृष्टि ढळूं देतां कामा नये— म्हणजे वेळीं अवेळीं तेंच तेंच घोडें पुढें ढकलावें असा अर्थ नाहीं तर, एकादा आलापचतुर गवई ज्याप्रमाणें आरोहावरोहाच्या जाळ्यांत पुरता सांपडलासें वाटतें तोंच त्यांतूनही तो समेवर जाण्याची अचुक वाट शोधून काढितो त्याप्रमाणेंच जवळ जवळ प्रकार झाला पाहिजे. माझ्या मतें प्रस्तुत अंकाच्या अखेरीस आलेलें लव, चंद्रकेतु व सुमंत्र यांच्यामधील संभाषण या कसोटीस पूर्णपणें उतरेल.

प्रस्तुत अंकाचें नाटकाच्या अंतिम साध्याच्या दृष्टीनें मुख्य कार्य म्हणजे लवाकडून जृंभकास्त्राचा प्रयोग करविणें. हें काम फारच बेमालूम साधलें आहे. तसेंच या अंकांत प्रायशः वीररसच असल्यानें पहिल्या तीन अंकांतील (व कांहीं अंशीं चवथ्याही अंकांतील) करुणरसामुळें उद्दीपित झालेल्या प्रेक्षकांच्या एका विविक्षित प्रकारच्या मनोवृत्तीस आळा बसून तिचे जागीं दुसऱ्या प्रकारच्या मनोवृत्तीस प्रसर सांपडतो व त्यामुळें पुढें सहाव्या अंकांत येणारा करुणरस कंटाळवाणा होत नाहीं, इत्यादि गोष्टींचा पूर्वीं उल्लेख झालाच आहे. एरवीं सर्वांगसुंदर असलेल्या या अंकास गालबोटाप्रमाणें असलेल्या एका गोष्टीचा मात्र उल्लेख करावयाचा आहे. ती गोष्ट म्हणजे ५·२४ ते ५·२५[१] पर्यंतचें सुमंत्र व चंद्रकेतु यांच्यामधील संभाषण. यामध्यें चंद्रकेतूच्या बालभावास न शोभणारे शब्द त्याच्या तोंडीं घातले आहेत असें आम्हांस वाटतें. दोघां पात्रांकडून तेच शब्द वदवावयाचे यांतील अस्वाभाविकतेबद्दल पूर्वीं लिहिलेंच आहे. त्याचप्रमाणें या अंकांत २।३ स्थळीं ( जसें, ५·१३ ते ५·१५[३]; ५·१९[१] ते ५·२५[१] वगैरे ) रंगभूमीवरील

दोनच पात्रांमध्यें भाषण सुरू असून तोंपावेतों तिसऱ्यास स्वस्थ तिष्ठत राहावें लागतें हाही एक प्रयोगाच्या दृष्टीनें या अंकांतील दोष म्हणतां येईल. मागें तिसऱ्या अंकांत (पृष्ठ १३५ टीप) असल्याच प्रसंगांतून पार पडण्याची भवभूतीनें जी युक्ति योजिल्याचें आम्हीं सांगितलें ती युक्ति येथें कवीनें योजिली नाहीं, अथवा योजिली असल्यास तितकी यशस्वी झाली नाहीं असें ह्मणावें लागतें. कारण जृंभकास्त्राचें ध्यान आटोपल्यानंतर तीन सबंध श्लोक व दहा एक ओळी गद्य आटोपेतों लवानें काय करावयाचें तें समजत नाहीं. ५·१५[३] वरून असें दिसतें कीं ध्यान आटोपून चंद्रकेतूजवळ येण्यास लवास इतका वेळ लागला, पण हें प्रयोगाच्या दृष्टीनें स्वाभाविक दिसत नाहीं. जृंभकास्त्राच्या प्रभावाचें महावीरचरितांत वगैरे केलेलें वर्णन फिरून एकवार जवळ जवळ त्याच शब्दांनीं करण्याचा मोह येथें कवीस अनावर झाला असें तरी ह्मणावें, किंवा मागें उपोद्घातांत § २२ मध्यें दर्शिवल्याप्रमाणें या प्रसंगीं राळ वगैरे उडवून रंगभूमीवर कांहीं विशिष्ट देखावा दाखविला जात असेल; व ' सीनसीनरी ' असली ह्मणजे नाटकाला विशेष कांहीं लागत नाहीं हा अलीकडे होऊं घातलेला नियम भवभूतीच्या वेळीं—अर्थात् त्या वेळच्या परिस्थित्यनुरूप—खरा असेल.

हाच प्रकार ५·२० नंतरचे पांच श्लोक व १०।१२ ओळी गद्य यांचा आहे. लव चंद्रकेतूजवळ आला; व उभयतांची दृष्टादृष्ट झाली. आतां कांहीं तरी बोलल्याशिवाय लवाला मुक्यानें किती वेळ ठेवावयाचें ? येथें ५·२२[१] ते ५·२५[१] हा सर्व भाग गाळला असता तर चांगलें झालें असतें. कारण मध्यंतरींच्या भाषणानें आह्मांस ठाऊक नव्हतें असें जास्त तें काय सांगितलें ? लव व चंद्रकेतु यांपैकीं प्रथम भाषणास आरंभ कोणीं करावयाचा हा एक फार नाजुक प्रश्न होता; व तो भवभूतीनें फारच उत्तमपणें [ ५·१८[१] ] सोडविला आहे व एकदां सुरुवात झाल्यावर या भाषणाचा प्रवाह अस्खलितपणें चालला आहे हें मागें सांगितलेंच आहे. असो. आतां सुरू झालेल्या या युद्धाचा परिणाम काय होतो तो पाहूं.

# अंक सहावा

( तदनंतर उज्ज्वल [ वेष धारण केलेलें ] व विमानांत बसलेलें एक विद्याधरांचें जोडपें प्रवेश करितें. )

२ **विद्याधर**—एकाएकीं भांडण विकोपास जाऊन हट्टास पेटलेल्या या सूर्यवंशीय कुमारांचीं सर्व देवदानवांस आश्चर्यानें चकित करून सोड- णारीं व अंगचें क्षात्रतेज व्यक्त करणारीं अशीं हीं वीरश्रीचीं कृत्यें
६ काय हो तरी अचाट ! कारण, हें—हें पाहिलेंस कां प्रिये ?—

कंकणांप्रमाणें रुण्झुण् रव करणारे अनेक घुंगुर
ज्याला लटकाविलेले आहेत व प्रचंड टणत्कार कर-
णाऱ्या प्रत्यंचेमुळें ज्याचीं अग्रभागें सण्सण्
वाजून भीति उत्पन्न करीत आहेत असें आप-
आपलें धनुष्य [ आकर्ण ] ओढून बाणवृष्टि करीत
असतां ज्यांच्या मस्तकावरील केश एकसारखे
थरारत आहेत अशा ह्या कुमारांचें त्रिभुवनास कं-
पित करणारें असें हें लोकोत्तर युद्ध अतांच
कोठें रंगांत आलें आहे ! १*

उभयतांच्या मंगलाभिवृध्द्यर्थ ही पहा दिव्य दुंदुभि
मेघगर्जनेप्रमाणें गंभीर असा दुमूदुम् ध्वनि काढीत
आहे ! २

तर मग या बालवीरांवर, मधून मधून नाजुक व उमललेलीं सुवर्ण- कमळें मिश्र केल्यामुळें रमणीय दिसणारी, आणि देवांच्या बागेंतून
३ गोळा केलेल्या व रत्नांप्रमाणें टवटवीत दिसणाऱ्या असंख्य कळ्यां-

* झणझणा धनुकिंकिणि वाजती
खणखणा गुणकोटिहि गर्जती ॥
सणसणा सुटती शर हे कसे
समर लोकभयंकर हो तसे ॥१॥

तून स्रवणाऱ्या मकरंदानें थबथबलेली, अशी एकसारखी दाट पुष्पांची वृष्टि सुरू होऊं द्या.

६ **विद्याधरी**—पण हें काय बरें ? एकदम ह्या आकाशांत अकस्मात् थैमान करून उंच जाणाऱ्या चंचल विद्युल्लतेप्रमाणें पिंगटवर्ण अशा छटा कसल्या दिसूं लागल्या ?

९ **विद्याधर**—खरेंच ! मग काय आज—

त्वष्टा चरकावर घालून फिरवीत असतां[1] [त्यांतून]
निसटलेल्या सूर्याप्रमाणें ज्याचें तेज प्रखर आहे
असा हा कपाळावरील आपला नील व रक्त वर्णा-
चा [तृतीय] नेत्रच शंकरांनीं उघडला असेल ? ३

(विचार करून) हां समजलों. कुमार चंद्रकेतूनें हा आग्नेयास्त्राचा प्रयोग केला आहे व त्यापासून या विस्तवाच्या ठिणग्या बाहेर पडत
३ आहेत. आणि आतां तर—

ज्यांचे ध्वज व चवऱ्या होरपळून काळवंडल्या
आहेत अशीं हीं असंख्य विमानें दूर जात आ-
हेत, व त्यांच्या ध्वजाग्रीं फडफडणाऱ्या पता-
कांच्या आंचळांवर ह्या ज्वाळा कुंकुमाच्या
टिळ्याप्रमाणें क्षणैक शोभत आहेत. ४

काय आश्चर्य ! प्रचंड वज्रखंडाचा स्फोट झाला असतां त्याच्या ठिकऱ्या जितक्या वेगानें वर उडतील तितक्या वेगानें ज्यांतून अग्नि-
३ कण बाहेर पडत आहेत आणि ज्यांतून एकसारख्या उठणाऱ्या उत्तुंग ज्वालारूपी जिव्हा चोहोंकडे प्रसरण पावून भीति उत्पन्न करीत आहेत असा हा प्रतापशाली उषर्बुध ( अग्नि ) आपलें काम
६ गाजवूं लागलाच ! याची झळ सर्व बाजूंनीं अनिवार झाली. तर

१. सूर्याची स्त्री संज्ञा ही त्वष्ट्याची म्हणजे विश्वकर्म्याची कन्या. संज्ञेला सूर्याचें तेज सहन न झाल्यानें तिनें आपल्या बापाकरवीं त्यास घरीं बोलाविलें, व तदनंतर त्वष्ट्यानें सूर्यास चरकावर घालून त्यास घासून तासून त्याचें तेज एक अष्टमांश कमी केलें अशी कथा विष्णुपुराण ३·२ मध्यें दिली आहे.

आतां माझ्या शरीराचा प्रियेला आडोसा करून येथून दूर जावें. ( तसें करितो. )

९ **विद्याधरी**—बरें झालें कीं शुभ्र मुक्ताफलाप्रमाणें शीतल, स्निग्ध, आर्द्र, व तुकतुकीत अशा नाथांच्या शरीराचा मला स्पर्श होऊन त्या आनंदांत हळूंच डोळे झांकले जाऊन माझी तंद्री लागली अस-
१२ तांनाच माझा सर्व संताप अगदीं नाहींसा झाला.

**विद्याधर**—अग, यांत मीं विशेष तें काय केलें ? अथवा—

परस्परांकरितां कांहीं प्रत्यक्ष करावयासच हवें
असें नाहीं. [ केवळ एकमेक जवळ असणें या ]
आनंदानेंच सर्व दुःख लयास जातें. ज्याचा जो
प्रियजन तो त्याला खरोखर एक अमूल्य ठेवा
असतो.[1] ५

**विद्याधरी**—पण हें काय ! मदयुक्त मयूरांच्या कंठाप्रमाणें श्याम-वर्ण आणि वारंवार स्फुरण पावणाऱ्या चंचळ विद्युल्लतांच्या लीला-
३ युक्त संचारानें सुशोभित असे हे जलधर आकाशांत सर्वत्र आंथरले[2] आहेत काय म्हणून ?

**विद्याधर**—अग, कुमार लवानें योजिलेल्या वारुणास्त्राचाच हा परा-
६ क्रम. पाहिलेंस कां, एकदम हजारों जलधारांचा वर्षाव सुरूं होऊन अग्न्यस्त्र थंड पडलें !

**विद्याधरी**—फार चांगलें झालें, फार चांगलें झालें !

९ **विद्याधर**—पण काय ? अति तेथें माती ! कारण आतां प्रलयकालीं

१. हा श्लोक मागें दुसऱ्या अंकांत (२·१९) रामानें सीतेसंबंधानें म्हटला आहे. तोच श्लोक विद्याधरविद्याधरीसारख्या रंगेल जोडप्यानें वापरावा यांत औचित्याची बरीच हानि झाली आहे.

२. विद्याधरविद्याधरी विमानांत मेघमंडळाच्या वरतीं असल्यानें मेघ आकाशांत आंथरले आहेत असें म्हणणेंच रास्त आहे. अशा बारीक बाबींत सुद्धां भवभूति लक्ष घालीत असे हें यावरून सिद्ध होतें. कोणत्याही भूमिकेशीं पूर्णपणें तादात्म्य पावल्याशिवाय हें शक्य नसतें.

रोंरवणाऱ्या संक्षुब्ध वायूप्रमाणें गंभीर गर्जना करणाऱ्या मेघांनीं [ आकाश निबिड व्यापिल्यामुळें ] उद्भवलेल्या काळ्या कुट्ट अंध-
१२कारांत खोल गडप झाल्याप्रमाणें—किंवा सर्व ब्रह्मांडाचा एकदम एक घांस करण्याकरितां सताड वांसलेल्या काळाच्या अक्राळविक्राळ गुहेसारख्या जबड्यामध्यें लडबडत असल्याप्रमाणें—अथवा युगाच्या
१९अंतीं योगनिद्रावश होऊन आणि सर्व [इन्द्रिय] द्वारांचा निरोध करून पहुडलेल्या नारायणाच्या उदरामध्यें प्रविष्ट झाल्याप्रमाणें सर्व प्राणि-मात्र थरथरां कांपत आहेत ! शाबास, वत्सा चंद्रकेतो, शाबास ! तूं
१८वायव्यास्त्राची योजना यथायोग्य केलीस. कारण,

> जसा ज्ञानानें सर्व मायिक पसाऱ्याचा[१] [ अज्ञेय-
> स्वरूप ] ब्रह्माच्या ठायीं विलय होतो तद्वत् या
> वायूनें असंख्य मेघांचा सुद्धां कोणीकडे पार माग-
> मूस नाहींसा केला आहे. ६

**विद्याधरी**—प्राणनाथ, हा कोण बरें हा गडबडीनें हात वर करून व उत्तरीयाचें शेवट [ खुणेसाठीं ] फिरवून आणि दुरून येत अस-
३ तांनाच आपल्या मधुर शब्दांनीं युद्ध चालूं ठेवण्यास मना करून या दोन कुमारांच्या मध्यभागीं हें आपलें सर्वोत्कृष्ट विमान खालीं उतरवित आहे ?

६ **विद्याधर** ( पाहून )—शंबूकवधार्थ गेलेला हा रघुपति तिकडून परत आला आहे.

> या महापुरुषानें उच्चारिलेले शब्द ऐकून त्याचा
> मान राखण्यास्तव लवानें सज्ज केलेलें [ अस्त्र ]
> काढून घेतलें व शांतवृत्ति धारण केली; चंद्रकेतु
> तर प्रणाम करीतच आहे. राजा [ रामाची ]
> पुत्राशीं भेट होऊन त्याचें कल्याण होवो. ७

१. ही उपमा वेदांतशास्त्रांतील आहे व मूळांत येथें त्या शास्त्रांतील विवर्त हा पारिभाषिक शब्द आला आहे. हा शब्द मागें ३·४८ मध्येंही आला आहे. आपल्या शास्त्रीय ज्ञानाचें प्रदर्शन करण्याच्या कवीच्या हौसेबद्दल उपोद्घात (पृष्ठ ५८ टीप १, व पृष्ठ ६८ ) यांत उल्लेख आलाच आहे.

चल आपण असे इकडून जाऊं.

( उभयतां जातात. )

## विष्कंभक[१]

१. या नाटकांतील इतर विष्कंभकांचे मानानें हा विष्कंभक बराच खालच्या दर्जाचा ठरेल. युद्ध रंगभूमीवर दाखवू नये हा नाट्यशास्त्राचा नियम पाळण्यासाठीं युद्धाची हकीगत विद्याधरविद्याधरीकडून वर्णविल्यास विशेष हरकत नाहीं पण त्या वर्णनांत अर्थवैचित्र्य पाहिजे. नुसतें शब्दावडंबर उपयोगीं नाहीं. उत्तररामचरितांतील अत्यंत क्लिष्ट व समासप्रचुर गद्य या विष्कंभकांत आलें आहे. लढाईच्या वर्णनांतही विशेष स्वारस्य नाहीं व एके ठिकाणीं तर ( ६·५ ) अप्रासंगिक श्रृंगाराचा भाग येऊन रसभंग झाला आहे. निरनिराळ्या अस्त्रांचा परिणाम कांहीं तरी क्लृप्तीनें प्रेक्षकांच्या मनावर ठसण्यास ' सीनसीनरी 'सारखा कांहीं प्रकार भवभूतीच्या वेळीं प्रचारांत असेल तर मात्र या विष्कंभकांतील लांबलांब शब्द कंटाळवाणे होणार नाहींत; कारण ' सीनरी 'वरून तिकडे कोणाचें लक्षच जाणार नाहीं ! तथापि युद्धवर्णन थोडक्यांतच आटोपतें घेतलें आहे; बालरामायणांत एके ठिकाणीं राजशेखरानें केल्याप्रमाणें अस्त्रांवर प्रतिअस्त्रांची मालिका आणखी वाढविली नाहीं, ही खैरच झाली !

दुसऱ्या अंकाच्या विष्कंभकास सकाळीं आरंभ होतो; त्याच दिवशीं दोनप्रहरीं दुसरा अंक व तिसरा अंक पूर्ण होऊन तिसऱ्या प्रहराच्या सुमारास राम दंडकारण्यांतून परत अयोध्येस जाण्यास निघतो. दंडका व अयोध्या यांच्या दरम्यानच वाल्मीकींचा आश्रम होता. तेव्हां चवथ्या अंकाच्या कथानकास व दुसऱ्या अंकाच्या कथानकास एकसमयावच्छेदें करून प्रारंभ झाला अशी कल्पना केल्यास, कौसल्याजनकांची भेट होऊन लवाच्या दृष्टीस यज्ञीय अश्व पडून लवाची व चंद्रकेतूची जुंपते इतक्या सुमारास राम पुष्पक विमानांतून वाल्मीकींच्या आश्रमावरून जात होता असें निष्पन्न होतें व मग आश्रमांत काय गडबड चालली आहे हें रामास समजून युद्ध ऐन रंगांत येतें तोंच त्यानें मध्यें पडावें हें अस्वाभाविक दिसत नाहीं. तथापि तिसऱ्या प्रहरीं युद्ध जुंपलें असें मानिल्यास दोन शंका उद्भवतात. पुढें ६·२२[१] मध्यें ' सूर्य मस्तक तापवीत आहे ' असें जें लव म्हणतो तें दोनप्रहरच्या उन्हास उद्देशून कीं तिसऱ्या प्रह-

( तदनंतर राम, लव, व प्रणत झालेला चंद्रकेतु प्रवेश करितात. )

१ राम ( पुष्पकांतून खालीं उतरतांना )—

हे दिनकर कुलांतील चंद्रा, माझ्या चंद्रकेतो, ये
आणि एकदम मला गाढ आलिंगन दे. बर्फाच्या
तुकड्याप्रमाणें सुशीतल अशा तुझ्या शरीराच्या

रुच्या ! सकृद्दर्शनीं ती वेळ दुपारची असावीशी वाटते, पण पूर्वापर संगति जुळण्याकरितां कडक उन्हाळ्यांत तिसऱ्या प्रहरीं सुद्धां सूर्य प्रखर असतोच असें म्हणून या लवाच्या भाषणाची उपपत्ति लाविली पाहिजे. दुसरी शंका सहाव्या व सातव्या अंकांचे दरम्यान वेळ किती गेला असला पाहिजे या संबंधाची. फार वेळ गेला असें मानिल्यास वाल्मीकि रामजनकादि सर्वांपासून कुशलवांबद्दलची गुप्त गोष्ट इतका वेळ कशी लपवूं शकला असेल ? गर्भनाटक शक्य तेवढें लवकर—मंडळींचें कौतुहल अनिवार होण्याच्यापूर्वीं—वाल्मीकीला उरकून घेणें सर्वपरीं इष्ट होतें. पण उलटपक्षीं युद्ध तिसऱ्या प्रहरीं संपल्यावर त्याच दिवशीं रात्रीं वाल्मीकीला आपल्या नाटकाचा प्रयोग करविणें शक्य नव्हतें. उघड्या हवेवर नाटक सकाळींच होणें जरूर आहे. ( भवभूतीचीं उघड्या मैदानांत प्रयोग झालेलीं नाटकें प्रायः सकाळींच होत असत असें मालतीमाधव १·५ वरून अनुमान निघतें. ) व नाटक होण्यापूर्वीं अयोध्येंतील प्रजाजनांस वर्दी मिळून ते हजर झाले पाहिजेत व सर्व देवासुरमानवयक्षगंधर्वकिन्नरांना पुरे इतका विस्तीर्ण रंगमंडप तयार झाला पाहिजे हें उघड आहे. पहिलें काम पुष्पकाच्या साहाय्यानें जलद झालें असें मानिलें तरी आणि साक्षात् भरतमुनि जेथें नाट्याचार्य व स्वर्गांतील अप्सरा जेथें निरनिराळ्या भूमिका घेणार तेथें रंगमंडप सिद्ध होण्यास, अथवा नाटक रात्रौ करावयाचें ठरल्यास प्रकाशाची व्यवस्था होण्यास, वेळ मुळींच लागणार नाहीं अशा रीतीनें या आक्षेपाचें कसेंबसें निरसन करणें शक्य असलें तरी एकंदरींत येथें कालासंबंधानें थोडी भानगडच आहे असें कबूल करावें लागतें. असो. गर्भनाटकासंबंधानें आम्हांस जें कांहीं म्हणावयाचें आहे तें सातव्या अंकावर टाकून तूर्त राम व लव यांची गांठ पडल्यावर काय काय प्रकार झाला तिकडे आपण वळूं.

स्पर्शानें माझा सुद्धां[1] चित्तदाह शांत होऊं द्या. ८*
( त्याला वर उठवून स्नेहानें व डोळ्यांत आंसवें आणून आलिंगन देऊन ) हे दिव्यास्त्रधारका[2] कुमारा, शरीरानें तुझें कुशल आहे ना ?

३ **चंद्रकेतु**—ह्या अत्यद्भुत पराक्रमी व प्रियदर्शन लवाच्या भेटीचा परम लाभ झाल्यानें [ सर्वतोपरीं ] कुशल. म्हणून विनंति आहे कीं मजप्रमाणेंच, अथवा मजहूनही विशेष, तातांची कृपादृष्टि या श्रेष्ठ
६ महावीरावर[3] असूं द्यावी.

**राम** ( लवास न्याहाळून )—मोठी आनंदाची गोष्ट आहे कीं हा तुझा मित्र स्वरूपानें रमणीय असून प्रशांतही दिसत आहे.

जणूं हा अस्त्रवेदच लोकांचें पालन करण्यास्तव [मानव] देहधारी झाला आहे; किंवा वेद भांडाराच्या रक्षणासाठीं क्षत्रिय धर्मच हा मूर्तिमंत अवतरला आहे; सर्व सामर्थ्यें याचे ठिकाणीं एकवटलीं आहेत, सर्व गुणांचें हा आयतन आहे, अथवा जगांतील पुण्य कर्मांची राशिच येथें [याच्या रूपानें] साक्षात् उभी ठेली आहे ! ९ §

* दिनकरकुलचंद्रा चंद्रकेतो कुमारा
दृढतर परिरंभा देइं मातें उदारा ॥
तुहिनशकलशीतें कोमलें जीं त्वदंगें
मम हृदय निवो हें त्यांचिया पूर्ण संगें ॥ ९ ॥

§ पाळाया लोक सारे धनुधर भगवान् हा धनुर्वेद झाला
रक्षाया ब्रह्मवृंदाप्रति धरुनि तनू क्षात्र कीं धर्म आला ॥
सामर्थ्यांचा गमे हा समुदय अथवा हा गुणांचा विसांवा
कीं हा कल्याणरूपें परिणतचि जगत्पुण्यराशी असावा ॥१०॥

१. सीताशोकानें व नुकत्याच पंचवटींत घडून आलेल्या प्रसंगानें मी अत्यंत संतप्त झालों असतां सुद्धां.
२. हें विशेषण हेतुगर्भ आहे. तुला दिव्य अस्त्रें अवगत होतीं तेव्हां तुझें शारीरिक कुशल विचारावयास नकोच.
३. मूळांत ' महावीरप्रकांड ' असें आहे व महावीरचरितांत राम हा महावीर असल्यानें 'सवाई महावीर' असें याचें भाषांतर होईल.

**लव**—या महानुभाव सत्पुरुषाचें दर्शन किती पवित्र आहे !

विश्वास, प्रीति, व भक्ति ह्या तीन्ही मनोविका-
रांचा हा एक मोठा प्रेरक व पोषक आहे;
उच्चतम धर्मा[चरणा]चा हा मूर्तिमंत प्रसादच
होय. १०

किती आश्चर्याची गोष्ट ही कीं—

[ याला पाहतांच ] माझा विरोध मावळला व
एका आनंदपूर्ण विकारानें माझें हृदय व्यापिलें;
तो माझा उद्धटपणा कोणीकडेच गेला व आतां
विनयाचा मजवर ताबा सुरूं झाला. याच्या दर्श-
नानें माझी अशी पराधीन वृत्ति कां बरें व्हावी ?
अथवा तीर्थांचा, तसाच माहात्म्यांचा, असाच
कांहीं विलक्षण प्रभाव असतो. ११

**राम**—काय कारणानें असेल तें असो, पण या मुलाकडे पाहतांच एकाएकीं मला माझ्या दुःखाचा विसर पडला व अंतरात्म्यांत ३ त्याचे विषयीं स्नेह उत्पन्न झाला ! अथवा स्नेहाला कारणाची अपेक्षा असते ही कल्पनाच मुळीं विरुद्ध आहे.

एका वस्तूची दुसरीच्या ठिकाणीं आसक्ति जडते
तिचा हेतु अंतर्गत असून दुर्ज्ञेय असतो; केव्हांही
बाह्य निमित्तांवर प्रीति अवलंबून नसते. कारण
सूर्य उगवला म्हणजे कमल [ आपोआप ] उम-
लतें; व चंद्रोदयीं चंद्रकांत मण्यास [ कांहीं ]
विशेष कारणाशिवाय ] पाझर सुटतो. १२

**लव**—चंद्रकेतो, हे कोण ?

**चंद्रकेतु**—प्रियमित्रा, हे आमचे पूज्य तात.

३ **लव**—तर मग धर्मतः हे माझेही तातच होत; कारण तूं मला प्रियमित्रा असें म्हटलेंस. पण आम्ही असें ऐकितों, ज्यांना तुम्ही तात हें

उपपद लावितां असे चौघेजण---रामायण कथेंतील नायक---आहेत.
६ तेव्हां विशेष खुलासा करून सांग.

**चंद्रकेतु**—त्या चौघांत हे ज्येष्ठ होत, समजलास ?

**लव** (उल्हासानें)—काय, हे रघुनाथ [ रामचंद्रजी ]? महाराजांची
९ गांठ पडली हा दैवानें मोठा सुदिन दाखविला. ( विनयानें व कौतुकानें रामास न्याहाळून) ताता, वरुणपुत्र [ वाल्मीकींचा ] शिष्य, लव, हा आपणांस वंदन करीत आहे.

१२ **राम**—आयुष्मान् भव. ये, ये. ( प्रीतीनें त्यास कवटाळून ) अरे बाळा, पुरे, पुरे हा विनय. मला वरचेवर तुला घट्ट पोटांशीं धरूं दे.

> परिपक्व होऊन उमललेल्या कमलाच्या अंतर्भागा-
> प्रमाणें मऊ, मांसल आणि सुकुमार व चंद्राप्रमाणें
> अथवा चंदनाच्या उटीप्रमाणें शीतल असा हा तुझा
> स्पर्श मला [फार] आनंद देत आहे. १३

**लव** ( स्वगत )—कारणाशिवाय मजविषयीं यांचा हा असा स्नेह-भाव ! पण मी मात्र हें न समजून यांच्याशींच द्रोह करण्यास प्रवृत्त
३ झालों व कलहाची मजल हातांत शस्त्र धारण करण्यापर्यंत आणून सोडिली ! (उघड) या लवाच्या बालिश चाळ्यांबद्दल तातांनीं आतां त्याला क्षमा करावी.

६ **राम**—वत्सानें असा अपराध तो काय केला ?

**चंद्रकेतु**—अश्वाबरोबरच्या सैनिकांनीं तातांच्या पराक्रमाचें वर्णन केलेलें ऐकून यानेंही वीरास साजेसें वर्तन केलें.

९ **राम**—वाः ! क्षत्रियांना हें तर भूषण आहे.

> तेजस्वी पुरुषाला दुसऱ्याचें उत्कर्षशालि तेज सहन
> होत नाहीं. हा त्याच्या त्याच्या प्रकृत्यनुसारानें
> त्याचा स्वभावच बनून राहतो; त्यांत मुद्दाम केलेलें
> असें कांहीं नसतें. देव सविता आपल्या किर-
> णांनीं एकसारखा जेव्हां तळपूं लागतो तेव्हां
> सूर्यकांतमणि मानखंडणा झाल्याप्रमाणें वाटून

आपलें [अग्नीसारखें] तेज बाहेर दाखवीत नाहीं
काय ? १४*

**चंद्रकेतु**—कोप सुद्धां असल्या वीरालाच शोभून जातो. तातांनीं अवलोकन करावें, माझ्या मित्रानें जृंभकास्त्र सोडून हें सर्व सैन्य खिळून
३ गेल्यासारखें कसें निश्चेष्ट केलें आहे तें !

**राम**( पाहून )—वत्सा लवा, अस्त्राचा उपसंहार कर. चंद्रकेतो, तूंही निश्चेष्टतेमुळें लज्जा व आश्चर्य यांनीं व्याप्त झालेल्या आपल्या
६ सैन्याचें सांत्वन कर.

( लव ध्यानस्थ होतो. )

**चंद्रकेतु**—जशी आज्ञा. ( जातो.[१] )

* न तेजस्वी साहे प्रकट परतेजोबलमदा
जयाचा जो आहे प्रकृतिगुण लोपे नच कदा ॥
मयूखांनीं जेव्हां प्रखरतर चंडांशु तपतो
रविग्रावा तेव्हां अनलसम तेजास वमतो ॥ १६ ॥

१. भवभूतीच्या तिन्ही नाटकांमध्यें सारख्या तोंडावळ्याचीं दोन तरी पात्रें जरूर लागतात हें उपोद्घात§२२मध्यें सांगितलेंच आहे. महावीरचरितांत राम व लक्ष्मण, मालतीमाधवांत मकरंद व मालती व प्रस्तुत नाटकांत लव व कुश हीं तीं पात्रें होत. परंतु आतां चंद्रकेतूचाही तोंडावळा या दोघां जुळ्या भावासारखाच असल्यानें व नाटकमंडळींत सहसा सारख्या वयाचीं व तोंडावळ्याचीं तिन मुलें असणें विशेष संभवनीय नसल्यामुळें हे तिघेजण एकत्र रंगभूमीवर येतां उपयोगी नाहीं, एवढ्याकरितांच कांहीं तरी निमित्त काढून रामानें चंद्रकेतूची रवानगी करून दिली. राजकुमाराचा पोषाख काढून अरण्यवासी क्षत्रियब्रह्मचाऱ्याचा वेष घेण्यास व कुश ह्मणून पुनः प्रवेश करण्यास चंद्रकेतूस विशेष वेळ लागावयाचा नाहींच. तथापि त्याला पुरेसा वेळ देण्याकरितां मध्यंतरीं ३ श्लोक व १८ ओळी इतका संदर्भ घातला आहे. या तीन श्लोकांपैकीं एक श्लोक पहिल्या अंकांतलाच पुनः आला आहे, व कुशानें (ह्मणजे वेष पालटत असतांना चंद्रकेतूनें) ह्मणावयाचा श्लोक पडद्यांतून ह्मटला आहे हें लक्षांत घेण्यासारखें आहे. ह्या मुद्याचें विशेष विवेचन चित्रमयजगतच्या जानेवारी १९१५ च्या खास अंकांत 'उत्तररामचरिताची पाठपरंपरा' या लेखांत केलें आहे तें पहावें.

९ **लव**—अस्त्र शांत झालें.

**राम**—वत्सा, हीं जृंभकास्त्रें व त्यांच्या प्रयोगाचे व उपसंहाराचे गुप्त मंत्र सांप्रदायिक आहेत [ गुरुपरंपरेवांचून तीं मिळणारीं नव्हत ].

ब्रह्मादिकांहीं वेदब्रह्माच्या अभिवृध्द्यर्थ सहस्रा-
वधि वर्षें तपाचरण केलें, तेव्हां, जणूं काय त्यांचीं
उग्र तपेंच मूर्तिमंत, अशीं हीं दिव्यास्त्रें त्या परम-
पूज्य आदिगुरूंपुढें प्रकट झालीं.[1] १५

नंतर या अस्त्रविद्येसंबंधीं गुप्त मंत्र भगवान् कृशाश्वांनीं हजारों वर्षें परिचर्या करणाऱ्या आपल्या शिष्यास—कुशिकसुत विश्वामित्रास—
३ सांगितले व भगवान् [ विश्वामित्रांनीं ] मला शिकविले. अशी ही गुरुपरंपरा आहे. म्हणून विचारितों कुमारास हे मंत्र कोणापासून प्राप्त झाले ?

६ **लव**—आम्हां [ उभयतांस ] हीं अस्त्रें स्वयं प्रकट झालीं.

**राम** ( विचार करून )—ही गोष्ट अशक्यच असें म्हणवत नाहीं. कांहीं तरी जबरदस्त पुण्य फळास येऊन त्याचा असा हा प्रभाव
९ अनुभवास येणें शक्य आहे. पण ' उभयतांस ' म्हटलेंस तें कसें ?

**लव**—आम्ही दोघे आंवळेजावळे भाऊ आहोंत.[2]

**राम**—मग तो दुसरा कोठें आहे ?

१२ **पडद्यांत**—भांडायना,[3] अरे भांडायना !

वत्सा[4] लवाचें राजसैन्याशीं युद्ध जुंपल्याचें हें मीं
काय ऐकत आहे?—काय म्हटलेंस! 'होय बाबा,

१. मागें श्लोक १·१५ पहा.
२. मागें पृष्ठ १९६ टीप १ पहा. येथें रामासारख्याशीं बोलावयाचें तेव्हां स्वतःचें विद्वत्ताप्रदर्शन करणें लवास अस्थानीं होतें. ह्मणून रामाच्या सरळ प्रश्नास लवाचा जबाबही सरळ आहे.
३. मागें पृष्ठ १७९ टीप पहा.
४. कुश व लव वयानें सारखे असले तरी नात्यानें कुश वडील तेव्हां तो लवास वत्स अथवा आयुष्मन् असें ह्मणतो व लव कुशास आर्य हें बहुमानार्थ विशेषण लावितो.

गोष्ट खरी आहे' ?—तर मग आज त्रिभुवनांतून 'राजाधिराज' हा शब्दच लोपून जावो आणि क्षत्रियांच्या शस्त्ररूपी ज्वाला आज थंड होवोत.१६

**राम**—ज्याची कांति इन्द्रमण्याप्रमाणें नील आहे आणि ज्याचे शब्द कानीं पडतांच माझ्या अंगावर रोमांच उभे राहून नूतन, सजल व श्यामवर्ण मेघाची गंभीर गर्जना ऐकतांच ज्याच्या कळ्या क्षणैक थरारल्या आहेत अशा कदंब वृक्षासारखी माझी अवस्था ज्यानें करून सोडिली असा हा कोण[1] ? १७*

**लव**—हा माझा वडील बंधु कुश, भरतमुनींच्या आश्रमाहून [ नुकतांच ] परत आला.

३ **राम** (कौतुकानें )—बाळा, त्या वत्साला इकडे बोलीव.

**लव**—ठीक आहे. ( इकडे तिकडे फिरतो.)

( तदनंतर कुश प्रवेश करितो. )

६ **कुश**( धैर्यानें, हर्षानें, व गर्वानें धनुष्याचा टणत्कार करीत)—

ज्यांनीं [ साक्षात् ] इंद्राला अभयरूपी दक्षिणा दिली, व भगवान् वैवस्वत मनूपासून आज तागायत उद्धतांस पोळण्याकरितांच क्षात्रप्रतापरूपी अग्नि ज्यांनीं संदीपित केला आहे अशा आदित्य-

* हा कोण इंद्रमाणितुल्य सुनीलकांती
देतो पहा सुवचनें हृदयास शांती ॥
गंभीर शब्द घनगर्जितसा करीतो
माझ्या तनूस सहसा पुलकें भरीतो ॥ २० ॥

१. भाषांतर म्हणजे मूळ ग्रंथाचा निर्दय खून याची सत्यता येथें पटते तशी अन्यत्र क्वचितच पटेल. मूळांतील वृत्त, शब्दाचा अनुप्रास, व ह्रस्वदीर्घ स्वरांचे सातत्य असें कांहीं साधलें आहे कीं ज्या ध्वनीचें श्लोकांत वर्णन आहे तोच ध्वनि श्लोकांतून निर्माण होतो. विशेषतः हा श्लोक म्हणतांना तबला वगैरेची साथ केली जात असल्यास ह्या विधानाची प्रचीति तेव्हांच येईल.

वंशीय नृपतींशीं जर मला आज झुंजावयास
सांपडणार आहे तर, ज्याची प्रत्यंचा देदीप्यमान्
अस्त्रांच्या वर फांकणाऱ्या प्रचंड तेजामुळें झळा-
ळत आहे असें हें माझें धनुष्य धन्य होय ! १८

( आवेशानें इकडून तिकडे फिरतो.)

**राम**—ह्या क्षत्रियाच्या छाव्याचा केवढा तरी प्रचंड हा मर्दपणाचा
३ आवेश !

केवळ दृष्टिपातानेंच त्रिभुवनांतील उच्चनीच सर्व
प्राणिमात्रांना हा तुच्छ लेखित आहे, व धीरानें
आणि आवेशानें इकडून तिकडे पावलें टाकितांना
हा जणूं काय पृथ्वीस नम्रता शिकवीत आहे असें
वाटतें. या कौमार वयांतच ज्याचे ठायीं पर्वताचा
ताठा व गांभीर्य दिसून येत आहे असा हा सा-
क्षात् वीररसच इकडे येत आहे म्हणूं कीं [मूर्तिमान्]
दर्पच ? १९*

**लव** ( जवळ जाऊन )—ज्येष्ठ भ्रात्याचा विजय असो !

**कुश**—पण वत्सा, मी असें विचारितों ही युद्ध युद्ध म्हणून काय
३ कंडी पिकली आहे ?

**लव**—अं: ! त्यांत कांहीं अर्थ नाहीं. दर्प सोडून आर्यांनीं आतां
यांच्यांशीं विनयानें वागावें.

६ **कुश**—तें काय म्हणून ?

**लव**—हा येथें राजा रघुपति उभा आहे. त्याला आम्हां दोघांबद्दल
प्रेम वाटतें आणि तुमच्या सान्निध्याची त्यांना उत्कंठा लागली आहे.

* दृष्टी पहा कशि जगत्त्रय तुच्छ जीला
गंभीर उद्धत गती लववी महीला ॥
अल्पा वयांत गिरिसा गुरुतेस घेतो
हा मूर्त वीररस कीं रणदर्प येतो ॥२२॥

९ कुश (तर्कानें)— ह्मणजे रामायणकथेचा नायक व वेदभांडाराचें संरक्षण करणारा तोच कां हा ?

लव—होय, तोच.

१२कुश—त्या महात्म्याचें पुण्यकारक दर्शन सर्वांनाच घ्यावेंसें वाटेल. पण आम्हीं भेटींत त्यांच्याशीं कसें वागावें याचाच मला निश्चय होत नाहीं.

१५लव—गुरूप्रमाणेंच त्यांच्याशीं वर्तन ठेवावें ह्मणजे झालें.

कुश—अरे बाबा, तें कसें योग्य होईल ?

लव—चंद्रकेतु—ऊर्मिलेचा मुलगा—फार थोर मनाचा आहे; तो १८प्रियमित्र या नात्यानें मजशीं वर्तन ठेवीत आहे; तेव्हां त्याच्या संबंधानें हा राजर्षि आमचा धर्मतः तातच होय.

कुश—असेंच जर असेल तर जरी तो क्षत्रिय आहे तरी त्याच्याशीं २१आदबीनें वागण्यास हरकत नाहीं[१]!

( दोघे इकडे तिकडे फिरतात. )

लव—आर्या, पहा हा महापुरुष. याच्या आकृतीवरून, प्रभावा-२४वरून, व गांभीर्यावरूनच यानें केलेलीं विविध व लोकोत्तर वीर्यकृत्यें याचें ठायीं संभवनीय वाटतात.

कुश ( निरखून पाहून )—

ह्या रूपामध्यें प्रसाद किती भरला आहे; याचा
प्रभाव किती पुण्यद आहे ! रामायण निर्मा-
त्यानें वाग्देवतेस [ काव्यरूपानें ] नटविण्यास
योग्य विषयाची निवड केली.[२] २०

( जवळ जाऊन ) ताता, वरुणपुत्र [ वाल्मीकींचा ] शिष्य—हा कुश—आपणांस अभिवंदन करीत आहे.

३ राम—आयुष्मान् भव. ये असा ये.

१. रामाच्या प्रत्यक्ष मुलांनीं आपल्या बापास धर्माचा बाप ठरवावा हा प्रेक्षकांना एक मौजेचाच प्रसंग वाटेल यांत संशय नाहीं.

२. मागें २·५[३—११] पहा.

अमृतानें भरलेल्या मेघाप्रमाणें तुझी आंगलट मृदुल
असून प्रीतीमुळें तुला आलिंगन देण्यास हा जन
उत्सुक आहे. २१

( त्याला पोटाशीं धरून, स्वगत ) हा मुलगा कोणाचा बरें
असावा ?

हा, कां सर्वांगांतून बाहेर निघालेलें सारभूत स्नेह-
तत्त्वच आहे, अथवा ह्या इथून[1] इथें प्रकट होऊन
ठेलेलें चैतन्यतत्त्वच आहे, किंवा गाढ आनंदानें
उचंबळलेल्या हृदयांतील प्रस्रवानें हा माखून
गेला आहे [ समजत नाहीं ]. याच्या गात्राशीं
स्पर्श होतांच मजवर अमृत रसाचा जणूं वर्षाव
होत आहे असें वाटतें. २२

**लव**—ताता, सूर्याच्या प्रखर किरणांची कपाळावर तिरिप लागत आहे; तर साल वृक्षांच्या गर्द छायेंत क्षणभर तातांनीं आसन घ्यावें.

३ **राम**—वत्साची इच्छा असेल तर तसें करूं या.

( सर्व चार पावलें जाऊन यथोचित[2] स्थलीं बसतात. )

**राम** ( स्वगत )—

१. 'ह्या इथून' म्हणजे माझ्या हृदयांतून हें नटानें आविर्भावानें दाखवावयाचें आहे. ह्या सर्वच श्लोकाचें रहस्य कळणें कठिण आहे. आमच्या मतें पुत्र हा आत्माच आहे, व आत्मा सत्–चित्–आनंदस्वरूपीं आणि अमृतमय आहे असें या श्लोकाच्या चार चरणांनीं दर्शविलें असावें. या अर्थानुरूप पहिला चरणच (सदंश) थोडा लावावयास कठिण आहे.—येथें प्रत्यभिज्ञानाचें पहिलें निमित्त, म्हणजे पितापुत्रांच्या मनांत प्रथम दर्शनींच अवचित परस्पर स्नेह उपजणें, हें संपलें, व या नंतरच्या निमित्तास आरंभ झाला.

२. 'यथोचित' या अभिनयसूचनेचें रहस्य रामाच्या पुढील भाषणावरून दिसून येईलच. कुशाची वरिश्रीनें चालण्याची ढब रामाच्या अवलोकनांत(६·१९) आलीच. आतां विनयपूर्वक बसण्याउठण्याची लकब त्याच्या दृष्टीस पडली.

काय चमत्कार ! कुशाची व लवाची, उभतां-
चीही वागणूक विनयशील तर खरीच, पण यांची
ही चालण्याची, उभें राहण्याची, तसेंच बसण्याची
ढब त्यांच्या [ भावि ] साम्राज्याची सूचक
आहे ! २३

जन्मापासूनच अंगीं बाणलेलें हें लक्ष्मीचें विलास-
युक्त तेज, कलेकलेनें ज्याचें सौंदर्य व कांति वृद्धिं-
गत होत आहे अशा यांच्या या शरीरास, रम्य
प्रभा जशी निर्दोष रत्नास, अथवा मकरंदबिंदू
जशी प्रफुल्ल कमलास तद्वत्, शोभा देत आहे.[1] २४

यांच्यामध्यें बऱ्याच अंशानें रघुवंशांतील कुमारांचीं लक्षणें[2] मला दिसत आहेत.

वयांत आलेल्या पारव्याच्या कंठाप्रमाणें श्यामवर्ण
आणि बैलासारखे [भारदस्त] खांदे असलेली यांची
ही तनु, आणि [ एकंदरींत सर्वच ] शरीराची
हृदयंगम ठेवण; सिंहासारखी प्रसन्न व गंभीर
दृष्टि, आणि मांगलिक मृदंगाप्रमाणें भरदार
आवाज. २५*

( सूक्ष्मपणें न्याहाळून ) अरे ! यांची आकृति माझ्यासारखीच केवळ आहे असें नाहीं.

जानकीची सुद्धां तीं तीं असावयाचीं सर्व लक्षणें
स्पष्टपणें ह्या दोन्ही मुलांमध्यें, बारकाईनें पाहि-

* कपोत कंठासम कांति जीची
शोभा वृषस्कंधसमा तनूची ॥
प्रसन्नसिंहापरि दृष्टि थोर
मृदंगशब्दासम शब्द घोर ॥ २९ ॥

१. येथें प्रत्यभिज्ञानाचें दुसरें निमित्त—म्ह० कुशामध्यें व लवामध्यें दिसून येणारीं साम्राज्यशंसि लक्षणें—संपूर्ण झालें.

२. हें प्रत्यभिज्ञानाचें तिसरें निमित्त.

ल्यास, दिसून येणारीं आहेत.[१] वाटतें कीं शत-
धारी कमलाप्रमाणें कोमल व रुचिर असें तें
माझ्या प्रियेचें मुख [ यांच्या मिषानें ] आज
पुनरपि साक्षात् मजसमोर उभें राहिलें आहे. २६

मौक्तिकासारख्या शुभ्र दंतांच्या कांतीमुळें खुलून
दिसणारी तीच ही ओठांची ठेवण, आणि
कानांचें वळणही तेंच; यांचे नेत्र यद्यपि नील-
वर्ण[२] नाहींत तथापि त्यांचा आकार व चमक
तसलीच आहे. २७*

( विचार करून ) वरुणपुत्र [ वाल्मीकींचें ] ज्यांत वसतिस्थान आहे
असें हेंच तें अरण्य जेथें देवीचा त्याग केल्याची बातमी [लक्ष्मणानें]
३ मला सांगितली होती.[३] या मुलांची आकृति, वय,[४] व अनुभाव
तर अशा प्रकारचा आहे. आतां जृंभकास्त्रें त्यांना स्वयंप्रकाशित[५]

* दंतास मुक्ताफलतुल्य वर्ण
ती ओष्ठमुद्राहि तसेच कर्ण ॥
रक्तत्व नेत्रीं जरि दीसताहे
तथापि शोभागुण तोचि आहे ॥३२॥

१. हें प्रत्यभिज्ञानाचें चवथें निमित्त.
२. स्त्रियांचे नेत्र नीलवर्ण व पुरुषांचे किंचित् रक्तवर्ण असावेत असें सामुद्रिक शास्त्रांत सांगितलें आहे. म्हणून सीतेच्या नेत्रांचा नीलवर्ण तिच्या मुलांत उतरला नाहीं.
३. हें स्थलैक्य प्रत्यभिज्ञानाचें पांचवें निमित्त होय.
४. मुलांचें वय सीतात्यागास झालीं तितक्याच वर्षांचें होतें हें प्रत्यभिज्ञानाचें सहावें निमित्त.
५. प्रत्यभिज्ञानाचें हें सर्वांहून अधिक निर्णायक निमित्त. पूर्वीं रामानें हीच शंका घेऊन आपलें कसेंबसें समाधान करून घेतलें होतें ( ६·१५[७–९] ) पण आतां ती पुनः दुणावली.

आहेत या संबंधांत विचार करावयाचा म्हणजे पूर्वीं चित्रदर्शनप्रसंगीं
६ [ ' हीं अस्त्रें निःसंशय तुझ्या संततीला लाभतील ' असें म्हणून ] जी अनुज्ञा दिली होती तीच ही कदाचित् फलद्रूप झाली असेल कां ? तसेंच हा जो माझ्या हृदयांत एकदमच सुखाचा व दुःखाचा कल्होळ
९ माजून राहिला आहे त्यानें माझ्या मनांत बरीचशी आशा उत्पन्न झाली आहे. शिवाय देवी गर्भिणी असतांनाच तिचा गर्भ जुळा असल्याची मीं अनेकशः खात्री करून घेतली होती.[1] (डोळ्यांत अश्रू आणून)—

एकदां जडलेला स्नेह वाढत्या परिचयानें घन
झाला असतां, मागें एके वेळीं, आम्हीं उभयतां
एकांतांत असल्यामुळें तिचें मन निःशंक होतें तरी
स्वाभाविक लाजेनें तिनें आपले नेत्र मिटले अस-
तांना, मीं स्वतः हळूंच हात लावून पाहून तिचा
गर्भग्रंथि द्विधा झाला होता हें अगोदरपासून ओळ-

१. प्रत्यभिज्ञानाचें हें अखेरचें निमित्त; तथापि येथें प्रत्यभिज्ञान पुरें झालें नाहीं. प्रस्तुत अंकाचें कुमारप्रत्यभिज्ञान हें नांव आहे यावरून तसा कित्येकांचा समज होईल; पण आणखी एक अंकपावेतों कवीनें सर्वांस बुचकळ्यांत पाडिल्यासारखें केलें आहे. सातव्या अंकाच्या अखेरीस वाल्मीकीनें प्रत्यक्ष कुश व लव रामास अर्पण केल्यावर मगच प्रत्यभिज्ञान सर्वांगांनीं परिपूर्ण झालें. असो. प्रस्तुत प्रसंगीं ६·२३ पासून ६·२८ पर्यंत जें रामाचें स्वगत भाषण आलें आहे तें जरूरीपेक्षां जास्त आहेसें वाटतें. इतका वेळ-पावेतों कुशलवास रंगभूमीवर माशा मारीत उभे करणें गौण होय. आतां अभिनयकुशल नट येथें भरतमुनीच्या आश्रमाहून नुकताच परत आलेला कुश आपल्या भावास तेथें आपण काय काय पाहिलें त्याचें वर्णन करीत आहे, अशा प्रकारचा मूक अभिनय कुशलवांकडून करवील, पण ती गोष्ट अलाहिदा आहे. श्लोक २७ व २८ यांच्या मधील गद्यांत तर कंटाळ-वाणी पुनरुक्तिच आहे. पूर्वीं विस्तारानें सांगितलेलींच निमित्तें येथें संक्षेपानें एकवटून सांगितलीं आहेत. पण प्रेक्षक कांहीं बिचारे परीक्षेस बसणारे विद्यार्थी नव्हते कीं ज्यांच्या करितां अशा टांचणाची आवश्यकता होती !

खिलें; नंतर बऱ्याच दिवसांनीं ती गोष्ट तिच्या
लक्षांत आली. २८

( अश्रू गाळून ) मग काय, कांहींतरी निमित्तानें यांना साक्षात् प्रश्न
करावा कां ?

३ **लव**—ताता ! हें काय हें ?

सर्व जगतास मंगलप्रद असें हें आपलें मुख अश्रु-
पातानें दंहिवर पडलेल्या कमलाप्रमाणें शोभूं
लागलें ! २९

**कुश**—अरे वत्सा [ लवा ],

सीता देवीचा वियोग झाला; आतां रघुपतीला
जिच्यापासून दुःख व्हावयाचें नाहीं अशी गोष्ट
तरी कोणती आहे ? कारण, प्रिय पत्नीच्या
नाशानें हें सर्व जग अरण्याप्रमाणें भासूं लागतें
असें म्हटलें आहे.[1] उभयतांचा तो तशाप्रकारचा
स्नेह आणि असा हा आत्यंतिक वियोग; हें
ठाऊक असून जसें कांहीं रामायण पाठ केलेंच
नाहीं[2] असा नवख्यासारखा तूं हें काय विचारीत
आहेस ? ३०

१. कुशाचें हें वाक्य तसाच लवाचा वर ६·२९ मधील प्रश्न दोन्हीही त्यांच्या पोरस्वभावास विसंगतसे दिसतात. कालिदासानें शाकुंतलांत चवथ्या अंकांत मुनिकुमारांच्या तोंडीं असाच एक विसंगत श्लोक ( इष्टप्रवासजनितान्य-बलाजनस्य दुःखानि नूनमतिमात्रसुदुःसहानि ४·३ ) घातला आहे.

२. रामायणासंबंधानें मुलांच्या भाषणांत कांहीं तरी निमित्तानें उल्लेख यावयास पाहिजे होता तो हा असा साधला आहे. मुलांनीं रामायणाची गोष्ट काढल्यानंतर पुढें त्या संबंधांत रामानें त्यांना प्रश्न विचारावा हें ओघानेंच प्राप्त झालें. मागें ४·२२[१८–२५] मध्यें याच कार्याकरितां दुसऱ्या एका युक्तीचा उपयोग केला आहे. कुश व लव यांनीं रामायण मुखोद्गत केलें होतें तरी 'रामाची सीता कोण ( कोणती )?' हें त्यांना ठाऊक नव्हतेंच व म्हणून त्यांच्या बाबतींत तरी प्रचारांतील म्हण सार्थ झाली.

राम ( स्वगत )—अरे! हे तर [ आम्हांविषयीं ] तिऱ्हाइताप्रमाणें बोलतात. आतां प्रश्न करावयाचा कशाला? निलाजऱ्या हृदया !
३ एकाएकीं तूं हा अगदींच ठाव सोडिलास याला काय म्हणावें? अंतरींचा शोकावेग अशा रीतीनें बाहेर पडल्यानें हीं मुलें सुद्धां माझी कींव करूं लागलीं! असो. आतां कांहीं तरी दुसरा विषय काढावा.
६ ( उघड ) मुलांनो, भगवान् वाल्मीकींची प्रतिभापूर्ण वाणी ज्यामध्यें ग्रथित झाली आहे असें रामायण या नांवाचें एक [ काव्य ] आहे व त्यामध्यें आदित्यवंशाची स्तुति केली आहे असें आमच्या काना-
९ वर आलें आहे.[१] त्यामुळें जिज्ञासा उत्पन्न होऊन त्यांतील एकादा भाग श्रवण करण्याची आमची इच्छा आहे.

कुश—त्या सर्वच भागाची आम्हीं संथा घेतली आहे. बालचरिता-
१२च्या[२] शेवटच्या अध्यायांतील हे दोन श्लोक आतांच आठवले.

१. येथें भवभूतीनें मूळ कथेंत फेरफार केला आहे. अश्वमेध समाप्त करण्याच्या वेळीं जमलेल्या ऋषींमध्यें कुशलवांसहित वाल्मीकि हाही होता व त्याच वेळीं रामायण प्रथम प्रसिद्ध झालें अशी मूळ कथा आहे. पण येथें रामायणाची बातमी रामास त्यापूर्वींच होती असें म्हटलें आहे. व जनक (४·२२[२४]), आत्रेयी (२·५[१०]), इत्यादिकांच्या भाषणांवरूनही तेंच सिद्ध होतें. मूळच्या कथेप्रमाणें रामायणांतील कांहीं श्लोक कां होईना कुश व लव यांनीं रामास स्वतः म्हणून दाखविले एवढाच मूळांतील अंश भवभूतीनें घेतला आहे, व त्याचा आपल्या कार्यास जरूर तेवढा उपयोग केला आहे.

२. 'बालकांडाच्या' असें म्हटलें नाहीं, 'बालचरिताच्या' असें म्हटलें यावरून रामायणाचा कांडात्मक विभाग भवभूतीच्या कालीं प्रचलित नव्हता हें अनुमान शक्य असलें तरी त्याला दुसऱ्या पुराव्याची जरूर आहे. त्याचप्रमाणें कुशानें म्हटलेले दोन श्लोक रामायणामध्यें अक्षरशः असेच आढळत नाहींत; त्यांत पाठभेद आहे, यावरूनही कोणतेंही निश्चित अनुमान करितां येणार नाहीं. मूळ श्लोक भवभूतीनें बुद्धिपुरःसर बदलले असण्याचा संभव आहे. उत्तररामचरिताच्या कित्येक हस्तलिखित प्रतींत येथें रामायणाबरहुकूम श्लोकांचा पाठ दिला आहे व कलकत्यास प्रचलित असलेल्या रामायणाच्या प्रतींत उत्तररामचरिताबरहुकूम श्लोकांचा पाठ दिला आहे व त्यामुळें सर्वच अडचण दूर झाली आहे. पण हा मार्ग सोईचा असला तरी विवेचक पद्धतीस ग्राह्य नाहीं.

**राम**—वत्सा, ते म्हणून दाखीव पाहूं.

**कुश**—" महात्म्या रामचंद्राला सीता स्वभावतः प्रिय
झाली होती; व पतीचें आपल्यावरील हें प्रेम
तिनें आपल्या गुणांनीं वाढविलें होतें. ३१
त्याचप्रमाणें सीतेला सुद्धां राम प्राणाहूनही प्रिय
वाटे; परस्परांविषयीं त्यांचें प्रेम कसें होतें तें
त्यांचें हृदयच एक जाणे. " ३२

**राम**—हाय हाय ! हा प्रसंग अतिदारुण, हृदयाचीं मर्में विदारण करणारा आहे. हा देवि ! असेंच त्या वेळीं अक्षरशः होतें बरें ! ३ हर हर ! संसारांतील सर्वच प्रसंग हे असे घडोघडीं बदलत जाऊन अंतःकरणाचा विरस करणारे आणि अंतीं मृगजलाप्रमाणें ठरून दुःख देणारे होतात.[1]

परस्परांवरील निस्सीम विश्वासानें दुणावलेला तो
त्या वेळचा आनंद आतां कोठें गेला ? एकमेकांचें
[एवढें सुद्धां न्यून पडूं न देण्याविषयींचे] आमचे ते
प्रयत्न आणि नवीनपणामुळें मनोहर वाटणारा तो
अतर्क्य प्रेमरस आतां कोठें लोपला ? सुख असो वा
दुःख असो त्या वेळीं होणारी ती आमच्या
हृदयाची एकतानता आतां कोठें लय पावली ?—
अशा थरास गोष्ट आली असूनही हा माझा
निलाजरा प्राण अजून धडपड करीतच आहे;
एकदम शांत होत नाहीं ! ३३

काय दुर्दशा ही !

प्रियेचे हजारों गुण निमिषार्धांत [ स्मृतिपटावर ]
व्यक्त करून दाखविण्यास समर्थ—अतएव ज्याचें
स्मरण होणें सर्व प्रकारें अनिष्ट-- त्याच काला-
ची ही मला आठवण करून दिली. ३४

१. मागें १·८३–१ पहा.

ज्या कालीं हरिणाक्षीची स्तनकलिका दिवसा-
नुदिवस थोडथोडी उमलत जाऊन हळूं हळूं वि-
स्तार पावत होती; तारुण्य, प्रेम, व मनोरथ हीं
अनुरूप असल्यामुळें ज्या कालीं मदनाच्या
[ विजयी ] व्यापारास हृदयामध्यें पूर्णपणें अव-
सर मिळाला असूनही बाह्य व्यवहारामध्यें मात्र
तो भीत भीत पण मनोवेधकपणें प्रकट होत
होता[1] [ असा तो बहारीचा समय होता]. ३५

**लव**—मंदाकिनीसन्निध असलेल्या चित्रकूट पर्वतावर वनविहार करीत असतां रघुपतीनें सीतादेवीस उद्देशून हा श्लोक म्हटला—

" हें शिलातल मुद्दाम तुझ्याकरितांच जणूं काय
ह्या येथें पसरिलें आहे; ज्याचेवर चोहींकडे ह्या
केसर वृक्षानेंही आपल्या पुष्पांचें आस्तरण केलें
आहे.[2] " ३६

१. तारुण्याच्या नुकताच प्रादुर्भाव झाला आहे––दांपत्य प्रेमाची जाणीव नुकतीच भासूं लागली आहे––वय, रूप, व अनुराग एकमेकांस साजेसेच आहेत—व भोंवतालची परिस्थितिही मनोविकारांच्या सात्विक वाढीस सर्वांशीं अनुकूल आहे अशा समयीं स्त्रीपुरुषांच्या वर्तनामध्यें लज्जा, स्नेह, विश्वास कौतुक, इत्यादिकांचें जें एक अपूर्व संमिश्रण दिसून येतें त्याचेंच या श्लोकांत वर्णन केलें आहे.

२. रामायणाच्या मुंबईकडे प्रचलित असलेल्या प्रतींत अयोध्याकांडाच्या ९५ व्या सर्गानंतर जो प्राक्षिप्त म्हणून एक सर्ग दिला आहे. त्यांतील ५।६ या श्लोकांमध्यें यासारखाच संदर्भ आला आहे. या प्राक्षिप्त म्हणून म्हटलेल्या सर्गामध्येंच सीतेचा उपमर्द करणाऱ्या कावळ्यावर ऐषिकास्त्राचा प्रयोग करून रामानें त्याचा एक नेत्र हरण केल्याची कथा आहे; व ही कथा मूळची रामायणांतलीच असें पद्मपुराणांतर्गत सृष्टिकांडाच्या २६९ व्या अध्यायाच्या १९४ व्या श्लोकांत म्हटलें आहे. यावरून हा सर्ग प्राक्षिप्त नसावा असें वाटतें.

**राम** (सलज्ज स्मित करून, करुणायुक्त स्नेहानें[1])––मुलांचा स्वभाव फारच भोळा; आणि त्यांतून हे तर अरण्यांत वाढलेले. हा

३ देवि ! त्या वेळीं विस्रंभातिशयामुळें[2] घडून आलेल्या त्या बहारदार प्रसंगाची[3] तुला आठवण आहे काय ? हाय हाय ! मीं किती अभागी !

१. हें रामाचें भाषण स्वगत असावें, व पूर्वींप्रमाणेंच (पृष्ठ २४२ टीप १) येथें कुशलवांकडून कांहीं तरी मूक अभिनय केला जात असावा असें वाटतें. पण एकंदरींत हा प्रकार गौणच. इतर पात्रांस तिष्ठत ठेवून एकाच पात्राच्या तोंडीं लांबलचक भाषणें—विशेषतः स्वगत भाषणें––घालणें हा प्रकार शेक्सपीयरमध्यें अनेकशः आढळतो; व आपल्या इकडील नवीन नवीन नाटकांमध्येंही या अस्वाभाविक प्रकारास फांटा दिलेला नाहीं. युरोपअमेरिकेकडे आजकाल या स्वगत भाषणांस नाटकांतून अजीबात काढून टाकिलें आहे व त्याचा परिणाम नाट्यरचनेवर बराच इष्ट असा घडून आला आहे.

२. विस्रंभ (विसंबणें) म्हणजे विश्वासयुक्त प्रेम, त्याचा अतिशय म्ह० पराकाष्ठा.

३. हा प्रसंग खरोखरच बहारीचा आहे व तो मूळांतूनच (अयोध्याकांड सर्ग ९२ ते ९५ व पुढील प्रक्षिप्त सर्ग) वाचण्याची आम्ही शिफारस करितों. भारद्वाजाश्रमापासून २॥ योजनांवर निर्जन वनामध्यें रम्य पाषाण आणि अरण्य यांनीं युक्त असलेला चित्रकूट पर्वत होता, व त्याचे उत्तरेस प्रफुल्लित वृक्ष व वनें यांनीं जिचे तीर मनोहर दिसत अशी मंदाकिनी (भागीरथीस मिळणारी एक लहानशी नदी) वहात होती. त्या नदीच्या पलीकडल्या बाजूला चित्रकूट पर्वताच्या पायथ्याशीं रामलक्ष्मणाची पर्णकुटिका होती. एके दिवशीं सीतेचा संतोष करण्याची इच्छा मनांत धरून व स्वतःच्या व तिच्या चित्ताला करमणूक करण्याच्या उद्देशानें राम सीतेला चित्रकूट पर्वत दाखविण्याकरितां घेऊन गेला. तेथील गगनचुंबित वृक्ष, नानाप्रकारचे पशुपक्षी, किन्नरांचे व विद्याधरांचे मनोहर क्रीडा प्रदेश, गुहा, झरे, धबधबे, इत्यादि पाहून झाल्यावर रामानें हंससारसादिकांनीं व नियमनिष्ठ तपोधनांनीं सेवित व प्रसन्न जलानें युक्त अशी मंदाकिनी नदी सीतेस दाखविली; व तेथील सुगंधी कमलें, मदोन्मत्त गज व चक्रवाकादि पक्षी पाहून उभयतांचें चित्त प्रसन्न झालें. पुढें संचार करीत करीत ते चित्रकूट पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या एका गुहेसन्निध आले. ती गुहा

मंदाकिनीवरून झुळूझुळू वाहणाऱ्या, व श्रमानें
आलेल्या घर्मबिंदूमुळें थंडगार वाटणाऱ्या वाऱ्यानें
केस भुरूंभुरूं उडून कपाळावर आले असतांना*
ज्या [मुखा]ची शोभा चंद्राप्रमाणें भासली—
ज्यावर [ चंद्राप्रमाणें ] कुंकुमरूपी कलंकही
नव्हता—गाल [घर्मबिंदूंनीं ] चकाकत होते—
आभरणें काढिलीं असतांही ज्याची शोभा अपूर्व
होती—व सौम्य कर्णपाशानें जें फारच खुलून
दिसे—असें तें तुझें मुख[1] या क्षणीं माझ्या डो-

अगदीं एकांत प्रदेशांत असून मनोहर शिलांनीं, मत्त पक्षिगणांनीं, व पुष्पभारांनीं वांकलेल्या वृक्षांनीं युक्त अशी होता. या स्थलीं आल्यावरच रामानें उत्तररामचरित ६·३६ हा श्रृंगारगर्भित श्लोक सीतेस उद्देशून म्हटला. शिलातलावर उभयतांनीं कांहीं काळ विश्रांति घेतल्यावर निर्मल आणि उन्नत अशा मनःशिलेवर आपलें बोट घांसून सीतेच्या कपाळीं रामानें मनोहर तिलक लाविला, व नागचाफ्याचीं फुलें आपल्या हातांनीं तोडून तिच्या बुचड्यांत भरलीं. पुढें वाटेनें जात असतां वृक्षावर बसलेल्या एका वानरास पाहून सीता भयभीत झाली व तिनें रामास कवटाळिलें. असें झालें असतां, आपणाला आलिंगन दिलेल्या सीतेला आजानुबाहु रामानेंही आलिंगन दिलें. ह्या धांदलीमध्यें सीतेच्या ललाटीं रामानें मनःशिलेचा जो तिलक लाविला होता, तो त्याच्या वक्षःस्थलावर उमटलेला दिसूं लागला. तो पाहून सीतेला लज्जा वाटली व हंसूंही आलें. असा एकंदरींत हा प्रसंग आहे व त्या नाजूक प्रसंगाची लवानें रामास आठवण करून दिली.

* श्रमांबूवरी लागतां शीत वाटे
असा मंद मंदाकिनीवात सूटे ॥
ललाटावरी केश तो वात आणी
नसे दूर सारावया शक्त पाणी ॥४६॥

१. घर्मबिंदू, विखुरलेले केश, कुंकुमराहित्य, आभरणशून्यता, इत्यादि लक्षणें अध्वश्रम व संभोगश्रृंगार या दोहोंचींही सूचक आहेत.

ळ्यांसमोर उभें राहतें. ३७ *

( कांहीं वेळ निश्चल [ ध्यानमग्न ] होऊन करुण [स्वरा]नें ) खरोखर, कायहो हें !

बराच वेळ एकसारखें ध्यानस्थ होऊन प्रियजनाची मूर्ति कल्पनेनें [अंतश्चक्षू] समोर निर्माण केली असतां तीसुद्धां प्रवासामध्यें मनास आश्वासन देत नाहीं असेंच केवळ नाहीं, तरी एकदां कां [ समाधि उतरून आपण ] संकल्पसृष्टि सोडिली कीं मग सर्व जग ओसाड अरण्याप्रमाणें भासूं लागतें व हृदय तुषाग्नीच्या प्रखर फोफाट्यांतून होरपळून निघाल्यासारखें होतें.[1] ३८

**पडद्यांत**—वसिष्ठ, वाल्मीकि, दशरथाच्या राण्या,[2] आणि तसाच जनक, आणि अरुंधतीही—हे सर्वजण, मुलांच्या भांडणाचा वृत्तांत ऐकिल्यानें घाबरून जाऊन, जरेनें ज्यांचीं गात्रें जर्जर झालीं आहेत व आश्रमापासून इतक्या दूरवर यावयाचें असल्यानें—मनानें जरी त्यांना लवकर पल्ला गांठावासा वाटतो तरी—जे श्रमानें थकून गेले

* गेलें कुंकुम भाळिंचें न कळतां घर्माबुनेंही जरी
शोभे फार ललाट अंकरहिता त्या चंद्रखंडापरि ॥
भूषाहीनही कर्ण रम्य सुरुची गालावरी ज्यास तें
गे माझ्या नयनापुढें मुख तुझें प्राणप्रिये दीसतें ॥ ४७ ॥

१. हा श्लोक व याच्या पूर्वींच्या गद्याच्या दोन ओळी विशेष रसपरिपोषक आहेत असें नाहीं. कित्येक हस्तलिखित प्रतींत हा सर्व भाग वगळलेला आढळतो, यावरून प्रयोगाच्या सोईकरितां हा मुद्दाम गाळला असणें संभवनीय आहे.

२. हा व याच प्रकारचे अन्य उल्लेख बहुमानार्थी आहेत कीं रामाच्या तीनही माता रंगभूमीवर साक्षात् येत असत हें निश्चयानें ठरविणें कठिण आहे.

आहेत [ असे हे सर्व गुरुजन ] हळूं हळूं पावलें
टाकीत इकडे येत आहेत. ३९

**राम**—काय ! अरुंधतीसहित भगवान् वसिष्ठ माझ्या मातोश्री आणि [ राजा ] जनकही येथेंच ! हाय हाय ! यांना तोंड तरी कसें दाखवावें ? ( पाहून, करुणायुक्त होऊन ) हायरे दैवा ! तात जनकही येथेंच आले आहेत हा तर मज मंदभाग्यावर वज्राचाच आघात झाला.

सोयरीक जशी व्हावयास पाहिजे तशी जुळून
आली म्हणून आनंदलेल्या वसिष्ठादिकांनीं अनु-
मोदन दिलेल्या विवाहरूपी मंगल कार्यांत आम्हां
वधूवरांच्या पित्याचें [दशरथाचे व जनकाचें ] तें
[अपूर्व] संमेलन पाहिल्यानंतर पुनः पितृसख
जनकाचें—तशा त्या अक्षम्य अपराधानंतर—
या अशा अवस्थेंत हें असें दर्शन घ्यावयाचें त्या-
पेक्षां माझ्या या देहाची सहस्त्रधा शकलें कां
झालीं नाहींत ? अथवा रामाच्या हातून होणार
नाहीं असें काय आहे ? ४०

**पडद्यांत**—काय हा अनर्थ !

ज्याचें सौंदर्य स्वाभाविक ओजस्वितेमध्येंच अव-
शिष्ट राहिलें आहे अशा रघुनाथाची ही अशी
अवस्था एकाएकीं दृष्टीस पडतांच, प्रथम मूर्छित
झालेल्या[1] जनकास सावध केल्यावर, विकल झा-

१ सकाळपासून—चवथ्या अंकाच्या प्रारंभापासून—जनक ज्या मनोवृत्तींत आहे, कौसल्येची व विशेषतः लवाची गांठ पडल्यापासून त्याच्या मनाची जी नाजुक अवस्था झाली होती ( ४·१४, ४·२२, ४·२४ इत्यादि ) ती विचारांत घेतां पुरुषासारखा पुरुष असून जनक सर्वांच्या अगोदर मूर्छित कसा पडला याचें आश्चर्य वाटावयास नको. संकट दूर आहे तोंपावेतों भीति कितीही वाटली तरी संकट प्रत्यक्ष येऊन ठेपलें म्हणजे सावधान चित्तानें त्याचा प्रतिकार करण्याच्या उद्योगास लागावयाचें, व आलेलें

लेल्या मातोश्रींनांही [प्रबल] मूर्छा आली ! ४१

**राम**—हा ताता ! हे मातांनो !

जनक व रघु या दोन्ही कुळांचें जें मंगलसर्वस्व
तिजविषयीं कठोर मन करणारा हा मी, तुमच्या
करुणेस मुळींच पात्र नाहीं. ४२

जलद जाऊन समाचार घेतला पाहिजे. ( उठतो. )

**कुश व लव**—असें इकडून इकडून यावें तातांनीं.

( सर्व शोकाकुल होऊन धांदलीनें इकडून तिकडे करून निघून जातात. )

## महाकविश्रीभवभूतिप्रणीत उत्तररामचरित नाटकाचा कुमारप्रत्यभिज्ञान नामक अंक सहावा[1] समाप्त.

संकट टळलें म्हणजे आतांपर्यंत विवेकानें दाबांत ठेविलेलें दुःख तीव्रपणें बाहेर पडावयाचें, हा सर्व प्रकार स्त्रीस्वभावास अनुरूपच आहे हें लक्षांत ठेविलें म्हणजे जनकास सावध केल्याबरोबर मातोश्रींना मूर्छना कां आली याचाही उलगडा साहजिकच होईल.

१. प्रस्तुत अंक ही शाकुंतलाच्या सातव्या अंकांत दुष्यंत सर्वदमनास आपला मुलगा म्हणून ओळखितो त्या प्रसंगाची नक्कल आहे. जीं ओळख पटण्याचीं साधनें—जे सांखळीचे दुवे—एकवटल्यानें प्रत्यभिज्ञान पूर्ण होतें ते दुवे उभयत्र जवळ जवळ सारखेच आहेत, हें पुढील तुलनात्मक कोष्टकावरून दिसून येईल—

| शाकुंतल (पाटणकर, आवृत्ति २ री) | उत्तररामचरित |
|---|---|
| भाविलाभसूचक बाहुस्पंदन (७·१३) | ( यासारखें येथें कांहीं नाहीं ) |
| मुलाबद्दल दुष्यंतास वाटणारें अहेतुक प्रेम (७·१४) | रामास लवाबद्दल ( ६·१२ व कुशाबद्दल (६·२१) वाटणारा स्नेह |
| मुलाचें अलौकिक तेज व पराक्रम (७·१५) | लवाची रमणीय व प्रशांत आकृति (६·९), कुशाचा गंभीर शब्द (६·१७) व चालण्याची ऐट (६·१९) |

| | |
|---|---|
| मुलाच्या हातावरील चक्रवर्तिलक्षण ( ७·१५[५] ) | दोन्ही मुलांमध्यें दिसून येणारीं साम्राज्यशंसि लक्षणें ( ६·२३ ) |
| मुलगा ऋषिपुत्र नाहीं असें कळणें ( ७·१८[३] ) | अभिवादनाचे वेळीं ( ६·१२[१०] व ६·२०[१] ) मुलांनीं स्वतःस प्राचेतसशिष्य एवढेंच म्हणणें |
| मुलाच्या अंगस्पर्शाचें अपूर्व सुख ( ७·१९ ) | लव ( ६·१३ ) व कुश ( ६·२२ ) यांचा तोच प्रकार |
| दुष्यंताचा व मुलाचा सारखा तोंडावळा ( ७·१९[४] ) | मुलांची स्वतःसारखी आणि सीतेसारखीही दिसून येणारी आंगलट (६·२५[१]–६·२७ ) |
| दुष्यंत अपरिचित असतांही मुलानें जवळ जाणें व त्याचें ऐकणें (७·१९[५]) | लवास ( ६·१०,११ ) व कुशास (६·२०) रामाबद्दल वाटणारें आदरयुक्त प्रेम |
| मुलगा पुरुवंशोद्भव आहे हें ज्ञान ( ७·१९[१०] ) | रघुवंशीय कुमारांसारखा उभयतांचा तोंडावळा ( ६·२५ ) |
| अप्सरेमुळें जेथें मानवाची गति नाहीं अशा ठिकाणीं मुलाचें वास्तव्य ( ७·२०[३] ) | सीता पूर्वीं ज्या वाल्मीकितपोवनासन्निध टाकिली होती तेथेंच मुलांचें वास्तव्य (६·२७[१]), व त्यांचें वयही १२ वर्षांचें असणें; पुढें ( ७·१५ ) पहा |
| मुलाची माता पतीनें नाहक टाकिली आहे हें समजणें (७·२०[७]), व पुढें मुलाच्या मातेचें नांव शकुंतलाच असणें ( ७·२०[२२]) | सीतेचा गर्भग्रंथि द्विधा भिन्न झाला होता, ( ६·२८ ) व मुलेंही आवळींजावळींच आहेत यापासून निघणारें अनुमान; पुढें ( ७·३ ) पहा |
| रक्षाकरंडकवृत्तांत (७·२०[२८–४८]) | जृंभकास्त्रप्रयोगसंहरणाविज्ञान मुलांना स्वतःसिद्ध आहे (६·१५[५])या विषयींचा तर्क (६·२७[३]); पुढें (७·१०[३]) पहा |
| मुलाच्या बापाचें नांव दुष्यंत हें कळणें ( ७·२०[५८] ) | वाल्मीकीनें प्रत्यक्ष तसें सांगणें ( पहा ७·१९[१३]) |
| दुष्यंतशकुंतलेची परस्पर ओळख पटणें ( ७·२२[१]) | सीतेची पुनः प्राप्ति ( ७·१८[३]) |

| दुर्वासाचें शापवृत्त समजून सर्व विकल्प दूर होणें (७·३१) | लोकापवादनिरसन व सीतेचा पुनःस्वीकार (७·१९) |
|---|---|

वरील तुलनात्मक कोष्टकावरून कालिदास व भवभूति यांनीं ज्या प्रकारें प्रत्यभिज्ञान जुळवून आणिलें आहे त्यांतील सादृश्य तर लक्षांत येईलच, पण त्यांतील सूक्ष्म भेदही लक्षांत यावा. शाकुंतलांतील प्रत्यभिज्ञान एकांगी आहे. सर्वदमन वयानें लहानच असल्यामुळें त्याला दुष्यंताची ओळख पटण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं.तथापि दुष्यंत अपरिचित असतांही त्याचेजवळ त्यानें जाणें व निमूटपणें राहणें यावरून त्याच्यामध्यें सुद्धां एक अंतर्गत प्रेरणा झाली होती असें फार झालें तर म्हणतां येईल. याच प्रेरणेस कुश व लव यांचे ठिकाणीं वाचा फुटली आहे (उत्तररामचरित ६·१० व ११,६·२०), म्हणजे उत्तररामचरितांतील प्रत्यभिज्ञान दुरंगी अथवा तिरंगी आहे. कालिदासानें जें प्रत्यभिज्ञान १०।१२ श्लोक व शंभर सवाशें ओळींत उरकून घेतलें आहे त्यालाच भवभूतीला २० श्लोक व १०० ओळी लागूनही प्रत्यभिज्ञानाचा मुख्य भाग पुढील म्हणजे सातव्या अंकावर टाकावा लागला आहे याचें कारणही हेंच आहे. शिवाय रामास अगोदर लव दृष्टीस पडून मग कुश दृष्टीस पडतो या कारणानेंही थोडीशी द्विरुक्ति होणें अपरिहार्य झालें होतें.

दुसराही एक महत्त्वाचा फरक लक्षांत घेण्याजोगा आहे. दुष्यंतास मुलाची ओळख पटण्याच्या साधनांपैकीं अत्यंत महत्त्वाचें साधन रक्षाकरंडक ऊर्फ मांत्रिक ताईत हा होय. जो ताईत सुटून जमिनीवर पडला असतां मुलगा स्वतः व त्याचे आईबाप या व्यतिरिक्त चवथ्यानें उचलिल्यास त्यास सर्प होऊन दंश करी याबद्दल अनेकशः प्रचीति आली होती, तो दुष्यंतानें उचलिला असतां त्यास कांहींही न होणें यापेक्षां तो मुलगा आपलाच आहे असें ओळखण्यास दुष्यंतास आणखी सबळ पुरावा तो कोणता असणार ? सिंहाच्या झोंबींत ताईत गळून पडणें व तो दुष्यंतानें उचलणें या गोष्टी प्रेक्षकांसमोर घडून येत आहेत व त्यांचें महत्त्वही त्यांना तेव्हांच प्रथम कळत आहे. या रक्षाकरंडकाइतका उत्तररामचरितांतील सबळ पुरावा जृंभकास्त्रविज्ञान हा आहे. पण ह्या अस्त्राचा प्रयोग सहाव्या अंकांत राम रंगभूमीवर येण्यापूर्वींच झालेला आहे व या झाल्या गेल्या गोष्टीची रामास तिसऱ्याकडून माहिती मिळते व नंतर त्यावर त्याचे तर्कवितर्क सुरू होतात. कोणतीही गोष्ट प्रत्यक्ष पाहण्यामध्यें व लोकांनीं पाहून सांगितल्यामध्यें जो फरक असावयाचा तोच फरक शाकुंतलाच्या सातव्या व उत्तररामचरिताच्या सहाव्या अंकांत आपल्या अनुभवास येतो, व याच

कारणामुळें रामाच्या भाषणामध्यें स्वगत असा बराच भाग ठेवणें भवभूतीस भाग पडलें असेल ( मागें पृष्ठ २४७, टीप १ पहा ). त्यांतल्यात्यांत रामाला ( भवभूतीला म्हटलें तरी चालेल ) विचार करण्याची बरीच संवय लागली होती व कोणतीही गोष्ट व्यंग ठेवण्यापेक्षां स्पष्ट शब्दांनीं सांगणेंच ( प्रेक्षकांचा दर्जा लक्षांत घेतां ) त्यास जास्त श्रेयस्कर वाटत असल्यास त्याचा दोष जितका कवीला तितकाच त्याच्या परिस्थितीलाही देतां येईल. उदाहरणार्थ जेथें कालिदासानें 'ह्या मुलाचा तोंडावळा थेट तुझ्यासारखा आहे' असें मोघम वाक्य घातलें आहे तेथें राम हा तोंडावळा कोणकोणत्या बाबतींत माझ्यासारखा व कोणकोणत्या बाबतींत सीतेसारखा आहे याचें एकाद्या सामुद्रिकाप्रमाणें सूक्ष्म विवेचन करीत आहे, व हीच गोष्ट चहूंकडे लागू पडते.

शाकुंतलांत प्रत्यभिज्ञानास ज्या अंकांत प्रारंभ झाला आहे त्याच अंकांत तें पूर्ण झालें आहे व पतिपत्नींची भेट होत आहे. उत्तररामचरितांत ही भेट लगेच होणें शक्य नसल्यामुळें प्रत्यभिज्ञानरूपी कोडें अगदीं सुटावयाच्या बेतांत आलें असतां तें तसेंच अर्धें ठेवून गर्भनाटकाच्या द्वारा पतिपत्नींच्या संमेलनाचा कवीस उपक्रम करावा लागत आहे. संमेलनाचा प्रश्न शाकुंतलाप्रमाणें उत्तररामचरितांत केवळ पुत्रपतिपत्नी यांचाच केवळ नसून, त्यास लोकांच्या अनुमतीची अपेक्षा होती; व याकरितां तरी प्रत्यभिज्ञान सहाव्या अंकांतच पुरें न करितां वाल्मीकीचें उपनाटक पहावयास सर्व पौरजन मिळून येईतों वाट पाहणें जरूर होतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शाकुंतलापेक्षां उत्तररामचरितांतील प्रश्न जास्त गुंतागुंतीचा होता; जी वस्तु साध्य करावयाची होती तिच्या मार्गांत जास्त अडचणी होत्या; व म्हणून कालिदासानें जेथें एकाच अंकांत सर्व काम आटोपतें घेतलें आहे तेथें भवभूतीस दोन अंक खर्चीं घालावे लागले. तथापि कांहीं ठिकाणीं भवभूतीनें जरूरीपेक्षां जास्त पाल्हाळ केला आहे व त्याबद्दल त्यास जबाबदार धरणें गैरवाजवी होणार नाहीं.

दुसऱ्या एका दृष्टीनें विचार करितां दुष्यंतानें शकुंतलेचें भर दरबारांत प्रत्याख्यान केलें ही गोष्ट शकुंतलेला कितीही निर्दयपणाची वाटली तरी शापामुळें दुष्यंताची स्मृति नष्ट झाल्यामुळें त्यांत दुष्यंताकडे कसलाही दोष येत नव्हता. पण रामानें सीतात्याग अगदीं डोळे उघडे ठेवून केला असल्यामुळें त्याच्याकडे त्यासंबंधीं सर्व दोष वा जबाबदारी पूर्णपणें येते. अर्थात् संमेलनाचे वेळीं दुष्यंताच्या मनांत आपण निरपराधी आहों अशी जाणीव त्याच्या हातून घडलेल्या विचित्र वर्तनाबद्दल वाटणाऱ्या

लज्जेपेक्षां जास्त स्पष्टपणें भासत असली पाहिजे. रामाची स्थिति अशी नव्हती. त्याच्या हातून झालेलें निष्ठुर वर्तन यद्यपि ज्या परिस्थितींत तो सांपडला होता (मागें पृष्ठ १०३ पहा) त्या परिस्थितींत अपरिहार्य होतें, तथापि सीतेच्या दृष्टीनें तें अगदीं गर्हणीय होतें. सीतेनें रामास लक्ष्मणाकरवीं जो निरोप पाठविला ( वाल्मीकिरामायण, ७·४८ आणि रघुवंश, १४·५९–६८) त्यावरूनही तेंच व्यक्त होतें. रामानें सीतेस लोकापवाद उघडपणें कळवून तिला पौरजनांच्या समाधानार्थ आणखी एक दिव्य करावयास सांगितलें असतें तर तें सरळ व्यवहाराचें झालें असतें. त्यानें तिचा कपटानें त्याग करावयाचा नव्हता. पत्नीचा त्याग करितांना त्याचें मन अत्यंत व्यथित झालें होतें व त्यागोत्तरही त्याचें प्रेम अढळ असून सुवर्णप्रतिमा करून तें त्यानें सर्वांच्या निदर्शनासही आणिलें होतें. पण तेवढ्यानें झालेल्या दोषाचें परिमार्जन होणें शक्य नव्हतें. दुष्यंताची व रामाची या प्रकारें भिन्न भिन्न मनःस्थिति असल्यामुळें त्यांचें संमेलनाच्या वेळचें वर्तनही परस्पर विसदृश असेंच घडून येत आहे. आपल्या निरपराधित्वाची जाणीव असलेल्या दुष्यंताला शकुंतलेची उलट माफी मागण्याचें धैर्य तरी होतें. राम अगदीं विकल—मूढ—होऊन गुरुजन सांगतील तसें करावयास तयार होतो. झालेला प्रकार खरोखरीचा आहे कीं स्वप्नांतील आहे याचीही त्याला भ्रांति पडते ( ७·१९[३५] ), इतकी त्याची आपल्या अपराधित्वाची जाणीव तीव्र असते.

नायिकेच्या दृष्टीनें विचार करितां शकुंतलेला कालिदासानें पूर्ण न्याय दिला नाहीं, शापाचें वृत्त अगोदर तिला समजून येऊन नंतर उभयतांचें मीलन व्हावयास पाहिजे होतें असें आम्हांस वाटतें. पतीच्या हातून अपराध झाला असला तरी त्याला उदार मनानें क्षमा करण्यास तयार झाल्यानें आर्यपत्नीस उचित अशी पतिनिष्ठा शकुंतलेचे ठिकाणीं विशेष उज्ज्वलतेनें दिसून येत आहे व हा नाटककर्त्याचा दोष नसून गुणच आहे असें या आक्षेपाचें कदाचित् समाधान करून घेतां येईल. सीतेसंबंधीं मात्र तिसऱ्या अंकांतील छायाप्रवेश जुळवून आणून भवभूतीनें तिला पूर्ण न्याय मिळू दिला आहे हें त्यास भूषणावह आहे. याचें विस्तृत विवेचन मागें तिसऱ्या अंकाच्या शेवटीं केलेंच आहे.

# अंक सातवा

( तदनंतर लक्ष्मण प्रवेश करितो.)

**लक्ष्मण**—अहो, आज प्रत्यक्ष भगवान् वाल्मीकींनीं आम्हांसह
३ ब्राह्मणक्षत्रियादि सर्व पौरजनांना निमंत्रण दिलें असून, देव, दानव, पशु,
पक्षी, सर्पराज, इत्यादि यच्चावत् सर्व जंगम व स्थावर भूतमात्रांस[1]
आपल्या सामर्थ्यानें[2] येथें जमा केलें आहे. आर्य [रामप्रभूं]नीं मला
६ आज्ञा केली कीं, ' वत्सा लक्ष्मणा, भगवान् वाल्मीकींनीं स्वतः रचि-
लेल्या नाटकाचा अप्सरांकरवीं प्रयोग होणार आहे तो पहाण्यास
आम्हांस बोलाविलें आहे. तर भागीरथीतीरीं जा—कारण तेंच रंग-
९ स्थळ योजिलें आहे[3]—व सर्व प्रेक्षकांच्या बसण्याची वगैरे तरतूद

१. कोणत्याही महत्वाच्या प्रसंगीं देव, दानव, यक्ष, किन्नर, सर्प, गरुड, इत्यादि यच्चावत् सर्व प्राणी हजर होते असें वर्णन करण्याचा प्रघात बौद्ध ग्रंथांतून वरचेवर आढळतो.

२. आह्मांला मागें (पृ० २३०) जी शंका आली होती तिचें कवीनें येथें निरसन केलें आहे. दैवी सामर्थ्यानेंच जेथें सर्व गोष्टी घडून आल्या तेथें सहाव्या अंकानंतर लगेच—ह्मणजे त्याच दिवशीं संध्याकाळच्या सुमारास—सातव्या अंकांतील कथानक घडून आलें असें मानण्यास विशेष प्रत्यवाय नाहीं.

३. उघड्या मैदानांत तात्पुरतें उभें केलेलें हें रंगस्थळ कसें असेल याचा अंदाज करितां येणार नाहीं, कारण हें उभारण्यामध्यें अतिमानुष शक्तीचा उपयोग केला असल्यानें आह्मी त्याच्या संबंधानें कितीही कल्पना केली तरी ती वस्तुस्थितीस अपुरीच पडणार. तूर्त येथें एवढेंच लक्षांत ठेवावयाचें कीं रंगस्थळास संस्कृत शब्द ' आतोद्यस्थान ' हा वापरला आहे. यावरून व पुढें ७·१५[१५] मध्यें 'अपनीयतामातोद्यकम्' असें म्हटलें आहे यावरून गर्भनाटकांत संगीत वाद्यांचा आणि अर्थात् संगीताचा कांहीं तरी उपयोग असला पाहिजे हें उघड दिसतें. तेव्हां गर्भनाटकांत जे १२ श्लोक आहेत ते तरी तालसुरावर गाइले जात असावेत, किंवा अन्य कोठें तरी संगीताचा उपयोग केला जात असावा असें मानणें भाग पडतें. पहिल्या कल्पने-विरुद्ध असें ह्मणतां येईल कीं सर्वच श्लोक तालसुरावर म्हटले गेल्यास नाटकास वेळ बेसुमार लागेल हें तर झालेंच, पण असें कोणतेंही संस्कृत

ठेव.'' त्याप्रमाणें मर्त्यामर्त्य सर्व प्राणिमात्रांना योग्य ठिकाणीं बसविण्याची मीं व्यवस्था केली आहे. आणि—

नाटक नाहीं कीं ज्यामध्यें जेथें मनोवृत्ती कांहीं कारणानें उद्दीपित झाल्या असतात त्याच ठिकाणीं पद्य घातलें आहे व अन्य सर्व ठिकाणीं गद्यच आहे. पुष्कळ वेळां अगदीं क्षुल्लक प्रसंगाला सुद्धां श्लोक घातला आहे; व अशा रीतीनें उठण्याबसण्याला गायन लागूं लागल्यास हल्लीं कित्येक संगीत नाटकांतून गायनाच्या प्रधान उद्देशाचा जसा विपर्यास झालेला आढळतो तशीच स्थिति पूर्वीं होती असें मानावें लागेल. तसेंच जेथें जेथें एकादें पद्य तालसुरावर ह्मणावयाचें असेल तेथें तेथें (उदाहरणार्थ, शाकुंतलाच्या प्रस्तावनेंतील नटीच्या 'ईसीसि चुम्बिदाइं' ह्या पद्यापूर्वीं 'गायति' अशी विशेष अभिनयसूचना ज्या अर्थीं देण्यांत येत असे त्या अर्थीं अशा अभिनयसूचनेच्या अभावीं सर्व पद्यें (शाळेंत मुलें ह्मणतात त्याप्रमाणें) नुसतींच ह्मणावयाचीं असें अनुमान निघतें. तेव्हां ही कल्पना सुसंगत दिसत नाहीं.—आमच्या मतें प्राचीन संस्कृत नाटकांमध्यें, अलीकडे युरोपांतील नाटकामध्यें ज्या प्रकारचा व ज्या कारणांकरितां ऑर्केस्ट्रा (orchestra) असतो त्याच प्रकारचा व जवळ जवळ तेंच काम करणारा गायक व वादकगण असावा. नवीन अंकास आरंभ होण्याचे वेळीं अथवा समाप्तीचे वेळीं, नवीन पात्र रंगभूमीवर येण्याच्या वेळीं, रंगभूमीवर विशेष महत्वाचें एकादें कार्य घडत असतां, वगैरे हा ऑर्केस्ट्रा अनुरूप वाद्यें वाजवून व गान गाऊन प्रेक्षकांच्या त्या त्या मनोवृत्ती जागृत करीत असावा. नाट्यशास्त्रामध्यें ६४ प्रकारच्या ध्रुवा (एक गीतिविशेष) सांगितल्या आहेत व त्यांचा उपयोग कोठें करीत असत याबद्दल नाट्यशास्त्रांत असें म्हटलें आहे (अध्याय ३२, श्लोक ३१८ वगैरे)—

नानारसार्थयुक्ता नॄणां या गीयते प्रवेशेषु ।
प्रावेशिकी तु नाम्ना विज्ञेया सा ध्रुवा तज्ज्ञैः ॥
अङ्कान्ते निष्क्रमणे पात्रांणा गीयते प्रयोगेषु ।
निष्क्रामोपगतगुणां विद्यान्नैष्क्रामिकीं तां तु ॥
क्रममुल्लङ्घ्य विधिज्ञैः क्रियते या द्रुतलयेन नाट्यविधौ ।
आक्षेपिकी ध्रुवासौ द्रुता स्थिता वापि विज्ञेया ॥
या च रसान्तरमुपगतमाक्षेपवशाद्द्रुतं प्रसादयति ।
रागप्रसादजननीं विद्यात् प्रासादिकीं तां तु ॥
विषसंमूर्छिते भ्रान्ते वस्त्राभरणसंयमे ।

राज्याश्रमामध्यें असूनही ज्यांच्या वांट्यास मुनींचें
कष्टकारक व्रत आलें आहे असे हे दादाही वाल्मी-
कींच्या शब्दास मान देऊन हे इकडे येत आहेत.१

दोषप्रच्छादने या च गीयते सान्तराच्छदा ॥
बद्धे निरुद्धे पतिते व्याधिते मूर्छिते मृते ।
अवकृष्टा ध्रुवा कार्या भावे च करुणाश्रये ॥
औत्सुक्ये ह्यवहित्थे(१) च चिन्तायां परिदेविते ।
श्रमे दैन्ये विषादे च स्थिता कार्या ध्रुवा बुधैः ॥
एवमर्थविधिं ज्ञात्वा कालं देशमृतुं तथा ।
प्रकृतिं भावलिंगं च ततो योज्या ध्रुवा बुधैः ॥

विक्रमोर्वशीय नाटकाच्या चवथ्या अंकांत जो गीतात्मक प्राकृत भाग आहे त्याचा अर्थ व उपयोग वरील नाट्यशास्त्राच्या उताऱ्यावरून कळून येण्यासारखा आहे. कांहीं वेळेला ऑर्केस्ट्रानें म्हणावयाच्या ध्रुवांच्या वेळींच नाट्यांत एकादा श्लोक घातला असला तर ऑर्केस्ट्राचें गायन बंद झाल्यानंतर तो श्लोक त्याच रागांत अभिनय करणारा नटच गात असेल व ऑर्केस्ट्रा नुसती वाद्यांनीं साथ करीत असेल असेंही होणें शक्य आहे. व या दृष्टीनें विचार केला म्हणजे मागें ६·१७ ह्या श्लोकास आह्मीं जी टीप दिली होती तिचें महत्व दिसून येईल. राजशेखराच्या १।२ नाटकांच्या प्रस्तावनेचा शेवट 'हा पहा अमुक अमुक रंगभूमीवर येत आहे' असा न करितां 'ही पहा अमक्या तमक्याची प्रावेशिकी ध्रुवा' असा केला आहे त्यांतील मर्महि वरील विवेचनावरून लक्षांत येईल. नाट्यशास्त्राप्रमाणें या ध्रुवा आकाश-भाषणाचे वेळीं, मूर्छनादि विकारांच्या वेळीं, व नटांचा प्रमाद अथवा व्यंग सुधारून घेण्याकरितांही उपयोगांत आणीत असत. त्यांचा प्रेक्षकांचे मनावर काय परिणाम होत असेल हें ज्यांनीं युरोपियन धर्तीचें व आर्केस्ट्रा ज्यामध्यें आहे असें नाटक पाहिलें असेल त्यांनाच साधारणपणें समजून येईल. प्रस्तुत नाटकाच्या तिसऱ्या अंकांतील अनेक मूर्छना अभिनयाच्या दृष्टीनें अव्यवहार्य वाटतात, पण जर प्रत्येक मूर्छनेच्या वेळीं अनुरूप मनोवृत्तींस उद्दीपित करणाऱ्या गायनवादनाचा प्रयोग होत असेल तर अभिनय तितका अस्वाभाविक वाटणार नाहीं हें लक्षांत आणिल्यास उत्तर-रामचरित हें केवळ श्राव्य काव्य आहे–दृश्य नाहीं–असा सरसकट शेरा मारण्याकडे आपली एकदम प्रवृत्ति होणार नाहीं.

( तदनंतर राम प्रवेश करितो. )

राम—वत्सा लक्ष्मणा, सभ्य व परीक्षक[1] [योग्य स्थळीं] बसले काय ?

३ लक्ष्मण—हो तर.

राम—आणि त्या आपल्या वत्स कुशलवांचीही चंद्रकेतूसारखीच बसावयाची व्यवस्था ठेवावी.

६ लक्ष्मण—त्यांजविषयींच्या प्रभूंचा स्नेह ध्यानांत आणून तसेंच केलें आहे. हें राजासन घातलें आहे.[2]

( उभयतां बसतात. )

१. नाटकाचा प्रयोग चांगला झाला किंवा नाहीं हें ठरवून ज्याच्या नाटकामध्यें दोष ( घात ) कमी असून गुण ( सिद्धिस्थानें ) जास्त त्यास राजाकडून बक्षीस मिळवून देण्याकरितां प्राचीन काळीं कांहीं अधिकारी नेमीत. त्यांना प्राश्निक (परीक्षक) म्हणतात. हे अधिकारी कसे असावेत याबद्दल भरताच्या नाट्यशास्त्रांत ( २७·४७ ते ५० वगैरे ) म्हटलें आहे—

चारित्राभिनयोपेताः श्रान्तवृत्तश्रुतान्विताः ।
यशोधर्मरताश्चैव मध्यस्था वचसान्विताः ॥
षडङ्गनाट्यकुशला अलुब्धा शुचयः समाः ।
चतुरातोद्यकुशला वृत्तज्ञास्तत्त्वदर्शिनः ॥
देशभाषाविधानज्ञाः कलाशिल्पप्रयोजकाः ।
चतुर्धाभिनयज्ञाश्च रसभावविकल्पने ॥
शब्दच्छन्दोविधानज्ञा नानाशास्त्रविचक्षणाः ।
एवंविधास्तु कर्तव्याः प्राश्निका दश रूपतः ॥
यान्युक्तानि हि पूर्वं सिद्धिस्थानानि तानि लक्ष्याणि ।
घाताश्च लक्षणीया यथोत्था नाट्यवेदेषु ॥
घाता यस्य त्वल्पाः संख्याता सिद्धयश्च बहुलाः स्युः ।
विदितं कृत्वा राज्ञस्तस्मै देया पताका हि ॥

प्राचीन ग्रीक नाटकांच्या प्रयोगांचे वेळींही असेच अधिकारी असत.

२. शब्दशः भाषांतर ‘ राजासन आंथरिलें आहे ’ असें होईल. या नाटकाचा प्रयोग उघड्या हवेंत वाळवंटींच झाला आहे; तेव्हां राजाकरितां उच्च सिंहासन वगैरे मांडिलें नव्हतें. एकादें कुथासन जमिनीवर पसरून दिलें होतें असें दिसतें.

९ **राम**—आतां आरंभ व्हावा.[1]

**सूत्रधार** ( प्रवेश करून )—सत्यवादी[2] भगवान् वरुणपुत्र वाल्मीकींची सर्व स्थावरजंगमात्मक जगतास अशी आज्ञा[3] आहे कीं करुण १२आणि अद्भुत[4] रसानें युक्त असा जो हा पुण्यकारक कथाभाग आम्हीं दिव्य दृष्टीनें साक्षात् अवलोकन करून [ नाट्यरूपानें ] रचिला आहे[5] त्याजकडे कार्य-गौरवास्तव[6] अवधान असावें.

१९**राम**—म्हणजे भावार्थ असा कीं, ऋषींना सर्व धर्माधर्म अपरोक्ष

१. आतां सुरू होणारें हें गर्भनाटक लहान एकांकीच आहे. मूळ नाटकांतील पात्रें हें उपनाटक चाललें असतां मध्यंतरीं कांहीं भाषणें वगैरे करून त्यास थोडाबहुत अडथळा करितात. पण असें होणें अपरिहार्य आहे. गर्भनाटकाचा भाग कोणता व मूळ नाटकाचा भाग कोणता हें छापण्यास निरनिराळ्या शाईचा उपयोग केल्याशिवाय दाखवितां येणें शक्य नव्हतें. तथापि संदर्भावरून सर्व सहज कळून येण्याजोगें आहे.

२. हें विशेषण मुद्दाम योजिलें आहे.

३. सामान्य नाटककारांनीं विनंति करावी; वाल्मीकींनीं आज्ञाच करणें उचित आहे.

४. गर्भनाटकांत अद्भुत रस जृंभकास्त्रप्रवेशाच्या वेळीं आला आहे. करुणरस तर सर्वत्रच आहे.

५. वाल्मीकीनें रामायण हें काव्य रचिलें, पण रामायणांतील कोणत्याही भागाचें नाटक रचिल्याची प्रसिद्धि नाहीं. भवभूतीनें स्वतःच रचिलेलें नाटक वाल्मीकीनें रचिलें असें (नाटकांतच कां होईना) विधान करण्यांत वाल्मीकीची व आपली बरोबरी आहे असें त्यानें पर्यायानें सुचविल्यासारखें होतें. प्रस्तुत अंकाच्या शेवटच्या श्लोकांतही तोच ध्वनि ठेविला आहे. पुढें राजशेखरादि कवींनीं तर भवभूति हा वाल्मीकीचा अवतारच होता असें स्पष्टच म्हटलें आहे. उपोद्घात §८ पहा.

६. विक्रमोर्वशीयांतील ‘ प्रणयिषु वा दाक्षिण्यादथवा सद्वस्तुपुरुषबहुमानात् ’ इत्यादि प्रसिद्ध श्लोकाची येथें आठवण होते. वाल्मीकीला या गर्भनाटकाच्या द्वारा सीतासंमेलनरूपी महत्कार्य उरकून घ्यावयाचें होतें हें मागें ४·२२[33] व ४·२६[10] वरून उघड झालेंच आहे.

असतात.[1] तेव्हां अशा परमपूज्य सत्यस्वरूपी[2] महर्षींच्या ज्ञानाची गति कोठेंही कुंठित होत नाहीं, व त्यांत रजोगुणात्मक दोषही
१८आढळावयाचा नाहीं. अतएव त्या संबंधानें शंकाही घेतां यावयाची नाहीं.[3]

**पडद्यांत**—हा आर्यपुत्रा ! हा वत्सा लक्ष्मणा ! ही मी येथें एकटी
२१अनाथ आहें; मला वेणा येऊं लागल्या; आणि हीं दुष्ट श्वापदें तर मला भक्षून टाकण्याकरितां अगदीं टपलीं आहेत. अशी मी ही कपाळकरंटी आतां मंदाकिनीच्या प्रवाहांत घालून घेत्यें.

२४**लक्ष्मण** ( स्वगत )—हाय ! हें कांहीं विपरीतच उपस्थित झालें !

**सूत्रधार**—विश्वास पोषणाऱ्या [ पृथ्वीची ] कन्या
देवी [ सीता ]—राजानें तिचा महारण्यांत त्याग
केल्यानंतर—प्रसवकालच्या वेदनांनीं पीडित
होत्साती भगवती भागीरथीमध्यें आपणास घा-
लून घेत आहे. २

( जातो.[4] )

**राम** ( आवेशानें )—देवि, देवि ! एक क्षण तरी धीर धर.

३ **लक्ष्मण**—पण, दादा, हें नाटक आहे.

१. मूळांतील ' साक्षात्कृतधर्माण ऋषयः ' यामध्यें निरुक्त १·६·५ चा अनुवाद केला आहे.

२. मूळांतील ' ऋतंभराणि ' ह्यामध्यें 'ऋतंभरा तत्र प्रज्ञा' या योगसूत्राचा (१·४८) ध्वनि आहे.

३. मागें ४·२९, १·१०, इत्यादि पहा. वाल्मीकीच्या शब्दांवर—म्हणजे पुढें गर्भनाटकांत येणाऱ्या गोष्टींवर—अविश्वास ठेविणें अशक्य आहे हें रामानेंच अगोदर स्वमुखानें कबूल केलें आहे हें लक्षांत ठेवावें.

४. ही गर्भनाटकाची प्रस्तावना भासाच्या प्रस्तावनेसारखीच लहान व ' सूत्रधारकृतारंभ ' अशी आहे. विक्रमोर्वशीयाची प्रस्तावनाही याच धर्तीवर आहे. सूत्रधार बोलण्यास सुरुवात करितो न करितो इतक्यांत पडद्यांतील भाषणानें त्याला अडथळा व्हावा, व सूत्रधारानें अडथळ्याचें कारण सांगून चालतें व्हावे ही प्रस्तावनेची पद्धति एके काळीं सर्वसंमत झाली होती असें दिसतें.

**राम**—हे दंडकारण्यांतील प्रियसखि, देवि सीते ! या रामामुळें तुझ्या दैवाचे असे धिंडवडे व्हावेत ना !

६ **लक्ष्मण**—आर्या, अगोदर या प्रयोगाचा भावार्थ तर लक्षांत घेऊं या.

**राम**—वज्रासारखें हृदय करून हा मी सज्ज आहें !

९ ( तदनंतर ज्यांनीं मांडीवर एकेक मूल घेतलें आहे अशा पृथ्वी व भागीरथींनीं सांवरून धरिलेली मूर्छित सीता प्रवेश करिते.[1] )

**राम**—वत्सा [ लक्ष्मणा ], एकाद्या खोल, दुर्गम, व दुस्तर अंध-
१२ कार [ सागरा]मध्यें मी बुडत आहेसें वाटतें ! मला हातभार दे.

**पृथ्वी व भागीरथी**—हे विदेहराजपुत्रि—हे कल्याणि
[ सीते ]—सावध हो; आनंदाचें वर्तमान आहे.
पाण्यांत असतांनाच रघुवंशाची वृद्धि करणाऱ्या
ह्या दोघां पुत्रांस तूं प्रसाविली आहेस. ३

**सीता** ( सावध होऊन )—बरें झालें. दोघेही मुलगेच झाले ! हा आर्यपुत्रा ! ! ( मूर्छित होते.[2] )

३ **लक्ष्मण** ( रामाच्या पायां पडून )—आर्या, दादा, मोठी आनंदाची गोष्ट आहे ! रघुवंशाला कल्याणरूप अंकुर फुटला ! ( पाहून ) हा; हें काय ! बाष्पावेगानें हृदय स्तंभित होऊन दादांना अगदीं प्रबल
६ मूर्छनाच आली ! ( वारा घालितो. )

१. मूर्छित पात्राचा प्रवेश कसा करावयाचा यासंबंधीं पृष्ठ १३७ टीप १ व पृष्ठ १३८ टीप २ येथें थोडेंसें विवेचन आलेंच आहे. सूत्रधार गेल्यापासून सीतेचा प्रवेश होईतों एक तर रामलक्ष्मणांचा थोडासा संवाद व दुसरें वर पृष्ठ २५७ वरील टीपेंत म्हटल्याप्रमाणें थोडेंसें संगीत हीं दोन व्यवधानें प्रेक्षकांस असल्यानें सीता पडद्याबाहेर चालत येते आणि मग मूर्छित होऊन पडते ह्याकडे त्यांनीं कानाडोळाच केला पाहिजे. सर्वांना मान्य झालेले नाट्यसमय (stage conventions) काय नाहीं करूं शकणार ?

२. पुत्र जन्माच्या शुभ वार्तेनें सीतेला झालेला आनंद त्यास आपला पति वाटेकरी नाहीं याची आठवण होतांच पार मावळला. मागें पृष्ठ १४५ टीप ३ पहा.

**उभयतां देवता**—वत्से, सावध हो. सावध हो.

**सीता** ( सावध होऊन )—भगवति, आपण कोण आहां ? आणि

९ आपण ?

**पृथ्वी**—ही तुझ्या सासरची कुलदेवता—भागीरथी.

**सीता**—भगवति, वंदन करित्यें.[1]

१२ **भागीरथी**—तुझ्या सच्छीलास अनुरूप असें शुभ फल आणि संपत्ति तुला लाधो.

**लक्ष्मण**—हा आम्हांवर अनुग्रह आहे.

१५ **भागीरथी**—ही तुझी माता—भगवती वसुंधरा.

**सीता**—हाय आई ! अशा वेळीं कां तुझी भेट व्हावी[2] !

**पृथ्वी**—ये वत्से—ये माझे बाळे ! (सीतेस आलिंगून मूर्छित होते.)

१८ **लक्ष्मण** (आनंदानें)—एकूण पृथ्वीभागीरथींनीं आर्येचा स्वीकार केला.

**राम** ( पाहून[3] )—ही समाधानाची गोष्ट आहे; पण प्रसंग मोठा करुण आहे.

२१ **भागीरथी**—प्रत्यक्ष विश्वंभरेनें व्यथित व्हावें यापेक्षां अपत्यस्नेहाची महती काय वर्णावी ? अथवा ही माया सर्व सचेतन प्राणिमात्रांच्या मागें सदैव लागलेलीच आहे; व इजमुळेंच हें संसाराचें रहाटगाडगें

२४ अविच्छिन्न चाललें आहे.—वत्से वैदेही, देवि भूतधात्री, सावध हो. सावध हो.

**पृथ्वी** ( सावध होऊन )—देवि [ भागीरथी ], ह्या सीतेची मी

२७ आई, आणि आतां धीर धरूं तरी कशाच्या जीवावर ?

१. सासरच्या गुरुजनांना कांहीं झालें तरी प्रथम कुलवधूनें वंदन केलें पाहिजे या शिष्टाचारास धरूनच येथें सीतेचें वर्तन आहे. माहेरच्यांना इतके उपचार नकोत.

२. सासरच्या गृहस्थितींतील व्यंग माहेरच्यांना दिसूं नये याबद्दल बायका किती खबरदारी घेतात हें लक्षांत आणिलें म्हणजे सीतेच्या या भाषणाचा गूढार्थ समजून येईल.

३. राम यापूर्वी केव्हांतरी शुद्धीवर आला असला पाहिजे.

मागचें तें इचें राक्षसाच्या घरीं राहणें, आणि आतां
हा असा त्याग कीं जो कानानें ऐकवतही नाहीं.

**भागीरथी**—पण मी म्हणत्यें कर्मानुरूप विपाक कर-
ण्यास दैवच सज्ज झालें म्हणजे दार लावून त्यास
कोणाच्यानें मज्जाव करितां येईल काय ? ४

**पृथ्वी**—भागीरथी, मी विचारित्यें हें तुमच्या रामभद्राला शोभलें कां—बरें दिसलें कां ?

बाळपणीं [ माझ्या बाळेचा ], त्यानें बालवयांतच
जो पाणिग्रह केला त्याजकडे, मजकडे, जनकाकडे,
अग्निशुद्धीकडे [ राज्य टाकून] दंडकारण्यांत ती
आपल्यासवें आली याकडे, [ निदान ] तिजपासून
होणाऱ्या [ भावि ] संततीकडे,—कशाकडे तरी
त्यानें पाहिलें कां ? ५

**सीता**—हा आर्यपुत्रा ! तुमची आठवण मला [ पुनः ] करून दिली[1] !

३ **पृथ्वी**—आं ! तुझा आतां आर्यपुत्र कोण ?

**सीता** ( लाजून रडत रडत )—जसें आईला रुचेल तसें.

**राम**—माते पृथ्वी, मी आहें खरा तसा.[2]

६ **भागीरथी**—भगवति वसुंधरे, तूं या संसाराचें [ आधारभूत ] शरीर आहेस; तेव्हां वस्तुस्थितीविषयीं अज्ञान पांघरून तूं असा जांवयावर क्रोध कां करावास ?

लोकांमध्यें तसा तो भयंकर दुर्लौकिक पसरलेला;
अग्निशुद्धि [ लांब ] लंकाद्वीपांत झालेली, तिजवर
इथल्या लोकांचा विश्वास कसा बसावा ? बरें सर्व
लोकांचें आराधन करणें हें इक्ष्वाकुवंशीयांचें

१. वर ७·५ मधील विवाहाच्या आणि दंडकारण्यनिवासाच्या उल्लेखांनीं तुमची आठवण झाली हा भावार्थ.

२. तुझ्या भाषणांत माझ्या अनार्यतेचा जो ध्वनि आहे तो अगदीं यथार्थ आहे.

कुलव्रतच ठरून राहिलेलें; तेव्हां अशा अत्यंत
बिकट परिस्थितींत सांपडल्यावर माझ्या रामभद्राला
दुसरें काय करितां आलें असतें[1]? ६*

**लक्ष्मण**—देवतांना भूतमात्राचें अंतर्गत हेतू विदित व्हावेत यांत आश्चर्य नाहीं.[2]

**भागीरथी**—तथापि [रामाच्या वतीनें] ही मी तुजपुढें अंजलि पसरित्यें.

**राम**—माते भागीरथी, भगीरथाच्या वंशावर तुझी कृपा [ पूर्वींप्रमाणेंच ] अव्याहत चालत आली आहे.

**पृथ्वी**—तुम्हांवर मी सदैव प्रसन्नच आहें; परंतु दुःखाचा वेग आरंभीं अगदीं अनिवार होत असतो. बाकी रामभद्राचें सीतेवरील प्रेम मला ठाऊक नाहीं असें नाहीं.

दैवाच्या [ विपरीत गतीमुळें ] माझ्या मुलीला
त्यानें टाकिलें; पण त्याचें हृदय कसें पोळत
आहे, व आपल्या अलौकिक प्रभावामुळें आणि
प्रजेचें पुण्य थोर म्हणूनच तो आजपर्यंत जीव
धरून कसा राहिला आहे [हें मला समजतें]. ७

**राम**—गुरुजन आपल्या लेंकरांवर केव्हांही दयाच करणार.

**सीता** ( हात जोडून, रडत रडत )—आई, तूं मला आतां तुझ्या उदरामध्यें गडप कर.

**राम**—दुसरें काय ती मागणार?

* लोकीं मोठें अयश उठलें जी तिची अग्निशुद्धी
लंकाद्वीपीं कराविलि तिला मानिना लोकबुद्धी ॥
इक्ष्वाकूंचें कुलधनाचि हें कीं जना रंजवावें
ऐसें त्याला कठिण पडतां काय त्यानें करावें ॥ ७ ॥

१. हा श्लोक अगदीं साधा आहे. त्यामध्यें बिकट सामासिक शब्द नाहींत व दूरान्वितत्तेचा दोषही नाहीं. अगदीं व्यवहारांत आपण जशी भाषा बोलूं तशी घातली आहे.

२. म्हणजे, भागीरथीला रामानें सीतेचा त्याग कां केला, त्या वेळीं त्याची मनोवस्था कशी झाली होती, हें अंतर्ज्ञानानें कळून आलें यांत आश्चर्य नाहीं.

**भागीरथी**—भलतेंच ! तुला हजारों वर्षांचें आयुष्य असो.[१]

६ **पृथ्वी**—बाळे, या मुलांचें संगोपन तरी तुला करणें प्राप्त आहे.

**सीता**—मी अनाथ आहें; मला त्यांना घेऊन काय करावयाचें आहे ?

९ **भागीरथी**—तूं सनाथच आहेस; अनाथ कशी ?

**सीता**—कसचें या कपाळकरंटीचें सनाथपण ?

**राम**—हृदया, तूं [ निःसंशय ] वज्रमय आहेस.

**उभयतां देवता**—तूं जगताचें मंगलसर्वस्व आहेस;
स्वतःची उगीच अवमानना कां करून घेतेस ?
तुझ्या संसर्गानें आमच्या सारख्यांच्या सुद्धां पवि-
त्रतेमध्यें भरच पडावयाची. ८

**लक्ष्मण**—दादा, ऐकलें ?

**राम**—लोकांनीं ऐकावें.[२]

( पडद्यांत गलबला. )

४ **राम**—कांहीं तरी अत्यंत अद्भुत गोष्ट घडून येत आहे !

**सीता**—हें सगळें अंतरिक्ष पेटल्यासारखें काय दिसत आहे !

६ **उभयतां देवता**—समजलें.[३]
कृशाश्वापासून कुशिकसुत [विश्वामित्रा]ला, आणि
विश्वामित्रापासून रामाला असा ज्यांचा गुरुसंप्र-

१. नुसता तोंडचा आशीर्वादच होता; मग हजारांची शंभर हजार वर्षें केलीं असतीं म्हणून काय बिघडलें असतें ? पण आपणांस या प्रश्नाकडे या दृष्टीनें पहावयाचें नाहीं. महात्म्यांची वाणी सदैव खरीच व्हावयाची असें भवभूतीनें १·१०,४·१८, इत्यादि ठिकाणीं जें म्हटलें आहे यावरून त्यागोत्तर रामानें सीतेचा स्वीकार केला व उभयतांनीं अनेक संवत्सरें सुखानें राज्य केलें अशा प्रकारची जी एक रामायणाची पाठपरंपरा प्रचलित होती तिचाच भवभूति येथें अनुवाद करीत आहे हें उघड आहे.

२. सीतेच्या पवित्रतेचा मला संशय नाहीं—केव्हांही नव्हता. ज्यांना संशय आहे त्या लोकांनीं इकडे (वाटल्यास) लक्ष द्यावें.

३. वर ७·६[१] चा हा येथें लगेच पुरावा आला आहे.

दाय[1] आहे तीं हीं शस्त्रें जृंभकमंत्रांसमवेत प्रकट होत आहेत. ९

**पडद्यांत**—देवि सीते, तुला नमन असो, चित्रदर्शनाच्या वेळीं रघुनंदन [रामानें] म्हटल्याप्रमाणें आम्हांला तुझ्या पुत्रांकडे जाणें आहे. १०

**सीता**—माझ्या मुलांचें भाग्य थोर ! या अस्त्रदेवता. हा आर्यपुत्रा ! तुमच्या प्रसादाचीं फळें अजून मला मिळत आहेत !

१ **लक्ष्मण**—दादांनीं म्हटलें होतें[2]—‘ आतां हीं निःसंशय तुझ्या संततीला लाधतील. ’

**उभयतां देवता**—हे अस्त्रश्रेष्ठांनो, तुम्हांस वंदन असो. तुम्हीं आमचा स्वीकार केल्यानें आम्ही धन्य झालों. हीं मुलें तुमचें जेव्हां ध्यान करतील तेव्हां तुम्हीं त्यांना उपस्थित व्हावें, व [ सदैव ] त्यांचें कल्याण चिंतावें. ११

**राम**—माझें हृदय संक्षुब्ध होऊन त्यांतून करुणरसाचे कल्लोळ उठूं लागले, व ते विस्मय व आनंद यांशीं संमिश्र होऊन त्यांनीं माझी जी काय आतां अवस्था करून टाकिली आहे ती सांगतां येत नाहीं ! १२

**उभयतां देवता**—मोठी आनंदाची गोष्ट आहे, वत्से, कीं तुझे मुलगे आतां रामभद्राच्या बरोबरीचे झाले.

३ **सीता**—भगवति, आतां यांचे क्षत्रियोचित संस्कार कोण करील[3] ?

१. मागें १·१५, ५·१५, ६·१५, इत्यादि स्थळें पहा.

२. मागें १·१५[२] पहा.

३. आईवर स्वतः केवढाही मोठा प्रसंग गुदरला असला तरी आपला मुलगा पुढें कर्तासवरता होईल व लोकांत मानमान्यता मिळवील हा विचार त्या सर्व दुःखांचा विसर पाडण्यास पुरेसा होतो. पण हें सर्व एक क्षणभरच. पुढें ७·१५[५] मध्येंच सीतेला पुनः तिच्या शोकानें घेरिलें.

**राम**—ज्या वंशाचे प्रत्यक्ष वसिष्ठ कुलपुरोहित त्या रघु-
वंशाचें [ संततिरूपानें ] संवर्धन करणारी ही
सीता असून इला आपल्या मुलांचे संस्कार कर-
णार कोण याचीच भ्रांति पडावी काय ? १३

**भागीरथी**—मुली, तूं कां त्याची काळजी करितेस ? ह्या मुलांना,
त्यांचें स्तनपान तुटलें म्हणजे, मी भगवान् वाल्मीकींच्या स्वाधीन
३ करणार आहें. तेच त्यांचे क्षत्रियोचित सर्व संस्कार करितील.

कारण, ज्याप्रमाणें वसिष्ठमहर्षि अथवा आंगिरस
[ शतानंद ] त्याचप्रमाणें वरुणपुत्र [वाल्मीकि]ही
रघु आणि जनक या दोन्ही कुलांचे कुलगुरुच
होत. १४

**राम**—भगवतींनीं योजना चांगली केली.

**लक्ष्मण**—दादा, मी खरेंच सांगतों कीं या सर्व लक्षणांवरून हे
३ कुशलवच असावेत असा माझा तर्क होतो.

कारण, या दोघांनाही अस्त्रें जन्मतःच सिद्ध
आहेत; आणि दोघांही वीरांना वाल्मीकिमुनींच्या
हस्तेंच क्षात्रसंस्कार झाला आहे; व यांचीं वयेंही
बाराच वर्षांचीं आहेत. १५

**राम**—वत्सा, आणि म्हणूनच माझें हृदय हेलकावे खात आहे व
मला कांहीं सुचेनासें झालें आहे.

३ **पृथ्वी**—चल बाळे. [माझें] रसातलांतील [ गृह तुझ्या सान्निध्यानें ]
पवित्र कर.

**सीता**—नको. आई, तूं मला आपल्या उदरांत गडपच करून टाक.
६ मृत्युलोकीं [ राहून हा ] दैवाचा फेरा माझ्याच्यानें आतां सहन
करवणार नाहीं.[1]

१. पृथ्वीनें सीतेस रसातलीं कांहीं दिवस राहण्यासच बोलाविलें; पण सीतेस आतां मुळीं जिवंतच रहावयास नको होतें. पण पुढें सर्व दुःखें लयास जाऊन राम पत्नीचा पुनः स्वीकार करील हें त्यांना अंतर्ज्ञान असल्यानें उभयतां देवींनीं सीतेला तसें करूं दिलें नाहीं.

**राम**—आतां याचें उत्तर काय बरें मिळेल ?

९ **पृथ्वी**—बाळे, मुलें अंगावर पीत आहेत तोंपर्यंत माझ्या सांगण्यावरून तूं त्यांचें संगोपन कर. त्यानंतर तुला जसें वाटेल तसें.

**भागीरथी**—हो. हेंच बरोबर.

( गंगा, पृथ्वी, व सीता निघून जातात.[1] )

१३ **राम**—काय ! एकूण वैदेहीचा शेवटच झाला !! हाय गे देवी, माझे दंडकारण्यांतील प्रियसखी ! हाय गे सच्छील पतिव्रते ! तूं परलोक-

१५ चाच मार्ग सुधारलास ना अखेर !! ( मूर्छित होतो. )

**लक्ष्मण**—भगवन् वाल्मीके, धांवा धांवा ! हाच कां तर तुमच्या काव्याचा मथितार्थ[2] ?

१८ **पडद्यांत**—सर्व वाद्यें, उपकरणें काढून न्या.[3] अहो, मृत्युलोकींच्या[4] सर्व स्थावरजंगम प्राणिमात्रांनो ! वाल्मीकीच्या[5] अनुमतीनें होणारें हें पवित्र आश्चर्य पहा.

**लक्ष्मण** (पाहून)—जणूं काय मंथन केल्याप्रमाणें गंगा-
नदींचें पाणी खवळलें आहे. अंतरिक्षांत देवांची
व ऋषींची दाटी झाली आहे. आणि, अहो
आश्चर्य ! आर्या [ सीता ], गंगा व पृथ्वी या
देवतांसमवेत, पाण्यांतून वर येत आहे ! १६

१. येथें गर्भनाटक संपलें.

२. या वाक्याचा उत्तानार्थ 'रामास जास्त दुःखांत आणून सोडण्याकरितांच कां तुम्हीं आम्हांला हें नाटक पहावयास बोलाविलें ?'—असा आहे. पण 'तुमच्या काव्याचा—रामायणाचा—असा ( म्हणजे सीतेच्या मृत्यूनेंच ) शेवट करणें तुम्हांस अभिप्रेत आहे काय ?' असाही ध्वनि त्यांतून निघूं शकेल. यावरून भवभूतीस रामायणाचा शेवट शोकानें झालेला व आनंदानें झालेला हे दोन्हीही ठाऊक असावेत. उपोद्घात § २१ क पहा.

३. मागें पृष्ठ २५६ वरील टीप ३ पहा.

४. मर्त्येतर लोकांना बोलाविलें नाहीं; कारण त्यांना त्रिकालज्ञान असल्यामुळें त्यांचा सीतेबद्दल केव्हांही गैरसमज झाला नव्हता.

५. बोलणारा वाल्मीकिच असल्यामुळें भगवान् हें उपपद लाविलें नाहीं.

**पडद्यांत**—हे जगद्वन्द्ये अरुंधती ! आम्ही—गंगा व
पृथ्वी—ह्या तुजप्रत वंदन करीत आहों, व ही
पुण्यशील सीता— आमची मुलगी—तुझ्या स्वा-
धीन करीत आहों. १७

**लक्ष्मण**—काय आनंदाची गोष्ट ही—केवढें हें आश्चर्य ! दादा,
२ पहा पहा. ( पाहून ) अरे दैवा ! दादा, अजून सावध नाहीं होत !

( तदनंतर अरुंधती व सीता प्रवेश करितात. )

**अरुंधती**—त्वरा कर, वत्से वैदेही; ही भीडलज्जा सो-
डून दे. ये आणि तुझ्या प्रिय हस्ताचा माझ्या
रामभद्राला स्पर्श करून त्याला जीवदान दे.[1] १८

**सीता** ( घाईघाईनें स्पर्श करून )—आर्यपुत्रा, सावध व्हा, सा-
वध व्हा.

३ **राम** ( सावध होऊन, आनंदानें )—हें काय बरें असावें ? ( पाहून,
हर्षानें व विस्मयानें) ही तर देवीच ! (लज्जेनें) कोण ? अंब अरुंधती
व आनंदित झालेले ऋष्यशृंग, शांता, इत्यादिक सर्व गुरुजन !

६ **अरुंधती**—वत्सा [ रामभद्रा ], ही भगीरथाच्या वंशाची कुलदेवता
भगवती भागीरथी तुझ्यावर प्रसन्न झाली आहे.

**पडद्यांत**—जगत्पते रामभद्रा ! चित्रदर्शनाचे प्रसंगीं तूं मला जे
९ शब्द बोलिलास[2] त्यांचें स्मरण कर. 'ती तूं, माते [ भागीरथी ], ह्या
तुझ्या सुनेच्या—ह्या सीतेच्या—कल्याणार्थ सतत, भगवती अरुंधती-
प्रमाणेंच, काळजी वहा.'—असें तूं मला म्हणाला होतास.[2] त्या
१२ ऋणांतून मी मुक्त झाल्यें आहें.

**अरुंधती**—आणि ही तुझी सासू—भगवती वसुंधरा.

**पडद्यांत**— माझ्या रामभद्रानें पूर्वीं बाळेचा त्याग करण्याचे वेळीं
१५ म्हटलें होतें[3]—' भगवति वसुंधरे, या सुशील दुहितेवर तुझी कृपा-

१. तिसऱ्या अंकाप्रमाणेंच येथेंही रामाचें संजीवन सीतेच्या हस्तस्पर्शानेंच होतें.
२. मागें १·२३[१–२] पहा.
३. मागें १·५०[४–५] पहा.

दृष्टि असूं द्या.' तें माझ्या कन्येसंबंधींचें वचन, हे प्रभो[1], मीं आतां पुरें केलें आहे.

१८**राम**—एकूण, इतके थोर अपराध केले असून भगवतींनीं मजवर दयाच केली काय ! ( त्यांना वंदन करितो. )

**अरुंधती**—हे अखिल पौरजनहो ! ही देवी सीता, जिला पृथ्वी-
२१भागीरथींनीं तिच्या शीलाची प्रशंसा करून नुकतीच मज अरुंधतीच्या स्वाधीन केली, आणि या पूर्वींही भगवान् अग्नीनें जिच्या पवित्रतेबद्दल व पातिव्रत्याबद्दल ग्वाही दिली होती व ब्रह्मादिक देवांनीं जिची
२४स्तुति गाइली होती, ती ही पवित्र यज्ञभूमींतून उत्पन्न झालेली सूर्यवंशाची कुलवधू स्वीकारणें आहे, तर तुमचें त्याबद्दल मत काय आहे ?

२७**लक्ष्मण**—भगवती अरुंधतींनीं अशाप्रकारें निर्भर्त्सना केल्यावर हे अखिल प्रजाजन व सर्व भूतमात्र वहिनींस वंदन करीत आहेत व लोकपाल व सप्तर्षी[2] त्यांचेवर पुष्पवृष्टि करण्यास सज्ज झाले आहेत.

३०**अरुंधती**—जगत्पते, रामभद्रा—

> ही तुझी प्रिया व सहधर्मचारिणी—त्या सुवर्ण-
> प्रतिमेची पवित्र मूलप्रकृति—इचीच आतां त्वां
> यज्ञामध्यें योजना करावीस. १९

**सीता** ( स्वगत )—सीतेच्या दुःखाचें प्रमार्जन कसें होईल तें आर्यपुत्रांस अवगतच आहे.

३ **राम**—जशी भगवतींची आज्ञा.

**लक्ष्मण**—आतां मी कृतकृत्य झालों.

**सीता**—आतां माझ्या जिवांत जीव आला.

१. पृथ्वी रामाची सासू खरी पण दुसऱ्या संबंधानें राम तिचा प्रभु होता; त्या नात्याचीही येथें आठवण करून दिली. प्रभूची आज्ञा पृथ्वीस मानणें भागच होतें.

२. प्रचारांतील सप्तर्षींमध्यें वसिष्ठ (व अरुंधती) यांचीही परिगणना होत असते इकडे कवीचें दुर्लक्ष झालेलें दिसतें.

६ **लक्ष्मण**—आर्ये, हा निर्लज्ज लक्ष्मण प्रणाम करीत आहे.

**सीता**—वत्सा, तूं आहेस तसाच[१] चिरंजीव हो.

**अरुंधती**—भगवन् वाल्मीके, सीतेपासून उत्पन्न झालेले ते कुश आणि

९ लव रामभद्रास आतां आणून भेटवावेत. ( जाते.[२] )

१. मला टाकण्यामध्यें तूं आपलें कर्तव्यच केलेंस; तेव्हां तुजवर माझा मुळींच दोष नाहीं. तशा प्रसंगीं तूं केलेंस तेंच योग्य होतें असें सुचविलें.

२. सीतेवरील जनापवादाचें निरसन करण्यामध्यें व पतिपत्नींची गांठ घालून देण्यामध्यें हा वेळपावेतों अरुंधतीनेंच पुढाकार घेतला होता. मग आतां थोड्याकरितां, व विशेषतः पुत्रांची गांठ पडून आनंदसागरास पूर्ण भरतें येण्याच्या वेळींच, अरुंधतीनें रंगभूमीवरून कां निघून जावें समजत नाहीं. कदाचित् ज्यानें कुशलवांचें संगोपन केलें व गर्भनाटकाचा योग जमवून आणून नाटक आनंदपर्यवसायी होण्यास मदत केली, व मुख्यतः ज्याच्या रामायणावर नाटक रचिलें, त्या वाल्मीकिमुनीनेंच शेवटचें भरतवाक्य म्हणून आशीर्वाद द्यावा असें जुळवून आणणें कवीस उचित वाटलें असेल; व रंगभूमीवर त्या वेळीं असलेल्या सर्व पात्रांमध्यें वयानें व दर्जानें जें अत्यंत श्रेष्ठ असेल त्यानेंच भरतवाक्य म्हणावें असा प्रघात असल्या-मुळें, अरुंधतीस रंगभूमीवर ठेविल्यास असें श्रेष्ठत्व तिजकडे जाईल म्हणून कवीनें तिची पाठवणी केली असेल.—अंकाच्या शेवटीं वाल्मीकीस आण-ण्यामध्यें कवीचा दुसराही एक उद्देश असूं शकेल. चवथ्या अंकांत ( ४·२२[३१–३६] ) लवानें वाल्मीकीनें उत्तरकांडांतील कथांशावर नाटक रचिलें आहे असें जरी सांगितलें तरी वाल्मीकीनें कांहीं तसें नाटक रचि-ल्याचें प्रसिद्ध नाहीं; तेव्हां भवभूति तोच वाल्मीकि असा अस्पष्ट ध्वनि त्यावरून निघूं शकतो. विशेषतः नाटक रचून प्रयोगार्थ नटवर्गाच्या स्वाधीन केल्याचें जें तेथें वर्णन आहे तें मालतीमाधवादिकांच्या प्रस्ता-वनांतून कवीनें जें आत्मवृत्त सांगितलें आहे त्याशीं तंतोतंत जुळतें ( उपोद्घात §§ १ व ४ पहा ). प्रस्तुत नाटकाच्या भरतवाक्याची योजना तर कवीनें मुद्दाम द्व्यर्थी ठेविली आहे. राम ज्या 'नाट्यरूपानें नट-विलेल्या' कृतीवर विद्वानांची कृपा असावी असा आशीर्वाद मागतो ती कृति वाल्मीकीची असा जरी वाच्यार्थ असला तरी भवभूतीचीच कृति तेथें विवक्षित आहे हें उघड आहे. प्रत्यक्ष भवभूतीनेंच अशा प्रकारें ध्वनित केलेलें आपलें व वाल्मीकीचें तादात्म्य पुढें राजशेखरानें ( बालरामायण

**राम व लक्ष्मण**—आम्हांला वाटलें तेंच खरें ठरलें ! फार चांगलें झालें !

१२**सीता** ( बाष्पाकुल होऊन )—कुठें आहेत ते माझे लाडके ?

( नंतर कुशलवांस घेऊन वाल्मीकि प्रवेश करितो. )

**वाल्मीकि**—हे वत्स कुशलवांनो ! हा रघुपति तुमचा पिता. हा १९लक्ष्मण तुमचा कनिष्ठ तात.[१] ही देवी सीता तुमची जननी. हा राजर्षि जनक तुमचा मातामह.

**सीता** ( हर्ष, करुणा व विस्मय यांनीं युक्त होऊन, पाहून )—१८काय ? बाबा !

**कुश व लव**—हे ताता, हे माते, हे अजोबा !

**राम** ( हर्षानें पोटाशीं धरून )—वत्सांनो ! मोठ्या पुण्याईनेंच बरें २१तुम्ही आम्हांस लाधलात !

**सीता**—ये, लाडक्या कुशा. ये, लाडक्या लवा. जिचा पुनर्जन्मच झाला म्हणावयाचा त्या या तुमच्या आईस दोघेही कडकडून भेटा.

२४**कुश व लव** ( तसें करून )—आम्ही आज धन्य झालों !

**सीता**—भगवन्, वंदन करित्यें.

**वाल्मीकि**—वत्से, अशीच [ पतिपुत्रांसमवेत ] चिरकाल रहा !

२७**सीता**—अहाहा ! बाबा, कुलगुरु, सासूबाई, पतिसमवेत देवी शांता-वन्सें, व लक्ष्मणासह सुप्रसन्न असे हे आर्यपुत्रांचे चरण, आणि तसेच

१·१६ ) अगदीं सर्वसंमत म्हणून उल्लेखिलें आहे (उपोद्घात§८ पहा). या सर्व गोष्टींचा विचार करितां व भवभूतीची व नटवर्गाची जी परम मैत्री जडली होती ती लक्षांत घेतां, प्रस्तुत नाटकांत भवभूतीनेंच वाल्मीकीची भूमिका घेतली होती, व नाटकाच्या अखेरीस प्रेक्षकांचे धन्यवाद स्वीकारण्यास त्याला स्वतःलाच हजर रहावयाचें होतें, व म्हणून त्यानें अरुंधतीची रवानगी केली अशी कल्पना केल्यास ती अगदींच अस्थानीं होईल असें वाटत नाहीं.

१. कनिष्ठतात म्हणजे चुलता.

कुशलव, या सर्वांची एकदमच भेट झाली. माझ्या आनंदास आतां ३०अगदीं पारावार नाहीं !

( पडद्यांत गलबला. )

**वाल्मीकि** ( उठून व पाहून )—लवणराक्षसाचें निर्दलन करून मथु-३३रेश्वर [ शत्रुघ्न ] येत आहे.

**लक्ष्मण**—सुखें येऊं लागलीं म्हणजे एका पाठीपागून एक येतात.

**राम**—मी हें सर्व अनुभवित आहें तरी माझा विश्वास बसत नाहीं. ३६अथवा उत्कर्षाची वेळ आली म्हणजे हें असेंच होतें.

**वाल्मीकि**—रामभद्रा ! सांग आणखी म्यां तुझें काय प्रिय करावें ?

**राम**—यापेक्षां अधिक प्रिय तें काय असणार ? तथापि हें असो.—

जी ही कथा, जगन्माता [ धरणी ] आणि [ भगवती ] भागीरथी यांच्याप्रमाणेंच मनोहर व मंगलावह असून पापापासून पुनीत करिते व कल्याणाची वृद्धि करिते त्या या कथेचें—ज्या-चा शब्दब्रह्माशीं पूर्ण परिचय आहे व ज्याची प्रज्ञा परिपक्व झाली आहे अशा कवीच्या नाट्य-रूपानें नटविलेल्या या वाणीचें—बुधजन [सदैव] परिशीलन करोत ! २०*

( सर्व निघून जातात. )

**महाकविश्रीभवभूतिप्रणीत उत्तररामचरित नाटकाचा संमेलन नामक अंक सातवा[१]**

**समाप्त.**

* मंगल्या सुमनोहरा त्रिजगता गंगेपरी सर्वथा
पापापासुन रक्षिती वितरती श्रेयांस जी ही कथा ॥
तीतें संत सदा धरोत हृदयीं जो पक्वबुद्धी कवी
त्याची वाणिसुधा नवी बुध सदा घेवोत तीची चवी ॥ २१ ॥

१ प्रस्तुत अंकास गर्भांक असेंही नांव कोठें कोठें दिलेलें आढळतें. सातव्या अंकाचें साध्य सर्वांचें संमेलन हें तर आहेच, पण तें साधण्याकरितां या अंकामध्यें ज्या उपायाचें–गर्भनाटकाचें–अवलंबन केलें आहे त्यावरून हें

नांव पडलें असावें असें दिसतें. मागें उपोद्घातामध्यें (§२० क ) आम्हीं नाटकाचे संविधानकाच्या दृष्टीनें—प्रयोगरूपानें प्रत्यक्ष करून दाखवावयाचा भाग व अंकाच्या दरम्यान घडून आला म्हणून सांगावयाचा भाग,—असे दोन भाग केले होते. गर्भनाटक या दोन्ही भागांमध्यें पडत नाहीं; अथवा दोन्ही भागांमध्यें पडतें. गर्भनाटक विष्कंभकाप्रमाणेंच भूतार्थकथनाकरितां प्रवृत्त झालेलें असतें; पण हा भूतार्थ नुसता वर्णन करून न सांगतां प्रयोग-रूपानें डोळ्यांसमोर मांडिला जातो, व त्यामुळें त्याचा परिणाम जास्त सुस्पष्ट होतो. विशेषतः ज्या नाटकामध्यें दरम्यान अनेक वर्षांचा खंड पडलेला असतो त्या नाटकामध्यें अशा प्रकारें गर्भनाटकाचा योग जुळवून आणिल्यास त्यानें तो खंड एक प्रकारें सांधिला जातो, व तेणेंकरून सर्व संविधा-नकास एकरूपता येते. एकादा गारुडी ज्याप्रमाणें आपल्या देखत आंब्याची कोय लावून तिचें अर्ध्या तासांत झाड बनवून दाखवितो त्याप्रमाणें गर्भनाट-काच्याद्वारा भूतकालचे सर्वच प्रसंग वर्तमानकालच्या आदर्शावर एक-समयावच्छेदेंकरून प्रतिबिंबित होऊन त्यांतील कार्यकारणभाव झटकन् लक्षांत येतो, व अशा दृष्टीनें पाहिलें असतां भवभूतीनें कथावस्तूची मांडणी करण्याचा जो मार्ग या अंकात स्वीकारिला आहे तो सर्वांशीं उचितच झाला आहे असें दिसून येईल. कुशलव आपलेच पुत्र आहेत याबद्दल रामाची व सीतेच्या पवित्रतेबद्दल पौरजनांची, कवीनें योजिलेल्या युक्तिव्यतिरिक्त अन्य कोणत्याही युक्तीनें, तितकी खात्री पटली नसती हेंही उघडच आहे.

हें गर्भनाटक—अथवा भवभूतीचींच स्वतःचीं नाटकें --कसल्या प्रकारच्या रंग-भूमीवर कोणत्या उपकरणांनिशीं केलीं जात असत याचा विचार येथें करणें जरी अप्रासंगिक झालें नसतें तरी या बाबतींत जितका शोध व्हाव-यास पाहिजे तितका अद्याप झाला नसल्यानें हा मनोरंजक व महत्त्वाचा विषय आम्ही तूर्त हातीं घेत नाहीं. एक दोन जरूरीच्या गोष्टींचा वर पृष्ठ २५६ टीप ३ मध्यें उल्लेख केलाच आहे.

ज्या सहृदय वाचकांनीं येथपावेतों आमच्याबरोबर हा सर्व मार्ग आक्रमण केला त्यांची—व विशेषतः भवभूतीच्या उत्तररामचरिताची—संगति येथेंच सोडून द्यावी लागणार याबद्दल आम्हांस फार वाईट वाटतें. तथापि हस्तांदोलनपूर्वक वाचकांची रजा घेण्यापूर्वीं आम्ही त्यांना अशी आग्र-हाची विनंति करण्याची परवानगी घेतों कीं त्यांनीं हें नाटक एकदांच वांचून सोडून देऊं नये. त्याचें निदान ४।५ वेळां पारायण करावें. म्हणजे आमच्याप्रमाणेंच त्यांनाही 'क्षणे क्षणे यन्नवतामुपैति तदेव रूपं

रमणीयतायाः ' या कव्युक्तीची सार्थकता दिसून येईल. जो ग्रंथ एकाहून अधिक वेळ वाचण्याच्या योग्यतेचा नाहीं तो एकदांही वाचण्याच्या योग्यतेचा नाहीं हें लक्षांत ठेवून, केवळ शृंगारप्रचुर व अद्भुत रसाचा परिपोष करणाऱ्या चटकदार कादंबऱ्या संविधानकाकरितांच भराभर वाचून काढण्यापेक्षां भासकालिदासभवभूत्यादि प्राचीन माननीय कवींच्या कृतींचें चिकित्सकदृष्टीनें परिशीलन करण्याची संवय लावून घेणें केव्हांही फार चांगलें. अशा प्रकारची आवड व जिज्ञासा उत्तरोत्तर आम्हांमध्यें वाढत जावो हीच शेवटीं त्या रसात्मक व शब्दब्रह्मस्वरूपी वासुदेवाजवळ प्रार्थना आहे.

॥ ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥